॥ श्रीरामसमर्थ ॥

# मराठीची सजावट.

## भाग १ ला

लेखक

**गोपाळ गोविंद मुजुमदार,**

सांगली हायस्कूलमधील मराठीचे शिक्षक

व वनविहार, रणविहार, गृहविहार, निर्माल्यसंग्रह भाग १-२ इ०

काव्यांचे कर्ते, राजकवि, सांगली.



१९१९

किंमत दोन रुपये.

# प्रस्तावना.



मुंबई विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत मराठी भाषेची झालेली उपेक्षा क्रमाक्रमानें दूर होत चालली आहे ही संतोषाची गोष्ट होय. अशा स्थितींत उच्च दर्जाच्या मराठी वाङ्मयाच्या अध्ययनाची योग्य दिशा दाखविणारें एखादें पुस्तक मराठींत असावें व " सामान्य विद्यार्थ्यांस देखील चांगल्या मराठी वाङ्मयाचें मर्म समजावें आणि होतकरू विद्यार्थ्यांस चांगलें मराठी वाङ्मय स्वतः लिहितां बोलतां यावें, " इतकी त्या पुस्तकाच्या ध्येयाची व्याप्ति असावी अशी कल्पना माझ्या मनांत बरेच दिवस घोळत होती. पण हें काम मजपेक्षां अधिक अधिकारी मनुष्यानें करावयाचें आहे-व सुदैवानें तसे अधिकारी लेखक मराठींत अनेक आहेतही-अशा समजुतीनें मी हें साहस करण्यास स्वतः प्रवृत्त होत नव्हतों. पण बहुधा कार्यांतराच्या आवश्यकतेमुळें या मंडळीस असलें पुस्तक लिहिण्यास सवड होत नाहीं असें पाहून, आणि ' अकरणान्मंदकरणं श्रेयः ' या न्यायाचें अवलंबन करून, मीं हें काम साधेल तसें संपादून वाचकांपुढें ठेवलें आहे.

पुस्तकाची सामान्य दिशा के. आपट्यांच्या " संस्कृत गाईड " च्या धोरणावर आंखली आहे, तथापि त्या पुस्तकापेक्षां या पुस्तकाची व्याप्ति मोठी असल्यामुळें याचे दोन भाग केले आहेत. हा पहिला भाग इंग्रेजी चवथ्या इयत्तेपासून सहावी इयत्ताअखेर उपयोगी पडावा व त्याच्या परिशीलनानें व्याकरणालंकृत मराठी लिहितां व जाणतां यावें; आणि दुसरा भाग सातव्या इयत्तेस व कॉलेजांतील पुढील अभ्यासक्रमास उपयोगी पडावा व त्याच्या अभ्यासानें अर्थालंकृत मराठी लिहितां व जाणतां यावें, अशी पाठरचनेची योजना केली आहे ती कितपत सफळ झाली आहे हें रसिक महाराष्ट्र भाषाकोविदांनीं ठरवावयाचें आहे.

मराठी व्याकरणाच्या कांहीं बाबतींतले मतभेद अजून मिटले नाहींत, त्यामुळें या पुस्तकांतही जेथें अशा बाबतींची चर्चा आली आहे तेथें दुमत होण्याचा संभव आहे, पण तो प्रसंग तूर्त तरी अपरिहार्य आहे. विशेषतः वाक्यपरिच्छेदाच्या बाबतींत हा मतभेद विशेष जाणवेलसें वाटतें. यासंबंधीं इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं वादग्रस्त विषयांत मराठीच्या संस्कृत प्राकृत परंपरेला अनुसरून

माझ्या बुद्धीस योग्य वाटणारा निर्णय मीं केला आहे. समासप्रकरणांत आणि इतर पुष्कळ ठिकाणींही विद्यार्थ्यांची कल्पकता वाढण्यासाठीं मीं कांहीं योजना केल्या आहेत. सारांश, प्रतिपाद्य विषय विद्यार्थ्यांच्या मेंदूंत प्रथम चांगला प्रविष्ट व्हावा व तेथून तो त्याच्या कृतींत उतरावा अशा हेतूनें पाठ, पाठावली, त्यांवरील अभ्यासपाठ, त्यासंबंधीं मार्मिक प्रश्न इत्यादिकांची रचना केली आहे.

प्रस्तुत पुस्तक छापून काढण्यांत अमळ घाई झाल्यामुळें त्यांत बरेच मुद्रण दोष राहून गेले आहेत. शेवटीं दिलेल्या शुद्धिपत्रावरून वाचकांनीं ते अगोदर दुरुस्त करून घ्यावे अशी विनंति आहे.

प्रस्तुत पुस्तक लिहिण्याच्या कामीं माझे सन्मान्य गुरुवर्य रा. श्रीपादशास्त्री देवधर, सांगली हायस्कूलमधील संस्कृताध्यापक यांचें मला बहुमोल साह्य झालें आहे. त्याचप्रमाणें सदर हायस्कूलमधील दुसरे एक शिक्षक व माझे मित्र रा. श्रीनिवास भिकाजी गोखले यांनींही मला मोठें साह्य करून ऋणी करून ठेवलें आहे. ज्या अनेक ग्रंथांचा व लेखकांचा मला प्रस्तुत पुस्तक लिहितांना उपयोग झाला आहे व ज्यांची यादी मी दुसऱ्या भागाच्या अखेरीस देणार आहें त्यांचा तर मी उपकार-बद्ध आहेंच, पण ते ग्रंथ मला पुरवून ज्यांनीं माझें कार्य सुकर करून दिलें त्या रा. करंदीकर ( सांगली सिटी हायस्कूलचे हेडमास्तर ), प्रो. लिमये ( विलिंग्डन कॉलेज ) इत्यादि मंडळींचाही मी फार आभारी आहें. मराठींतील लेखकचूडामणि श्री. नरसोपंत केळकर व प्रो. दत्तोपंत पोतदार यांनीं पुस्तकाचे हस्तलेख तपासून व त्यांत मार्मिक सूचना करून माझ्या शिरावर मोठेंच ऋण करून ठेवलें आहे. आर्यभूषण छापखान्याच्या चालकांनींही पुस्तकाची छपाई त्वरित व सुबक करून माझ्या कार्यास हातभार लावला आहे. या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून ' मराठीचिये नगरीं ' ' विवेकलतांची लावणी ' ' सैंघ ' करण्याविषयीं जग-न्नियंत्याची प्रार्थना करून वाचकांचा निरोप घेतों.

सांगली<br>चैत्र शुद्ध. १ शके १८५१ }

गोपाळ गोविंद मुजुमदार.

# अनुक्रमणिका



# शुद्धिपत्रक.

| पान-ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- |
| १—३ | पहिल | पहिला |
| १—१४ | तं | तूं |
| १—१५ | तं | तूं |
| १—२१ | त्यामळें | त्यामुळें |
| ५-१७ | धी | संधी |
| ५—१८ | हचि | होचि |
| ५—२२ | सुहृळ | सुहृद्ळ |
| ८—९ | शाळ | शाळू |
| ८—१३ | मंबईस | मुंबईस |
| ८—२९ | यमूताइ | यमूताई |
| ९—११ | धेन | धेनु |
| ९—१३ | नपंसक | नपुंसक |
| ९—२२ | मराठा | मराठी |
| ९—२४ | सरस्कृत | संस्कृत |
| ९-२६ | मळचें | मूळचें |
| ९—२८ | मलगा | मुलगा |
| १२—१० | एटींत | ऐटींत |
| १२—१९ | तला | तुला |
| १२—२० | चतर | चतुर |
| १६—१६ | भरणें | मरणें |
| २२—१५ | तट्ट | तट्टू |
| २८—२६ | भक्ताल | भक्ताला |
| ३०—९ | पष्ठी | षष्ठी |
| ३३—११ | सायन | सान्या |
| ३५—९ | येतना | येतांना |
| ४३—२ | पाशा | पाशीं |
| ४४—१५ | वाहीं | नाहीं |
| ४५-१२ | वंचिला | वंचिलों |

| पान—ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ४६—३ | कांबळी | कां बळी |
| ४९—१५ | गाड | गोड |
| ४९—२५ | देहा | दे हा |
| ५०—३१ | तुझे होते | तुझे हात धरले होते |
| ५१—३ | ॥ १ ॥ | ॥ १ ॥ (ज्ञानेश्वर) |
| ५६—१९ | ावलज्जें | विलज्जें |
| ५८—२४ | कठा | कंठी |
| ५९—२१ | डाळ | डाळिं |
| ६४—२३ | संबंधा | संबंधी |
| ७४—१५ | वामनमूत | वामनमूर्ति |
| ८०—७ | तुकाराम | —तुकाराम |
| ८९—४ | हसामि हसउ | हसामि, हसउ |
| ९७—१ | क्रियापद् | क्रियापदें |
| ९८—१ | सोळावा पाठ | पंधरावा पाठ-पुढें चालू |
| ९८—१५ | म्हणातन | म्हणींतून |
| १००—२८ | अथपूरकारखा | अर्थपूरकासारखा |
| १००—२८ | उपयाग | उपयोग |
| १०२—११ | त | तें |
| १०७—१० | तं | तूं |
| १०७—१० | मर्खानें | मूर्खानें |
| ११०—२१ | जसः— | जसें:— |
| ११०—२७ | ज | जर |
| ११४—१० | ह | हें |
| ११७—२१ | राया | रया |
| १३७—१६ | ‘ स्वार्थी क ’ | स्वार्थी ‘ क ’ |
| १५४—८ | संपादितो. | संपादितो. ” |
| १५४—२३ | संपादितो. ” | संपादितो.’ ” |
| १६८—१२ | अव्ययाथा | अव्ययार्थी |
| १८१—१ | संवनाम | सर्वनाम |
| १८३—६ | इंग्रेजात | इंग्रेजींत |

# अर्पणपत्रिका.

"माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिकें। परि अमृतातेंहि पैजा जिंके।
ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन ॥"

हे बिरुदवाक्य यथार्थ मिरविणाऱ्या मराठीच्या पहिल्या व अखेरच्या साहित्य सम्राटाला हें फल नव्हे— फुलांची पाकळी नव्हे— तर इकडून तिकडून गोळा केलेल्या पाकळ्यांचें फूल अर्पण असो.



" ज्ञानियांचा राजा गुरु महाराव। म्हणती 'ज्ञानदेव' तुम्हां ऐसें।
मज पामरासी काय थोरपण। पायींची वहाण पायीं बरी ॥"

'युक्तीची खोली नेणणारा'

सांगली

आपला—साधुदास

# मराठीची सजावट.

## वाक्यरचना.

## पहिल पाठ.

### पदानुक्रम.

मराठी भाषा परंपरेने संस्कृतापासून झाली असल्यामुळें तिचें वळणही बहुतेक संस्कृतासारखेंच आहे. या दोनी भाषांमध्यें "प्रातिपादिकें आणि क्रियापदें व कृदन्तें यांस बहुधा प्रत्यय लागलेले असतात, व त्यांवरून त्यांचे वाक्यांतले परस्पर संबंध सहज ओळखतां येतात." अर्थातच अमुकच प्रकारानें किंवा क्रमानें शब्दरचना करून वाक्य बनवावें अशी जरूरी ह्या भाषांत उत्पन्न होत नाहीं. तथापि सामान्यतः संस्कृत प्रमाणेंच मराठींत, प्रथम कर्ता, नंतर कर्म व अखेर क्रियापद, असाच शब्दांचा क्रम ठेवण्याची रूढि आहे. मात्र पद्यांत, किंवा विशेष कारणानें गद्यांतही ती बदलतात. जसें:—'लोचन रूपीं गुंतले' हें वाक्य 'रूपीं गुंतले लोचन' (तुकाराम) असें पद्याच्या सोईकरितां झालें आहे. 'तं अगोदर पुस्तक आण' हें वाक्य, ती क्रिया प्रथम घडली पाहिजे, असा बोलणाराचा जोराचा आशय दाखविण्यासाठीं, 'पुस्तक आण अगोदर तं' असें होऊं शकेल.

२ वाक्यरचनेचीं जीं तीन साधारण तत्त्वें, (१) शब्दांचा क्रम (२) शब्दांचा परस्पर अन्वय किंवा संवाद आणि (३) शब्दांचा परस्परांवर अधिकार; यांपैकीं शब्दांच्या क्रमासंबंधीं कर्ता, कर्म, व क्रियापद एवढाच अनुक्रम पाळलेला आढळतो. वाक्यांत आलेले इतर शब्द अमुकच क्रमानें ठेवावे असा निर्बंध नाहीं. त्यामळें 'मला सोमवारीं उपास असतो' व 'सोमवारीं मला

उदास असतो ' या दोन्ही वाक्यांत म्हणण्यासारखा अर्थाचा फरक नाहीं. तथापि चांगल्या लेखकांच्या लेखनपद्धतीवरून पुढील रूढि आढळून येतात, व त्या अवश्य पाळण्याजोग्या आहेत.

( क ) कर्ता, कर्म व क्रियापद यांना विशेषणभूत होऊन आलेले शब्द अनुक्रमें त्यांच्या त्यांच्या आधीं ठेवावे. जसें:—' भल्या मनुष्यानें या कृष्णाच्या नादीं लागूं नये ' ( सौभद्र ).

( ख ) वाक्यांत अनेक विभक्ति आल्या असल्यास प्रथम सप्तमी, नंतर प्रथमा, नंतर तृतीया, नंतर चतुर्थी, नंतर द्वितीया ( कर्म ), व अखेर क्रियापद घालावें. जसें:—' पाटलिपुत्र नगरांत अग्निमित्र नामक राजा स्वहस्तें अनेक ब्राह्मणांना दक्षिणा देता झाला. '

( ग ) संबोधन प्रायः आरंभीं येतें. जसें:—' कृष्णा, मनुष्यावर प्रसंग गुदरला म्हणजे त्याच्या मनांत नाना प्रकारचे तर्क येतात. ' ( सौभद्र ). क्वचित् तें पुढेंही येतें. जसें:—'जपून जा, हं, बाळ ! '

( घ ) पंचमी विभक्ति शक्य तों क्रियापदाच्या आधीं जवळच घालतात. जसें:—' तो आज गांवाहून आला. '

( ङ ) षष्ठीचा संबंध नेहमीं नामाशीं असल्यानें ती नेहमीं नामाजवळ असते. जसें:—' माझे पाय तुझी डोई, ऐसें करी भाक देई ' ( तुकाराम ).

( च ) क्रियापदाला दोन कर्में असलीं, तर मुख्य कर्म गौण कर्मापेक्षां क्रियापदाच्या अधिक जवळ येतें. जसें:-' ऋषीनें मांजरास कुत्रा बनविलें, ' 'तो त्याला अधिकार देतो ' इ०.

( छ ) कालदर्शक व स्थलदर्शक अव्ययें बहुधा कर्त्यानंतर लगेच घालावीं. जसें:-' मी आजपर्यंत पुष्कळ साधु पाहिले ' ( सौभद्र ).

( ज ) जर-तर, जेव्हां-तेव्हां, जसा-तसा वगैरे शब्द बहुधा वाक्याच्या आरंभीं घालतात. जसें:-' जसा भाव तसा देव; ' 'जेव्हां पहावें तेव्हां तूं खिन्न दिसतोस.

( झ ) च, सुद्धां, मात्र वगैरे शुद्ध शब्दयोगी अव्ययें ज्या नामाला किंवा क्रियेला उद्देशून येतात, त्यांचे जवळच घालावीं लागतात. जसें:-' मीच तें काम करीन. ' ' हरी पुस्तक उघडतो मात्र. '

टीपः—शुद्धशब्दयोगी अव्ययें कोणत्याही कारणानें आपल्या जाग्यापासून हलविलीं तर लगेच वाक्याचा अर्थ बदलेल. ' हरी पुस्तक उघडतो मात्र ' या वाक्यांत ' हरी नुसतें पुस्तक उघडतो, त्यांतील मजकुराकडे त्याचें लक्ष नाहीं ' असा बोलणाराचा आशय आहे. तें बदलून ' हरी मात्र पुस्तक उघडतो ' असें म्हटल्यास ' हरी एकटा पुस्तक उघडतो, ' बाकी कोणी उघडीत नाहींत असा अर्थ होईल.

३ एखादें विधान किंवा भाषण पुरतेपणीं व्यक्त होण्यास जी शब्दयोजना करितात, तिला **वाक्य** असें म्हणतात. ज्या अक्षरांच्या समुदायापासून कांहीं तरी अर्थ उत्पन्न होतो त्यास **शब्द** असें म्हणतात. उद्देश्य किंवा विधेय वगळून केलेला दोन अथवा अधिक शब्दांचा प्रयोग यास **शब्दसमुच्चय** म्हणतात, आणि त्यांत उद्देश्य किंवा विधेय यांची भर पडून त्यापासून पुरता अर्थ निघूं लागला म्हणजे तेंच वाक्य होतें. जसें:—'भक्ति' हा शब्द होय, 'केशवाची भक्ति' हा शब्दसमुच्चय होय, व 'केशवाची भक्ति सूळावरील पोळी' (नामदेव) हें वाक्य होय.

४ वाक्यांतील उद्देश्य किंवा कर्ता हा नाम, सर्वनाम, विशेषण, अव्यय किंवा क्वचित् एखादें वाक्य देखील असूं शकतो. जसें:—'भला किंवा भला मनुष्य कधीं दुसऱ्याचें वाईट चिंतीत नाहीं.' 'ते नेहमीं फिरावयास जातात हें आश्चर्य आहे.'

५ वाक्यांतील विधेय हें नेहमीं एखादें अकर्मक क्रियापद किंवा कर्मासह सकर्मक क्रियापद असतें. विधेयांत कर्म आलें असल्यास, तें कर्म एखादें नाम, विशेषण, सर्वनाम, किंवा एखादें वाक्यही असतें. जसें:—'होतों द्वारकाभुवनीं' (सौभद्र). 'कर्ता देव एक तेणें केलें सर्व' (तुकाराम). 'मी ओळखतों तो लबाड आहे.'

६ वाक्यांतील विधेय हें अकर्मक क्रियापद असल्यास तें एकटेंच विधेय होऊं शकतें. जसें:—'तो आला.' 'शकुंतला शिलातलावर बसली.' पण असणें, होणें, बनणें, भासणें, दिसणें, गमणें वगैरे कांहीं क्रियापदें अकर्मक असूनही त्यांच्या नुसत्या उपयोगानें अर्थ पुरा होत नाहीं. सबब त्यांचा अर्थ पुरा होण्याकरितां एखाद्या नामाचा किंवा विशेषणाचा उपयोग करून तें प्रथमा विभक्तींत घालतात. जसें:—'आधीं होता वाघ्या, दैवयोगें झाला पाग्या' (तुकाराम). 'मज गमे ऐसा जनक तो मांग साचा' (शारदा).

७ एक उद्देश्य व एक विधेय मिळून सामान्यतः वाक्य होतें, तथापि प्रसंगीं त्यांतला कोणताही एक शब्द गुप्त ठेवतात. अशा वेळीं तो आपल्या जागीं आहे असें मानून अर्थ लावावयाचा असतो. विशेषतः द्वितीय पुरुषीं कर्ता गुप्त असतो. जसें:—'बापू म्हणजे शुद्ध बैल.' 'ह्या गोविंद गोपाळ हा छंद.' 'असें म्हणतात कीं, पूर्वीं ब्रह्मदेवाला पांच तोंडें होतीं.'

८ चांगल्या ग्रंथकारांच्या लेखनशैलीवरून सिद्ध होणाऱ्या रूढी वर सांगितल्याच आहेत. त्यांत विशेष कारणावांचून बदल करूं नये हें उत्तम. विशेषतः जेव्हां एखादें मुख्य वाक्य दुसऱ्या एखाद्या गौण वाक्याची जोड देऊन मोठें केलें असेल, किंवा एखाद्या मुख्य वाक्याची भर घालून संयुक्त केलें असेल, तेव्हां तर ही शिष्ट पद्धति जरूर पाळावी. जसें:–'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती.' (तुकाराम). 'भीष्म ग्रीष्म--तरणि--सा, अर्जुन हेमंत--तरणि--सा गमला' (मोरोपंत).

---

## १ पाठावली.

यास्तव आपण माझें एक काम केलें पाहिजे. (सौभद्र)

कसें गोड गोड गोड बोललीस! मी तुला शाहणी, समंजस म्हणतों तें उगीच नव्हे. (शारदा)

या तुम्ही वल्लरीअक्का! आज कुणीकडे आलें हें उंबरांचें[१] फूल! (कित्ता)

त्यांत आजोबा तर फारच कडकडीत! जमदग्नीचाच[२] अवतार! (पण लक्ष्यांत०)

त्यांच्या उपदेशाचा परिणाम अद्यापपर्यंत आळवांवरील[३] पाण्यासारखाच झाला आहे. (केसरी)

तथापि शेण भुईवर पडलें आणि तें माती न घेतां उठलें, तर तें शेण कसलें? (केळकर)

मागें, एके वेळेस, रूमनामें राजधानींत एक मोठा धनवान् शेठ होता. (इसापनीति)

मित्रग्रह[४] पुष्कळ वेळां इष्ट फळें अनिष्ट प्रसंगाच्या द्वारेंच देतात. (केळकर)

जीव[५], परब्रह्म, व जड वस्तु यांचा अन्योन्य संबंध काय आहे याचा विचार करून या दोघांचें एकीकरण परब्रह्म स्वरूपांत होणें

---

१ कधीं न दिसणारी वस्तु. २ अत्यंत रागीट मनुष्य. ३ फुकट गेला आहे. ४ राशीला अनुकूळ आलेले ग्रह. ५ जीवात्मा, परमात्मा व सृष्टींतील जड पदार्थ.

शक्य आहे कीं नाहीं, आणि असल्यास तें कोणत्या स्वरूपांत होतें, याचा सूक्ष्म विचार आमच्या इकडच्याप्रमाणें स्पेन्सरच्या पुस्तकांत आढळत नाहीं. (किल्ता)

दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडलिया शुद्ध नव्हे मग ॥
तैसें खळामुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥
काय करावीं तीं बत्तीस[६] लक्षणें । नाक नाहीं तेणें वाया गेलें ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलीया जैशी
संवसर्गें ॥ १ ॥ (तुकाराम)

संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥
संतांचा उदीम[७] उपदेशाची पेंठ । प्रेम-सुख-सार[८] घेती देती ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी[९] । म्हणोनी भिकारी
झालों त्यांचा ॥ २ ॥ (किना)

पूर्व-सिंहासनीं एक भागीं उषा । लेवुनी बैसली कांचनाच्या दुशा ॥
अन्य भागीं दिसे पावलेली निशा । शीलहीनें[१०] भ्रतारासवें
दुर्दशा ॥ १ ॥ (गृहविहार)

---

[११]धी, विग्रह, यान, आसन । द्वैधीभाव, आश्रय जाण ।
हचि साही राजगुण । विचक्षण बोलती ॥ १ ॥
सामें[१२], दाम, दंड, भेद, ॥ इंद्रजाळ, मंत्रौषध ॥
सप्तोपाय ऐसे सुबुद्ध । पंडितवर्य बोलती ॥ २ ॥
अंगबळ[१३], सेनाबळ । कोशबळ, दुर्गबळ ।
शस्त्रबळ, मंत्र-प्रभाव-बळ । सुहृ ळ आठवें ॥ ३ ॥

---

६ चांगल्या मनुष्याच्या अंगीं बत्तीस शुभ चिन्हें असतात तीं. ७ व्यापार. ८ प्रेम-सुखाचा माल. ९ प्रकार. १० तारकांबरोबर रममाण होणाऱ्या दुर्वर्तनी चंद्ररूपी पतीसह. ११ तह, वैर, शत्रूवर चढाई, दबा धरून राहणें, फितूर व बलिष्ठ मित्राचा आश्रय हे राजाचे सहा गुण सांगितले आहेत. १२ तडजोड, खंडणी देणें, शिक्षा करणें, फूट पाडणें, जादूटोणा, व मंत्र आणि औषधें यांचे प्रयोग हे राजाचे सात उपाय. १३ अंगचें सामर्थ्य, फौज, खजिना, किल्ले, शस्त्रास्त्रांचा पुरवठा, मंत्री व योद्धे, मित्रांची जोड, तीन वेद व बुद्धिवान् सेवक यांची अनुकूलता, ब्राह्मण, शेष, व पुण्याई यांचें सामर्थ्य, आणि दोस्त राजे अशीं चौदा बळें.

वेदत्रय–बुद्धिबळ । ब्राह्मण–शेष–सुकृत–बळ । अन्य रायाचें साह्यबळ ।
ऐसीं चौदा जाणावीं ॥ ४ ॥ ( मुक्तेश्वर )

पूर्वी भूपति अंबरीष रविच्या वंशीं महात्मा असे ।
धर्में राज्य करी, सदैव भगवद्भक्तांत भावें वसे ॥
भासे सिंहचि संगरांत[१४], गमती तच्छत्रुराजे ससे ।
तो शांतांत[१५] नितांत शान्त कमळा–कान्तींच चित्तें वसे ॥ १ ॥ ( मोरोपंत )

म्हणा मज उताविळा, गुणाचि घेतला; घाबरें ।
असो मन असेंचि बा भजक[१६]–बर्हि–मेघा बरें ! ॥
दिसे क्षणिक सर्व हें, भरंवसा घडीचा कसें ।
धरील मन ? आधिनें[१७] बहु परिभ्रमे चौंक-सें[१८] ॥ २ ॥ ( कित्ता )

नळराजकथा सुधाचि[१९] साजे । दमयन्ती वर–वर्णिनी[२०] विराजे ॥
मिळणी उभयांस होय जेथें । अधिकारी अधिकानुराग[२१] तेथें ॥ ( रघु. पंडित )

एथ चातुर्य सिंहाणें[२२] जालें । प्रेम रुचीसि[२३] आलें ।
आणि सौभाग्य पोखलें[२४] । सुखाचें येथ ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

ऐसें युगीं परि कलीं । आणि महाराष्ट्रमंडळीं[२५] ।
श्री गोदावरीच्या कुळीं[२६] । दाक्षिणिलीं ॥ १ ॥
तेथ भुवनैक-पवित्र[२७] । अनादिपंचक्रोशक्षेत्र[२८] ।
जगाचें[२९] जीवनसूत्र । जेथ श्रीमहालसा[३०] ॥ २ ॥ ( कित्ता )
क्षीरसिंधु[३१]परिसरीं । शक्तिचा कर्णकुहरीं[३२] ।
तेणें कें श्रीत्रिपुरारी[३३] । सांघितलें जें ॥ ३ ॥ ( कित्ता )

---

१४ लढाईत. १५ शांत पुरुषांत अत्यंत शान्त. १६ भक्तरूपी मोरांच्या मेघा ! १७ चिंतेनें. १८ चाकासारखें. १९ अमृत, श्लेषानें चुना. २० चांगल्या जिनसाचें वर्णन करणारी, श्लेषानें हळद. २१ त्या ठिकाणीं अतिशय प्रेम, श्लेषानें तांबडा रंग हेंच पर्यवसान होणार. २२ शहाणें. २३ प्रेमाला शोभा आली. २४ पोसलें. २५ महाराष्ट्र देशांत. २६ दक्षिणेकडील तीराला. २७ सर्व जगांत पवित्र. २८ अनादि पांच कोसांची पवित्र जागा. २९ विश्वाच्या प्राणाचा आधारतंतु. ३० म्हाळसा ( पार्वती ). ३१ क्षीरसमुद्राजवळ. ३२ आदिमाया पार्वतीच्या कानांत. ३३ शंकरांनीं.

# दुसरा पाठ.

## अन्वय किंवा संवाद.

९ वाक्यरचनेंतील दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे अन्वय किंवा संवाद ही होय. वाक्यांतील दोन अथवा अधिक शब्द जेव्हां एकच लिंग, वचन, विभक्ति, पुरुष वगैरे घेतात तेव्हां त्या शब्दांच्या मध्यें परस्पर **अन्वय** किंवा **संवाद** आहे असें म्हणतात. मराठी व्याकरणांत हे संवाद पुढीलप्रमाणें आहेत:—१ कर्त्याचा व क्रियापदाचा संवाद. २ कर्माचा व क्रियापदाचा संवाद. ३ विशेषणाचा व विशेष्याचा संवाद. ४ क्रियाविशेषणाचा व क्रियापदाचा संवाद आणि ५ संबंधी व दर्शक सर्वनामांचा संवाद. आतां त्यांचा क्रमानें विचार करूं.

१० कर्त्याचा व क्रियापदाचा संवाद व्यक्त होतांना वाक्याची जी मांडणी केलेली असते तिला कर्तरि प्रयोग असें म्हणतात. हा प्रयोग, क्रियापद ज्याप्रमाणें सकर्मक किंवा अकर्मक असेल त्याप्रमाणें अकर्म कर्तरि किंवा सकर्म कर्तरि होतो. अशा प्रयोगांत क्रियापद नेहमीं कर्त्याचें लिंग, वचन व पुरुष यांना अनुसरून चालतें. जसें:–'दुर्योधन नृपति पुसे, वैशंपायन कथी सविस्तर तें,' ( मोरोपंत ).

११ मराठींत तीन लिंगें, तीन पुरुष व दोन वचनें आहेत. पैकीं पुरुषांचा व वचनांचा उपयोग साधारणपणें इतर भाषांप्रमाणेंच होतो. प्रथम पुरुषावरून बोलणाराचा, द्वितीय पुरुषावरून ज्याच्याशीं बोलावयाचें त्याचा, व तृतीय पुरुषावरून ज्याच्यासंबंधी बोलावयाचें त्याचा निर्देश होतो. हे तिन्ही पुरुष अनुक्रमें 'मी–आम्ही;' 'तूं–तुम्ही;' 'तो, ती, तें–ते, त्या, तीं;' या सर्वनामांनीं दर्शविले जातात. तथापि केव्हां केव्हां विनोदानें किंवा तिरस्कारानें एखाद्या तृतीय पुरुषी नामावरून प्रथम पुरुषाचा किंवा द्वितीय पुरुषाचा बोध होतो. मात्र अशा नामाला क्रियापद घालावयाचें तें तृतीय पुरुषींच घालावें लागतें. जसें:–'आज खुद्द किंवा अस्मादिक नाटकाला जाणार आहेत.' 'धिंडका ( तूं ) कां आली आहे!'

१२ मराठींत वचनें दोन आहेत. एकवचनावरून एक या संख्येचा व अनेकवचनावरून सामान्यतः एकाहून अधिक संख्येचा बोध होतो. तथापि पुष्कळ वेळां अनेकवचनाची संख्या आपल्या माहितीवरून नक्की ठरवून, तिचा संख्यावाचक विशेषण लावतांना वगरे उपयोग करावा लागतो. जसें:– ' तो पाय ( दोन ) धुवून आला. ' ' विष्णूंच्या ( चार ) हातांत चार आयुधें आहेत. '

१३ केव्हां केव्हां नामाचा सर्व वर्ग दाखविण्याकरितां एकवचनाचा उपयोग करितात. जसें:– ' यंदां शाळू चांगला पिकला आहे. ' ' त्या गांवांत दोनशें उंबरा आहे. ' केव्हां केव्हां अनेकवचनानेंही जातीचा निर्देश होतो. जसें:– ' यंदां शाळू चांगले पिकले आहेत. '

१४ केव्हां केव्हां एका व्यक्तीचा उल्लेख करावयाचा असूनही त्या व्यक्तीबद्दल आदर, बहुमान सलगी किंवा विनोद वगैरे दाखविण्याकरितां अनेकवचनाचा उपयोग करितात. जसें:– ' समर्थ म्हणतात. ' ' त्या ( बायको ) आज मंबईस जाणार आहेत. ' ' आम्ही नाटकाला जाणार जा ! '

१५ अशा अनेकवचनी नामांना विशेषणही अनेकवचनींच घालावं लागतें. पण सबंध जात दर्शविण्याकरितां घातलेल्या एकवचनी नामास विशेषण एकवचनींच येतें, मात्र तें विशेषण संख्यावाचक असेल तर अनेकवचनीं घालावें लागतें. जसें:– ' आमचे काका गांवास गेले. ' ' जाणता माणूस असें करावयाचा नाहीं. ' ' त्या झाडाला गेल्यावर्षी शंभर फणस आला. '

१६ एकाच व्यक्तीच्या नांवाला आडनांव जोडावयाचें असल्यास तें अनेकवचनीं घालतात. पण सलगीनें किंवा तिरस्कारानें केव्हां केव्हां त्याचा एकवचनीही उपयोग करितात. जसें:– ' दामू रानडे. ' पण सलगीनें ' दामू रानडा, ' ' विठू नेना. ' ' बिनी दौलतराव शिंद्याला, कुच करून म्होरं गेला जी ' ( अप्पा यशवंत शाहीर. )

१७ विशेष नामांचें अनेकवचन बहुधा होत नाहीं. पण केव्हां केव्हां सामान्य नामाप्रमाणें त्यांचा उपयोग करून अनेकवचन करितां येतें. जसें:– ' या मंडळींत बरच बाजीराव दिसतात. ' विशेषनामांचें आदरार्थी अनेकवचन करणें असल्यास, त्याला ' राव, पंत, ताई, माई, जी ' वगैरे शब्द जोडतात. जसें:– ' गोविंदराव, यमूताइ, सीतामाई, गंगाजी ' इ०

१८ मनोविकार दाखविणारीं नामें व पदार्थवाचक नामें बहुधा एकवचनीं घालितात. त्याचप्रमाणें कांहीं नामें नेहमीं अनेकवचनींच उपयोगांत येतात. जसें:– ‘ मति, गति, उजेड ’ इ०. त्याचप्रमाणें ‘ वडील ( बाप ), हाल, वन्सें, मामिसें, देवी ( रोग ), कांजण्या ’ इ०.

१९ मराठींत लिंगव्यवस्था फार भानगडीची आहे. ज्या नामांवरून पुरुष जातीचा किंवा स्त्री जातीचा प्रत्यक्षच बोध होतो त्यांचें लिंग सहजच ओळखतां येतें हें उघडच आहे, पण बाकीच्या नामांचीं लिंगें ओळखण्यास कोशावांचून दुसरा मार्ग नाहीं. या बाबतीत मराठीचा प्रकार बहुतेक संस्कृतसारखाच आहे. किंबहुना असेंही म्हणण्यास हरकत नाहीं कीं, संस्कृत नामांचें मूळचें लिंग मराठी शब्दांत बहुधा तसेंच आलें आहे. जसें:– ‘ गुरु, यष्टि, कवि, गण, बाण, धेन, चंद्र ’ इ०.

२० या अडाख्यालाही कांहीं अपवाद आहेत. ‘ विघ्न, आकाश व शपथ ’ हे शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहेत, तर मराठींत ते अनुक्रमें नपंसकलिंगी, नपुंसकलिंगी व स्त्रीलिंगी आहेत. ‘ मित्र ’ शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ‘ उपनिषद् ’ शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी असून मराठींत नपुंसकलिंगी आहे. तथापि मोरोपंतादिकांनीं असल्या शब्दांचा मराठींत उपयोग करितांना त्यांचें संस्कृतांतलें लिंग केव्हां केव्हां उपयोगांत आणलेलें आढळतें.

२१ कांहीं संस्कृत शब्द ‘ पात्र, आस्पद, स्थान, पद, प्रमाण, भाजन, केतन ’ इ०, मराठींत येऊनही नेहमीं नपुंसकलिंगी एकवचनींच राहतात. विशेषतः हे शब्द विधेयाचे पूरक असतांना नपुंसकलिंगी एकवचनींच राहतात. जसें:– सर्वांच्या आज्ञा मला प्रमाण आहेत. ’ ‘माझीं भावंडें अनेक सद्‌गणांचें निधान आहेत.’ इ०

२२ परभाषांतून घेतलेल्या शब्दांना बहुतकरून त्यांच्या अर्थाच्या मराठी शब्दांचें लिंग घालतात. जसें:– ‘ बेळगांवास कॉन्फरन्स ( सभा ) भरली. ’ ‘ माझा कोट ( अंगरखा ) कपाटांत आहे.’ क्वचित् सस्कृत शब्दासंबंधीं सुद्धां असा प्रकार केलेला आढळतो. जसें:– ‘पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ’ ( रघु० पंडित. )

२३ केव्हां केव्हां नामाचा उपयोग सलगीनें किंवा तिरस्कारानें मळचें लिंग बदलून करितात. जसें:– ‘ येगे येगे विठाबाई, ’ ‘ येथलीं वकिलें उपाशीं मरतात, ’ ‘ माझी बाबी ( लाडका मलगा ) ती ’ !

**१४** अकारान्त विशेषण नामाच्या अर्थानें उपयोगांत आणलें असल्यास ज्या नामाकरितां तें घातलें असेल त्या नामाचें लिंग त्यास आहे असें समजावें. 'सकल बोलले' (पुल्लिंगी), 'सकल बोलल्या' (स्त्रीलिंग) इ०.

---

## २ पाठावली.

**परवां भावोजींनीं इतकी शोभा केली तरी उशीरां स्नान करण्याची संवय अजून गेली नाहींसें दिसतें !** (सौभद्र)

**अस्मादिक होते म्हणूनच या थराला गोष्ट आली.** (वा. गो. आपटे)

**हे दागिने कुरूपाला सुरूप करितात, पण सुरूपाला कुरूप करितात.** (शारदा)

**या क्षेत्रीं येऊन जवळ जवळ महिना होत आला. इतक्या अवधींत आम्हीं काय काय केलें ?** (किस्सा)

**वन्सं, शेवटीं संन्याशालाच वरिलेंत पण !** (सौभद्र)

**कॉंग्रेस पुढें एवढी नांवारूपाला आली असतां मीं तिचें वैर केलें नाहीं असें म्हटल्यानें मलबारी शेटजींच्या वृत्तीचें समर्थन कसें होणार ?** (केळकर)

**अशी विहिणींची त्रेधा झाली होती.** (पण लक्षांत०)

**एकदम पन्नास रुपयांची नोट तुजजवळ आली कुठली ? बडा पाताळयंत्री दिसतोस तूं ! कुठें लग्गा साधलास वाटतें !** (जग हें असें०)

**अहमद याप्रमाणें आपल चऱ्हाट वळात असतांना दोन घटका निघून गेल्या.** (उषःकाल)

**मिय्यासाहेबांनीं चुटक्यांचे मांडव यथास्थित रचून खुद्द वजीराच्या लेंकीवरही आपल्या नाजूक पायांचा प्रयोग योजिला होता.** (निबंधमाला)

---

१ धांदल. २ भानगडी करणारा. ३ लाट मारलीस. ४ भाकडकथा सांगत असतांना. ५ मनोराज्य.

बा तुझा चालता काळ ॥ खायाला मिळती सकळ ॥ धृ० ॥
हे कोण बायकोचे मामे । घरांत हिंडती रिकामे ।
साकरसेलियांचे[6] जामे । भोजनभाऊ केवळ ॥ १ ॥ (अमृतराय)
साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासीं शेवटीं करबाडें ॥
मालाचे पैं पेटे वाहतातीं उंटें । तयांलागीं कांटे भक्षावया ॥ (तुकाराम)
पोत घालुनी गळ्यांत फिरती भिल्लांच्या काळ्या पोरी ।
कवीश्वरें चढलीं भारी ॥ १ ॥ (गोविंदाग्रज)
डोळे तुम्ही घ्यारे सुख । पहा राघोबाचें मुख ॥
तुम्ही आइकारे कान । माझ्या राघोबाचे गुण ॥ (तुकाराम)
कसा पिकला गहूं हरभरा। बाळपणींच्या नाना तऱ्हा ॥धृ०॥ (जुनी लावणी)
ऐकें माझी आंगवण । बंदीं घातले सुरगण ।
राम बापुडें तें कोण । मजसीं रण करावया ॥ १ ॥ (एकनाथ)
मी तों न सोडीं एक कवडी । तूतें घालीन बांदवडीं ।
काय नेणसी माझी प्रौढी । करीन वेडीं सुरासुरें[9] ॥ १ ॥ (मुक्तेश्वर)
संपन्न[10] मित्र असतें, तरि येतें संकटांत कामातें ॥ (मोरोपंत)
भीमाच्या तुझियाही पायांचा शपथ सत्य हें कथितों ॥ (कित्ता)
ऐसा स्वप्न विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा ॥ (कित्ता)
स्वार्थ परार्थहि[11] साधिति, जिंकिति शांतिबळें मुखरत्व[12] खलांचें ॥
संत महागुणभाजन[13] यापरि सेवन कोण करी न तयांचें ? ॥ (वामन)
एथ वडिल जें जें करिती । तेया नांव धर्मु ठेविती ।
तोचि एरें[14] अनुष्ठिती । सामान्य सकल ॥ १ ॥ (ज्ञानेश्वर)
जैसें चोहटाचेया[15] बळीं । पांवती सैरा काउळीं ।
तैसीं महापापें कुळीं । प्रविशती ॥ २ ॥ (कित्ता)
बहुत करूनि निःशब्द । दाट[16] न रिगे स्वापद ।
शुक हाने[17] षट्पद । तेयांचें नाहीं ॥ ३ ॥ (कित्ता)

---

६ साखरभाताचे ढीग. ७ पराक्रम. ८ बंदींत, कैदेत. ९ देव व दैत्य. १० श्रीमंत. ११ आपला व दुसऱ्याचा फायदा. १२ दुर्जनांची बडबड. १३ मोठ्या गुणांचें वसतिस्थान. १४ इतर लोक. १५ चव्हाट्यावर टाकलेल्या भाताच्या गोळ्यावर. १६ श्वापदांची विशेष ये-जा नाहीं. १७ पोपट आणि भुंगे यांचें इतकेंसें नाहीं, म्हणजे ते कमी अधिक आले गेले तरी त्याची फिकीर नाहीं.

# तिसरा पाठ.



## संवाद.



२५ कलम ६ मध्यें सांगितलेलीं 'असणें, होणें, दिसणें, भासणें, बनणें, गमणें, ठरणें, उतरणें' वगैरे जीं क्रियापदें नुसतींच वाक्याचा अर्थ पूर्ण करूं शकत नाहींत, त्यांचा उपयोग करितांना एखादा विधेयपूरक शब्द घालावा लागतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हा शब्द एखादें नाम, सर्वनाम, विशेषण, नामवाक्य, किंवा क्वचित् एखादा विभक्त्यंत शब्दही असूं शकतो. अशा वेळीं क्रियापद नेहमीं कर्त्याचें लिंग, वचन, व पुरुष यांस अनुसरतें. जसें:– 'तो एक राक्षस आहे,' 'तुझा अभ्यास म्हणजे नगाऱ्याचें बडवणें आहे,' 'तो मला मोठ्या एटींत दिसला.' इ०

२६ पण कर्त्यापेक्षां विधेयपूरकाला जर अधिक महत्त्व द्यावयाचें असेल तर क्रियापद विधेयपूरकाला अनुसरून ठेवतात. जसें:– 'वक्तृत्व चांगली कला ठरली आहे.' 'देवाचा प्रसाद मला आळशाला गंगा झाली.'

२७ विधेयपूरक स्वतः जर एखादें विशेषण असेल तर तें कर्त्याचें लिंग व वचन घेतें, पण तें जर एखादें नाम असेल, तर आपलें लिंगवचन स्वतंत्र राखतें. जसें:– 'तें फूल पांढरें भासतें.' 'तुम्ही माझ्या दुःखाचें कारण झालांत.'

२८ 'करणें, बनविणें, म्हणणें, बोलणें, मानणें, समजणें, मागणें, नेमणें, योजणें,' वगैरे कांहीं सकर्मक क्रियापदांचा अर्थ एक कर्म घालून पुरा होत नाहीं. तो पुरा होण्याकरितां दुसरें एक पूरक कर्म घालावें लागतें. जसें:– 'मी तला चतर मानतों.' 'ते त्याला आपला म्होरक्या नेमतील.' अशा क्रियापदांचा कर्मणि प्रयोग केला म्हणजे मुख्य कर्म प्रथमेंत येऊन क्रियापद त्याला अनुसरतें व पूरक कर्म विधेयपूरक होऊन राहतें. जसें:– 'हा सज्जनीं आपला म्हणितला' (ज्ञानेश्वर), 'मला कुणबी केलों' (तुकाराम).

२९ अशा प्रयोगांत क्रियापद, प्रथमेंत कर्तृस्थानीं आलेल्या मुख्यकर्माचें लिंग, वचन, व पुरुष घेतें, व पूरक कर्म कर्तृस्थानीं आलेल्या कर्त्याची प्रथमा विभक्ति मात्र घेऊन आपलें लिंगवचन स्वतंत्र राखतें. जसें:– ' चारुदत्त गांवाचें भूषण मानला किंवा समजला जाई. '

३० वाक्यांत जेव्हां एखादें वाक्य किंवा शब्द-समुदाय कर्ता असतो, तेव्हां त्याच्यापुढें ' हें ' किंवा ' असें ' असा एखादा शब्द बहुधा घालतात, व क्रियापद त्या शब्दाला अनुसरतें. जसें: - " खोटें भाषण करणें हें महापाप आहे. " ज्या वेळीं असा शब्द घातलेला नसतो, त्यावेळीं क्रियापद विधेयपूरकास अनुसरतें. जसें:– ' शब्दांचें चऱ्हाट वळत बसणें शुद्ध कालहानि झाली. '

३१ दोन किंवा अधिक प्रथमा विभक्तींतले शब्द, ' आणि ' ' व ' वगैरे उभयान्वयी अव्ययानें जोडलेले असून, जर एकाच क्रियापदाचे कर्ते असतील तर क्रियापद त्यांचें जोड वचन म्हणजे अनेकवचन घेतें. पण लिंगाचे बाबतींत मात्र कर्ते निवळ पुल्लिंगी असल्यास क्रियापद पुल्लिंगीं, कर्ते निवळ स्त्रीलिंगीं असल्यास क्रियापद स्त्रीलिंगीं, व कर्ते मिश्रलिंगीं, असल्यास क्रियापद नपुंसकलिंगीं राहतें. जसें:– ' रामा, व गोविंदा शाळेस गेले. ' ' मनी आणि मथुरा शाळेस गेल्या. ' ' रामा, गोविंदा, मनी व मथुरा शाळेस गेलीं. '

३२ पण मिश्र कर्ते असून त्यांत जर एखादा मनुष्येतर प्राणी किंवा निर्जीव पदार्थ कर्ता असेल, तर क्रियापद बहुधा आपल्या शेजारच्या कर्त्याच्या लिंगवचनास अनुसरतें. जसें:– ' गडी व गाडी शेताकडे आतांच गेली. ' ' आमच्या घरीं भांडीं, दिवे व खुर्च्या आणल्या आहेत. ' ' विश्रांतिही विरहखेदहि फार झाला ' ( रघु० पंडित ).

३३ जेव्हां क्रियापदाचे कर्ते मिश्र पुरुषांचे असतील, तेव्हां कर्त्यांत प्रथम पुरुषास सर्वांत अधिक प्राधान्य, तो नसल्यास द्वितीय पुरुषास प्राधान्य व तोही नसल्यास तृतीय पुरुषास प्राधान्य देऊन क्रियापद त्या पुरुषास अनुसरतें. जसें: – ' मी व तूं काल पुष्कळ फिरलों. ' ' तो व तूं काल पुष्कळ फिरलांत. ' ' तो व ती काल पुष्कळ फिरलीं. ' 'कर्ण म्हणे, त्या मत्स्या ग्रासूं आम्ही, तुम्ही, समस्त बक ॥ ' ( मोरोपंत ).

३४ जेव्हां दोन किंवा अधिक कर्ते, 'किंवा' अशा अर्थाच्या विकल्पदर्शक अव्ययानें जोडले असतील, तेव्हां क्रियापद आपल्या शेजारच्या कर्त्यास सर्व बाबतींत अनुसरतें. जसें:- 'मी किंवा गोविंदा हें काम करील.' 'तुझीं चाकरमाणसें किंवा तूं जा.'

३५ क्रियापदाला अनेक कर्ते असून, त्यांच्या निदर्शनासाठीं जर एखादें दर्शक सर्वनाम किंवा संख्यावाचक विशेषण अखेरीस घातलें असेल, तर क्रियापद त्या दर्शक सर्वनामास किंवा संख्यावाचकास अनुसरतें; पण खुद्द तें दर्शक सर्वनाम किंवा संख्यावाचक, कलम ३१ मध्यें सांगितलेल्या नियमानुसार कर्त्यांच्या लिंगवचनास अनुसरतें. जसें:- 'राम व लक्ष्मण हे वनास गेले.' 'राम, लक्ष्मण व सीता, तिघें वनास गेलीं.' 'पैशाचा मुळींच उपयोग न करणें, व पैशाचा फाजील दुरुपयोग दोन्हीं सारखींच असमंजस आहेत.'

३६ कर्मणि प्रयोगांत कर्तरि प्रयोगांतला कर्ता तृतीयेंत घालतात व कर्म प्रथमा विभक्तींत ठेवतात; अर्थात् क्रियापद त्याला अनुसरून चालतें. जसें:- 'त्यानें लेखणी केली.' ह्या प्रयोगांत देखील प्रथमा विभक्तींत जर अनेक कर्में असतील, तर पूर्वीचे सर्व नियम त्यांना लागतात. जसें:- 'तूं व मी देवानें सारखेच गांजलों आहोंत.' 'मास्तरांकडून मुलगे व मुली सारखींच चोपलीं जातील.'

३७ भावे प्रयोगांत कर्ता तृतीयेंत किंवा क्वचित् चतुर्थींतहि असतो आणि कर्म सप्रत्यय द्वितीयेंत असतें. ह्या प्रयोगांत क्रियापद नेहमीं तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगी एकवचनी असतें. जसें:- 'नरदेहा यावें, हरिदास व्हावें.' ( तुकाराम ). 'रामानें रावणास मारिलें.' 'हरि ! मला चालवेना.'

३८ कर्मणि प्रयोगांत क्वचित् क्रियापदाला तृतीयान्त कर्त्याचा पुरुष व प्रथमान्त कर्माचें लिंगवचन देऊन रचना केली जाते. हा प्रचार घरगुती बोलण्यांत विशेष आढळतो. जसें:- 'तुम्हीं पुस्तकें वाचलींत.'

३९ समासांत जरी अनेक कर्ते असले तरी पूर्वीच्या नियमांस अनुसरूनच क्रियापद घालावें लागतें. जसें:- 'सीता-राम-लक्ष्मण वनास गेलीं.'

---

## ३ पाठावली.

अग, ही शारदा येत्या वैशाखांत त्या श्रीमंतांची अर्धांगी[१] होणार. (शारदा)

तूं तरी मोठी हॄच दिसतेस ! अग अशा साखरथट्टेला कां कोणी रुसतें ! (कित्ता)

पण ही मीमांसा[२] आतां बस्स झाली; हा सूर्य व हा जयद्रथ उभा आहे. (तोत. बंड)

कालिदास, भवभूति, बाणभट्ट यांच्यासारखे कवि सरस्वती देवीच्या गळ्यांतले ताईत होत. (निबंधचंद्रिका)

दुर्गीचा नवरा लग्नांत गोरागोमटा पण पुढें असा कपाळकरंटा निघाला कीं, लाख रुपयांची मालमत्ता उधळून टाकून अन्नान-दशेस लागला. (पण लक्षांत॰)

आमचे आजोबा म्हणजे भांडणारे कसले वस्ताद ! पण त्यांनीं सुद्धां हात टेकले ! (कित्ता)

कोणा तरुणांचे गळे कापण्यासाठीं परमेश्वरानें हीं कृष्णकार-स्थानें[३] करून ठेविलीं आहेत नकळे. (भावबंधन)

मला किती दिवस एकसारखी दुर्मणी[४] लावली होतीस, कीं पोरगी वाढत चालली, तिला स्थळ नाहीं कां बघायचें, लोक हंस-तात, असें न् तसें, एक हजार गोष्टी. (शारदा)

---

आर्जविलें बहु लवणभंजनें[५] व्याह्यां जावाया ॥
उदार कर कधिं नाहीं केला पैसा एक वाया ॥ (विठोबा अण्णा)

विवेकसागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥
मरोनीया जावें । बा माझ्याच्या पोटा यावें ॥
ऐसें करीगा माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥
जाइन वोवाळोनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ १ ॥ (जनाबाई)

---

१ बायको. २ चिकित्सा, चर्चा. ३ कपट कृत्यें (काळ्या बायका). ४ तगादा. ५ नम्र-तेच्या देखाव्यानें.

श्रीरामें मुकुट घेऊन । पाचारिला बिभीषण ।
त्याचे मस्तकीं आपण । संतोषोनी घातला ॥ १ ॥ (एकनाथ)

कावि मुमुक्षूंचें[६] अंजन । कावि साधकांचें[७] साधन ।
कावि सिद्धांचें[८] समाधान । निश्चयात्मक ॥ १ ॥

कावि प्रेमळांची प्रेमळ स्थिति । कवि ध्यानस्थांची ध्यानमूर्ती ।
कावि उपासकांची वाड[९] कीर्ति । विस्तारली ॥ २ ॥ (दासबोध)

---

गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें । वेणुध्वनी मिसळिला मृदु वासुदेवें ॥
आपाद[१०]-कंठ वनमाळ अशी विराजे । ते सेविती मधुप[११] होउनि देवराजे ॥ १ ॥ (वामन)

तिघें पावलों अत्रिच्या आश्रमातें । तयाची वधू ते हरी वो श्रमातें ॥ (कित्ता)

मलिन रुधिर-मांसावेगळें हाड देवें ॥
अवचट मिळतां तें श्वान संतोष पावे ॥
क्षुधितहि गजहंता[१२] जंबुकातें न मारी ॥
अवसरिं समजावी क्षुद्रता आणि थोरी ॥ १ ॥ (कित्ता)

उपजणें मरणें न चुके नरा । फिरत नित्य असे भव-भोंवरा ॥
उपजला तरि तोचि मला गमे । कुल[१३] समुन्नति ज्यास्तव घे, रमे ॥२॥

झाले[१४] धनी पुढिल याचक या नळाचे ॥
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ॥
त्यांहींच ते सकळ पूरित-काम केले ॥ १ ॥

---

६ प्रपंचांतून सुटूं इच्छिणारांचें. ७ परमार्थ साधणारांचें. ८ आत्मरूप झालेल्या साधूंचें. ९ उमाप, मोठी. १० पायापासून डोक्यापर्यंत. ११ भृंगे. १२ सिंह. १३ ज्याच्यामुळें कुळास मोटेपणा येतो, व तें सुखी होतें. १४ नळ राजाकडे प्रथम आलेल्या याचकांना इतका पैसा मिळाला कीं, त्यांना परत जात असतां वाटेंत जे मागाहून आलेले याचक भेटले, त्यांच्या इच्छा त्यांनीं तेथेंच तृप्त केल्या. त्यांना नळाकडे जाण्याची गरज ठेवली नाहीं असा भाव.

तो वन्हि, तो वरुण, तो यम, इंद्र गा मी ॥
झालों तुला विदित हे सकळ स्वनामीं ॥
बोले महीरमण[15] हा नल चंद्रवंशी ॥
वंदी पदास तुमच्या तुमचाच अंशी[16] ॥ २ ॥ (रघु० पंडित)

ती, भुलले सुर–हरि–हर पाहुनि लोकैक[17]–सुंदरा ज्याला ॥
ब्रह्मनियोगें[18] दावी तें मोहक वदन सुंद राजाला ॥ १ ॥ (मोरोपंत)

व्रजावन[19] करावया बसविलें नखाग्रीं धरीं[20] ॥
सलील तइं[21] मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरां ॥
वराहतनु[22] घेउनी उचलिली रदाग्रें धरा ॥
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ! ॥ २ ॥ (केकावली)

स्तुति कांहिं न बोलणें । पूजा कांहिं न करणें ।
सांनिधि[23] केंहीं न होणें । तूझा ठांई ॥ १ ॥

ऐसा गीता वैष्णउ प्रासादु[24] । अठरावा कलशु विशदु ।
मियां म्हणितला हा भेदु[25] । जाणोनियां ॥ २ ॥ (ज्ञानेश्वरी)

---

१५ नळराजा. १६ अंशापासून झालेला. १७ सर्व जगांत सुंदर अशा. १८ ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें. १९ गोकुळाचें रक्षण. २० पर्वताला. २१ समुद्रमंथनाच्या वेळीं (विष्णूंनीं कासव होऊन मंदर पर्वताखालीं पाठ दिली होती). २२ डुकराचा देह (वराहअवतार). २३ तुझ्या रूपांत गडप होणें म्हणजेच तुझें सांनिध्य. २४ गीतारूप विष्णूंचा राजवाडा. २५ फरक. सूक्ष्म तफावत. भगवद्गीता कोणी नुसतीच म्हणतात, कोणी लोकांच्या तोंडून ऐकतात, आणि कोणी तिच्या अर्थाचें मनन करितात, पण राजवाड्यांत ज्याप्रमाणें वेगवेगळ्या अधिकाराच्या माणसांचा समावेश होतो, त्याप्रमाणें गीता आपल्या सर्व भक्तांची सोय लावते असा आशय.

# चवथा पाठ.

## संवाद.

४० मराठींत विशेषण हें विशेष्याचें लिंग, वचन व विभक्ति घेतें. जसें:- 'तो भला आहे.' 'नीचपण बरवें देवा' (तुकाराम). विशेषणाचा विशेष्याहून क्रियेच्या अर्थाकडे अधिक संबंध पोंचत असल्यास तें क्रियापदाच्या जवळ येतें, एरवीं विशेष्याचे आधीं येतें, व 'अस, हो' वगैरे धातूंच्या उपयोगांत तें विशेष्यानंतर येतें. जसें:- 'तो गायक धृपद चांगलें गातो.' 'हा लब्बाड मनुष्य आहे.' 'दुरून पर्वत निळे दिसतात.'

४१ आकारान्त विशेषणांस विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणें विकार होतात; व विशेष्य सविभक्तिक असल्यास विशेषणाचें फक्त सामान्य रूप होतें. जसें:- 'चांगला मुलगा,' 'चांगल्या मुली.' 'चांगल्या मुलास' इ०.

'चा' प्रत्ययान्त विशेषणें व 'ला' प्रत्ययान्त विशेषणें यांचें सामान्यरूप 'आ' किंवा 'ए' स्वरांत विकल्पानें होतें. जसें:- 'हरीचे किंवा हरीच्या घरीं.' 'केले कामीं किंवा केल्या कामीं.'

४२ आकारान्त विशेषण असून त्याचा एकाच वेळीं अनेक नामांकडे संबंध असल्यास तें जवळच्या नामाप्रमाणें चालतें. जसें:- 'त्याला मोठा भाऊ व बहीण आहे.'

४३ एकाच विशेषणानें अनेक विशेष्यें उद्दिष्ट असतां, विशेष्यें पुल्लिंगी असल्यास विशेषण पुल्लिंगीं, विशेष्यें स्त्रीलिंगी असल्यास विशेषण स्त्रीलिंगी, आणि विशेष्यें मिश्रलिंगी असल्यास विशेषण नपुंसकलिंगी, अनेकवचनीं येतें. जसें:- 'विष्णु आणि गोविंदा भले आहेत.' 'मनी आणि यमू चांगल्या आहेत.' 'मनी आणि गोविंदा चांगलीं आहेत.'

पण अनेक विशेष्यांवरूनही जर एकाच किंवा सजातीय कल्पनेचा बोध होत असेल तर विशेषण एकवचनींच राहतें. जसें:- 'माझें घरदार.' 'तुझी शेतवाडी.'

४४ अनेक विशेष्यांच्या पुढें तद्दर्शक 'हा,' 'असा' वगैरे एखादा शब्द घातला असल्यास विशेषण त्या शब्दाला अनुसरतें. खुद्द 'हा' किंवा 'असा' वगैरे शब्द विशेषणें असून ते पूर्वीच्या विशेष्यांचें लिंगवचन नियमाप्रमाणें अनुसरतात; पण त्यांच्यापुढें एखादें वेगळें विशेष्य असल्यास त्याचें लिंगवचन अनुसरतात. जसें:— 'विनू व पांडू हे चांगले आहेत.' 'रामा, हरी व विनू हीं चांगलीं मुलें आहेत.'

क्वचित् असें विशेष्य पुढें नसलें तरी 'हा' किंवा 'असा' हे शब्द जवळच्या नामाचें लिंग व साऱ्या नामांचें एकत्रित वचन घेतात. जसें:— 'मनी, नाना, व विष्णू हे बागेंत खेळताहेत.'

४५ कलम २८ मध्यें सांगितलेल्या द्विकर्मक क्रियापदांच्या उपयोगांत, आकारान्त विशेषण क्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म असून प्रत्यक्ष कर्म अप्रत्यक्ष द्वितीया विभक्तींत असल्यास, विशेषणाचें सामान्य रूप होत नाहीं. जसें:— 'त्यानें आपले हात शाईनें काळे केले.' परन्तु प्रत्यक्ष कर्म सप्रत्यय द्वितीयेंत असल्यास अप्रत्यक्ष कर्म असलेलें विशेषण बहुधा नपुंसकलिंगी एकवचनीं असतें. जसें:— 'लोक त्याला चांगलें म्हणतात.'

४६ विशेषणांची द्विरुक्ति झाली म्हणजे त्यांचे तीन अर्थ होतात. १ निरनिराळे विभाग. जसें:— 'प्रत्येकास एकेक करंजी घाल.' २ क्रमानें चढ किंवा उतार. जसें:— 'ढगाचा रंग हिवाळ्यांत पांढरा पांढरा होत जातो.' ३ आधिक्य किंवा प्रकर्ष. जसें:— 'पाणी कसें गार गार आहे!'

४७ परस्परांना विरोधी अर्थाचीं किंवा परंपरा दाखविणारीं दोन किंवा अधिक विशेषणें एकत्र जोडून एकाच विशेष्यास घातलीं असतां तीं विशेष्यासंबंधीं सर्व प्रकारांचा समावेश दाखवितात व विशेष्याचें लिंग अनुसरतात. अशा वेळीं विशेषणें अनेक असलीं तरी, विशेष्य एकवचनी असल्यास विशेषणें एकवचनीच राहतात. जसें:— 'लहान मोठें शंभर पान होईल.' 'बसती उठती सवाष्ण सांगा.'

४८ मराठींत 'चा' हा षष्ठीचा प्रत्यय लागून गुणदर्शक विशेषण तयार होतें व तें विशेष्याचें लिंगवचन अनुसरतें. जसें:— 'काळ्या रंगाचा घोडा.' 'सचोटीचा माणूस.' इ०.

पदार्थांचा भाव सांगण्याकडे केव्हां केव्हां या विशेषणांचा उपयोग होतो. जसें:— ' मी तीन शेरांचे ( म्हणजे रुपयास तीन शेर मिळणारे ) गहूं घेतले. '

केव्हां केव्हां षष्ठ्यन्त विशेषणाचें नाम त्याच विशेषणाचें विशेष्य होऊन पुढें येते व त्यावरून समाहाराचा, तिरस्काराचा वगैरे बोध होतो. अशा वेळीं षष्ठ्यन्त विशेषणाचें रूप विशेष्याच्या रूपाप्रमाणें फिरतें. जसें:— ' घरच्या घरीं होईल तो उद्योग कर. ' ' गांवचे गांव उजाड पडले. '

४९ संस्कृत भाषेंत विशेष्यें व विशेषणें यांत कांहीं फरक मानलेला नाहीं, त्यामुळें विशेष्याचे सर्व संस्कार विशेषणाला होतात. मराठींत अकारान्ताखेरीज इतर विशेषणें विशेष्याचें लिंगवचन घेऊन विभक्तीच्या ऐवजीं सामान्य रूप घेतात. अकारान्त विशेषणांना कांहींच विकार होत नाहीं. पण जुन्या कवितेंत व क्वचित् घरगुती बोलण्यांत विशेषणांना विशेष्यांप्रमाणें विभक्ति लावतात. जसें:— ' योगींद्रें अवलोकिलेंहि करुणा–लीलालयें नारदें ' ( मोरोपंत ). ' तुम्हां पोरांना काय समजतें. ? '

५० मराठींत विशेषणाची योग्यता विशेष्याहून जरी अमळ गौण मानली असली, तरी विशेषण एखादे वेळीं विशेष्यादाखल घालण्यांत येतें, व मग तें विशेष्याप्रमाणें स्वतंत्र लिंगवचन विभक्ती घेतें. जसें:— ' तो खरं बोलतो. ' ' एकानें करावें व दुसऱ्यानें भरावें हा न्याय नव्हे. ' ' खोटें किती सजाविलें तरी टिकत नाहीं. '

५१ आपण हें सर्वनाम विशेषण असून त्याचे अर्थ १ आम्ही, २ तुम्ही, ३ तुम्ही व आम्ही, आणि केव्हां केव्हां ४ सर्व लोक, असे होतात. विशेष्याचे जागीं तें एकटेंच आल्यास अर्थानुरोधानें क्रियापदाचा पुरुष घालावा लागतो. जसें:— ' आपण ( सर्व माणसें ) ईश्वराचीं लेंकरें आहों. ' ' आपण ( तुम्ही ) जेवायला बसा. '

५२ अव्ययाला सामान्यतः विकार होत नाहीं; पण विशेषणांपासून बनविलेलीं अव्ययें किंवा क्रियाविशेषणें केव्हां केव्हां विकार पावतात. विशेषेंकरून ' आ ' नें अन्त होणारीं क्रियाविशेषणें, अकर्मक क्रियापद असल्यास कर्त्याचें लिंगवचन; व सकर्मक क्रियापद असल्यास कर्माचें लिंगवचन घेतात. जसें:— ' तो माझ्याशीं चांगला वागला. ' ' तो काम चांगलें करितो. '

परन्तु कर्ता व कर्म जर प्रत्ययान्त असतील किंवा गुप्त असतील तर क्रियाविशेषण नपुंसकलिंगीं एकवचनीं राहतें. जसें:– ' त्यानें मला कसें बोलावें ? ' ' कसें होणार कोण जाणे ! '

५३ ' आ 'कारान्त क्रियाविशेषणाला दुसरें ' आ 'कारान्त क्रियाविशेषण आलें असल्यास दोन्ही एकाच लिंगवचनांत राहतात. जसें:– ' हें काम त्यानें कसें चांगलें केलें ! '

५४ एकच जातीच्या दोन शब्दांचा एकाच शब्दांत अंतर्भाव होऊन एकशेषद्वंद्व समास झाला असेल तर, व त्या मूळच्या दोन शब्दांचीं लिंगें भिन्न असतील तर, विशेषण नपुंसक लिंगी अनेकवचनीं येतें. जसें:—' तीं भांवंडें ( बहीण व भाऊ ). ' हरीभाऊंचीं नातवंडें ( नातू व नाती ) ', ' माझीं आईसें ( आईबाप ).' एकशेषद्वंद्व समास मिश्रलिंगी नामांपासून होत असल्यामुळें ते मराठींत नपुंसक लिंगीच असतात, पण क्वचित् त्यांचें पुल्लिंग मानून त्यांना पुल्लिंगी विशेषणही योजिलेलें आढळतें. जसें:—' शोभविती दंपती तसे स्वरथा ' ( मोरोपंत ).

---

## ४ पाठावली.

**भलतेंच कांहीं तरी ! माझे बाबा कांहीं असे उलट्या काळजाचे नाहींत !** ( शारदा )

**हा पुकारा शहरांत होतांच मग काय विचारतां ? टोळधाडीप्रमाणें लोकांचे थवेच्या थवे येऊन कोसळले.** ( सौभद्र )

**माझ्यावरचें हें संकट नाहींसें होऊन मनासारखें कधींग घडून येईल !** ( कित्ता )

**पण मला आपण आपली तसबीर द्यायची कबूल केली होती ना ! कां लोणकढी दिलीत ?** ( फाल्गुनराव )

**ही सुतानें स्वर्गास जाणारी कृत्तिका आहे, समजलीस ?** (कित्ता)

**ज्ञानसंपन्नतेच्या संबंधानें हे आणि त्यांचे चाकरनोकर ह्यांत कांहीं एक अंतर नव्हतें. ते शुंभ[1] तसे हे शुंभ !** ( ओक )

---

[1] ठोंब्या, मूर्ख.

अरे बापरे ! घातवार, व्यतिपात[2], संक्रांत, किंक्रांत[3], मरीआई[4], बारावा बृहस्पति[5], साडेसाती सारीं एकदम उमटलीं ! ( भावबंधन )

लतिके, हीं कोळशांतलीं माणिकें[6] उघड्यावर टाकूं नकोस म्हणून आपल्या बाबांना बजावून सांग. ( कित्ता )

---

माप आणि गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥ ( तुकाराम )
बीजा ऐशीं फळें । उत्तम कीं अमंगळें ॥ ( कित्ता )
तनुमनधन-माझें राघवा रूप तूझें ॥
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें ॥
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ॥
अचल भजन-लीला लागली आस तूझी ॥ १ ॥ ( रामदास )

लोभ, माया, दंभ, अहंकार, । हे देहीं दिसती अनिवार ।
म्हणोनि स्वामिदर्शनासि सत्वर । आलों साचार निजप्रेमें ॥ १ ॥
( महीपती )

लंडे[7], गुंडे[8], हिरसे[9] तट्ट यांची संगत धरूं नको ॥ ( अनंतफंदी )
उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको ॥ ( कित्ता )
समता, संतोष, सविवेक । चौथा साधुसंग देख ।
यांसी करूनियां सख्य । प्रियभावें असती कीं ॥ १ ॥

काम-क्रोध-लोभ-त्रया । मोह मद मत्सर यया ।
वर्जिल्या[10] नियोजिल्या ठाया । जाणसी कीं जाणल्या ॥२॥ ( मुक्तेश्वर )

चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा ॥
पद्मावांण तळें, निरक्षरें[11] मुखीं जो साजिरा गोजिरा ॥

---

२ एक कुयोग. ३ संक्रांतीची कर. ४ पटकी, महामारी. ५ बारावा गुरु फार अशुभ मानला आहे. ६ काळ्या कुळकुळीत मुली. ७ अविचारी. ८ गुंड. ९ खोडकर मनुष्य. १० कामक्रोधादि मनोविकार कोठें वर्ज्य आहेत व कोठें येऊं द्यावे तीं स्थळें तुला ठाऊक आहेतना? ११ दिसायला गोरागोमटा पण अक्षरशत्रु, मूर्ख.

दात्याला धनलोभ, नित्य वसतें दारिद्य विद्वज्जनीं ॥
दुष्टांचा पगडा महीपतिगृहीं[12] हीं सात शल्यें मनीं ॥ १ ॥ (वामन)

---

विलासभोगास्तव[13] यांस पंडिता ! वनागमीं हेतु न जाहली रती ॥
करावयातें जनकोक्ति सार्थ, हीं वनेचरें वल्कलवास दंपती ॥ १ ॥
(वनविहार)

विपत्कालीं[14] धैर्य, प्रभुपणिं[15] सहिष्णुत्व बरवें ॥
सभे पांडित्याचा प्रसर[16], समरीं शौर्य मिरवे ॥
सुकीर्तीच्या ठायीं प्रचुर[17] रति, विद्याव्यसन जें ॥
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे ॥ १ ॥ (वामन)

तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त[18] लोहांतरीं ॥
तें भासे नलिनीदलीं[19]वरि पहा सन्मौक्तिकाचे परी ॥
तें स्वातीस्तव[20] अब्धि-शुक्ति-पुटकीं मोतीं घडे नेटकें ॥
जाणा उत्तम-मध्यमाधम दशा संसर्गयोगें टिके ॥ २ ॥ (किता)

पदाब्ज-रज[21] जें तुझें सकल-पावनाधार[22] तें ॥
अघाचलांहि[23] तारिले बहु तुवांचि राधा-रतें ॥
अजामिळ[24], अघासुर[25], व्रजवधू[26], बकी[27], पिंगळा[28] ॥
अशां गति दिली; उरे न तृण भेटतां इंगळा[29] ॥ १ ॥ (केकावली)

---

१२ राजाच्या दरबारांत. १३ हीं नवराबायको (रामसीता) प्रेमाचे सुखोपयोग घेण्याकरितां वनास आलीं नाहींत, तर वडिलांचे शब्द खरे करून दाखविण्याकरितां आलीं आहेत. १४ संकटाच्या वेळीं. १५ सत्ता असतांना. १६ उत्कर्ष, प्रभाव. १७ फार आवड. १८ तापलेल्या लोखंडावर. १९ कमळाच्या पाकळीवर. २० स्वाती नक्षत्राच्या पावसानें समुद्रांतील शिंपल्याच्या पोटांत उत्कृष्ट मोतीं होतें. २१ पायरूपी कमळांतील धूळ, रेणु. २२ सर्व पवित्र पदार्थांचा आधार. २३ पापाचे पर्वतच असे लोक. २४ कान्यकुब्ज देशांत होऊन गेलेला एक पापी ब्राह्मण, यानें आपल्या शूद्रस्त्रीपासून उत्पन्न झालेल्या मुलाला 'नारायण ये' अशी हाक मारली त्यावरून परमेश्वरानें येऊन त्याचा उद्धार केला अशी कथा आहे. २५ कंसाच्या पदरचा एक राक्षस, हा सर्पदेह धारण करून आला असतां यास कृष्णानें मारलें. २६ गोकुळांतील गौळणी. २७ पूतना राक्षसी. कृष्णानें स्तनपानांत रक्तशोष करून हिला मारली. २८ मिथिला नगरींतील एक वेश्या. पोपटास पढवितांना हिच्या तोंडून 'राघोबा' असे शब्द निघत होते तेवढ्यावरून परमेश्वरानें तिचा उद्धार केला. २९ अग्नीच्या निखाऱ्याला.

नातरि प्रलय[30]वान्हि महावातु । एयां दोघां जैसा सांघा[31]तु ।
तैसा हा गंगा[32]सुतु । सेनापती ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर
जैसें काष्ठें काष्ठ[33] माथिजे । तेथ वन्हि एकु उपजे ।
तेणं काष्टजात जालिजे । प्रज्वललेनि ॥ २ ॥ ( कित्ता )
तवं तुझी एकएाकि नवा[34]ई । एथ उपदेशामाझि गां[35]वाइं ।
तरि अनुसरलेया काई । वो[36]ज सांघे ॥ ३ ॥ ( कित्ता )

---

३० प्रळयकाळचा अग्नि. ३१ मेळ, संगत. ३२ भीष्म. ३३ लाकडावर लाकुड घासून जो अग्नि उत्पन्न होतो तो भडकून सगळ्याच लाकडांना जाळून टाकतो. ३४ नवल. ३५ विनोद मस्करी. ३६ चांगलें, ठीक.

# पांचवा पाठ.

## संवाद.

५५ मराठींत ' जो, जसा, जसला, जसलाला, जितका, जितकाला, जेवढा, जेवढाला ' हीं प्रचारांतलीं संबंधी सर्वनामें असून ' तो, तसा, तसला, तसलाला, तितका, तितकाला, तेवढा, तेवढाला, ' हीं त्यांच्या बरोबरीचीं दर्शक सर्वनामें आहेत. कवितेंतून ' जैसा, ' जेउता, ' जेतुला, ' आणि ' तैसा, ' ' तेउता ' ' तेतुला ' अशाही जोड्या ' जसा, जेवढा, जितका ' वगैरे अर्थी आलेल्या आढळतात.

५६ संबंधी सर्वनामें व दर्शक सर्वनामें यांचा लिंग व वचन यांत संवाद असतो. जसें:—' जो करील तो भरील. ' ज्या गौणवाक्यांत संबंधी सर्वनाम असेल तें गौणवाक्य मिश्रवाक्याच्या आरंभीं येतें. कवितेंत मात्र क्वचित् हा नियम पाळीत नाहींत.

५७ संबंधी व दर्शक सर्वनामें प्रथम पुरुषी किंवा द्वितीयपुरुषी सर्वनामांना विशेषणादाखल वाक्यांत आलीं असतांना, लिंग व वचन त्या त्या पुरुषवाचक सर्वनामाचें घेतातच, पण क्वचित् विभक्ति देखील घेतात. अशा वेळीं क्रियापद पुरुषवाचक सर्वनामाला अनुसरतें. जसें:– ' मी जो आज इतक्या लांबून आलों तो खुळा म्हणून कीं काय ? '

५८ संबंधी वाक्यांत एखादें विशेष्य आलें असल्यास तें दर्शक सर्वनामालाच जोडून घातलें पाहिजे असा इंग्रेजींत निर्बंध आहे; पण संस्कृतांत आणि मराठींत तें संबंधी सर्वनाम अथवा दर्शक सर्वनाम यांतून कोणासही जोडून दिलें तरी चालतें. जसें:– ' जो मनुष्य तूं पाहिलास तो हा. ' ' जो तूं पाहिलास तो हा मनुष्य. '

५९ संबंधी सर्वनामांचा दर्शक सर्वनामांशीं संवाद लिंगवचनांपुरताच असतो. त्यांची विभक्ति ज्या वाक्यांत तीं येतात त्यांतलि अर्थानुरोधानें वेगळी होऊं

शकते. जसें:– ‘ जो जो मनुष्य भेटेल त्याला त्याला आमंत्रण दे. ’ ‘ जे हस-तील त्यांचे दांत दिसतील. ’

६० अनेक विशेष्यांना विशेषण होऊन जर सर्वनाम आलें असेल तर, एकाच लिंगाचीं विशेष्यें असल्यास, त्यांचें लिंग व एकत्रित वचन घेतें; पण मिश्रलिंगी विशेष्यें असल्यास सर्वनाम नपुंसकलिंगी अनेकवचनीं राहतें. अशा वेळीं सर्व-नामास ‘ कोण ’ किंवा ‘ कोणी ’ हा शब्द जोडून देण्याची चाल आहे. जसें:– ‘ जे कोणी बद्ध, मुमुक्षु, साधक भक्तिमार्गास अनुसरतील ते उद्धरून जातील. ’ ‘ जीं रामसीता कर्तव्य म्हणून वनास गेलीं त्यांचें चरित्र पावन आहे. ’

६१ क्वचित् अशा वाक्यांत सर्वनाम जवळच्या विशेष्याचें लिंगवचन घेतें, तेव्हां तीं विशेष्यें ‘ किंवा ’ या विकल्पात्मक अव्ययानें जोडलीं आहेत असें सम-जावें. जसें:– ‘ रामा, यमू, गोविंदा, जो कोणी दंगा करील त्याला आतां मार मिळेल. ’

६२ कित्येक वेळां वाक्यांत संबंधी सर्वनाम गुप्त असतें. कवितेंतून तर एकादे वेळीं दर्शक सर्वनामही गुप्त ठेवतात. जसें:– ‘ माझें तें तुझें, आणि तुझें तेंही तुझेंच ! ’ ‘ मारिति हाका केवळ नागविला वनिं जसा वणिक्सार्थ ॥ ’ ( मोरोपंत ).

६३ संबंधीदर्शकांच्या जोड वाक्यांत संबंधी सर्वनामापुढें विशेष्य असून दर्शक सर्वनामापुढें जर एखादें निराळें विधेयपूरक असेल, तर दर्शक सर्वनाम, संबंधी सर्वनामाचा अन्वय सोडून त्या विधेयपूरकाचें लिंग वचन विभक्ति घेतें. जसें:– ‘ जें शीतलत्व म्हणतात तो पाण्याचा धर्म आहे. ’

६४ वाक्यार्थास जोर आणण्याकरितां जर संबंधी सर्वनाम दोनदां घातलें असेल, तर दर्शक सर्वनामही बहुधा द्विरुक्त होतें. क्वचित् दोघांपैकीं एकाचीच द्विरुक्ति करितात व क्वचित् एखाद्याला गुप्तही ठेवतात. जसें:– ‘ जेवढा जेवढा प्राणी जन्माला आला तेवढा तेवढा मृत्युमुखीं पडणारच. ’ ‘ हा माल जाईल तसा तसा खपीव. ’

६५ ‘ काय ’ हें सर्वनाम केव्हां केव्हां संबंधी सर्वनामासारखें उपयोगांत येतें. अशा वेळीं त्याचा अर्थ ‘ जो ’ ‘ जसा ’ इ० असतो व त्याच्याशीं दर्शक सर्व-नामाचा संवाद असतो. जसें:– ‘ काय देईल तें घे. ’ ‘ काय फायदा होईल तो पाहूं. ’

६६ संबंधी सर्वनामांपासून ' जेव्हां, जेथें, जों, ( जंव ) जोंवि, जसें, जेवढें, जिकडे, जितकें, ' इत्यादि क्रियाविशेषणें होतात व तीं संबंधीच असतात; ' तेव्हां, तेथें, तों ( तंव ), तोंव, तसें, तेवढें, तिकडे, तितकें ' इ० दर्शक क्रियाविशेषणें त्यांच्या जोडीस येतात. यांपैकीं ' आ ' कारान्तांपासून झालेल्या क्रियाविशेषणांचा संवाद नामाशीं असतो ( कलम ५२ पहा. ). दर्शक व संबंधी क्रियाविशेषणांचा रूपसादृश्यापुरता संबंध असतो. जसें:– ' बोले तैसा चाले, त्याचीं वंदावीं पाउलें ' ( तुकाराम. )

---

## ५ पाठावली.

**पुढें जो आम्हांवर रागाचा गहजब उडणार त्याची या दासीनें प्रस्तावनाच केली म्हणायची !** ( सौभद्र )

**जें जें ऐकावें तें तें अघटितच !** ( कित्ता )

**जेव्हां जेव्हां ही गोष्ट काढावी तेव्हां तेव्हां असेंच कांहीं ढोंग करून निघून जायचें !** ( कित्ता )

**आजेसासूबाईंनीं तर जें काय अकांड[१] तांडव केलें आहे तें कांहीं पुसूंच नये !** ( पण लक्ष्यां० )

**लढाईत त्यांचा जसा तरवारीचा पट्टा तसाच घरीं व दरबारीं जिभेचा पट्टा चालत असे.** ( तोत० बंड )

**आज असें जी कोण विचारील, तिला म्हणावें, होय, मला जन्मभर कुंवार[२] ठेवणार आहेत ! त्यांत तुमचें काय खरचतें ? घरोघर मातीच्याच चुली म्हणावें !** ( शारदा )

**विश्वामित्राच्या पुण्यावर जसा त्रिशंकु[३] अंतराळीं राहिला, किंवा आस्तिकाच्या[४] पुण्याईमुळें जसा तक्षक परीक्षिताच्या अग्निकुंडांत**

---

१ धांगडधिंगा, दंगल. २ अविवाहित. ३ हा सूर्यवंशीय राजा देवांनीं स्वर्गांतून ढकलून दिल्यामुळें अधांतरीं लोंबूं लागला. अशी अवस्था पाहून विश्वामित्रानें त्यास तपोबलानें अधांतरीं सावरून धरलें व नवा स्वर्ग निर्माण करून तेथें त्याची स्थापना करण्याचा बेत केला अशी कथा आहे. ४ अस्तिक नांवाच्या ब्राह्मणानें जनमेजयाच्या सर्पसत्रांत तक्षकाला वांचविलें अशी कथा आहे.

न पडतां लोंबत राहिला, तसाच पेशव्यांच्या कुळांतल्या या पतिव्रतेच्या पुण्याईच्या आधारावर तूं सुखनिधान तोतया उभा आहेस.

( तोत• बंड )

काय नांव गांव विचारतील तें न भितां सांग म्हणजे झालें.

( शारदा )

---

संग जया जैसा लाभ तया तैसा ॥ होतसे अपैसा[5] अनायासें ॥ १ ॥
( रामदास )

गाजराची पुंगी ॥ तैसे झाले नव जोगी ॥
काय करुनि पठण ॥ केली अहंता जतन ॥ ( तुकाराम )

जेथें ऐकुनि चौघडे धडकतां राज्याभिषेकोत्सवीं ॥
नाचे हर्षभरें विरक्तहि तरी तो जावळीचा[6] कवी ॥
त्या ह्या रायगडावरोनि भगवा झेंडा पडे खालतीं ॥
ऐसें पाहुनिया गळे सहजची त्या मावळ्यांची धृती ॥ १ ॥ ( मोगरे )

तादितर खग भेणें[7] वेगळाले पळाले ।
उपवन जल-केली[8] जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ॥
कठिण समय येतां कोण कामास येतो ? ॥ १ ॥ ( रघु. पं. )

हरापरिस तूं बरा प्रभुवरा सदा जो पिशी[9] ।
असा रस समर्पि त्या अमृत आपुलें ओपिशी ॥ ( मोरोपंत )

---

अंग वक्र, अधरीं धरि पावा[10] ॥ गोपवेश हरि तोचि जपावा ॥
वाम बाहुवरि गालहि डावा ॥ तो ठसा स्वहृदयांत पडावा ॥ १ ॥
लज्जेनें जड, दांभिक व्रतिपणें[11], कापट्य शौचें[12] गणी ।
शौर्यें निर्दय, आर्जवें लुडबुड्या, कीं दीन सद्भाषणीं ॥

---

५ आपोआप. ६ रामदास स्वामी. ७ भीतीनें. ८ बागेंतील जलक्रीडा. ९ शंकर एकदांच हलाहल विष प्याले, पण तूं स्तुतिरूपी विष नेहमीं पितोस आणि विष पाजणाऱ्या भक्ताला आपला मोक्ष देतोस, अर्थात शंकराहून तूं श्रेष्ठ. १० मुरली. ११ व्रताचरण केल्यामुळें. १२ पवित्रपणानें, स्वच्छपणानें.

मानेच्छा तरि मूर्ख, कीं बडबड्या वक्ता, निकामी भला ।
ऐसा तो गुण कोणता खलजनीं नाहींच जो निंदिला ? ॥ २ ॥(वामन)
जो विप्र आजपासुनि मद्यप्राशन करिल तो पापी ॥
ब्रम्हघ्ना-सम[13] निश्चित असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥ १ ॥(मोरोपंत)
सारथि बृहन्नडा[14] ज्या तद्विजयें करुत बायका नवला ।
चिंतामणि-गल-बालक[15] जो दुर्लभ त्यास काय कानवला ? ॥ २ ॥
(किता)

तो जो केवळ सर्व कालहि तपस्येसीं सदा रातला ।
ज्याच्या उग्रपणा[16] प्रणाम असकृत् कल्पानलें घातला ॥
जेणें शक्रहि[17] शिक्षिला जइं महा संपन्मदें मातला ।
दुर्वासा भगवंत तो अतिथि त्या काळीं स्वयें पातला ॥ १ ॥ (किता)

---

जेयां[18] जिया अक्षौहिणी[19] । तेणें तिया आरणीं[20] ।
वरगण[21] कवणाकवणी । महारथीया[22] ॥ १ ॥ (ज्ञानेश्वर)
जो सर्वां भूतांचां ठाइं । द्वेषातें नेणें कांहीं ।
आपपरू नाहिं । चैतन्या जसा ॥ १ ॥
तेयां[23] आम्हां वेसन । आमचें तो निधान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ २ ॥ (किता)
वसंतु तेथ वनें । वनें तेथ सुमनें ।
सुमनिं पालेगनें[24] । सारंगांचिं[25] ॥ १ ॥ (किता)
मौनें[26] गा तुझें राशिनावं । आतां स्तोत्रीं के भांजे हांवं ।
दिसासि तेतुली माव । भजों कायि ॥ १ ॥ (किता)

---

१३ ब्राह्मणाचा वध करणाराप्रमाणे. १४ विराट नगरींत नटवेषानें राहिलेल्या अर्जुनाचें नांव. १५ चिंतामणि ज्याच्या गळ्यांत आहे असा मुलगा. १६ ज्याच्या तामसीपणाला प्रळयकाळच्या अग्नीनें सुद्धां अनेकदां दंडवत घातलें. १७ इंद्रसुद्धां. १८ ज्याला. १९ हत्ती २१८७०, रथ २१८७०, घोडे ६५६१०, व पायदळ १०९३५० मिळून होणारी सैन्यसंख्या. २० सेना. २१ इतर, बाकीचे. २२ मोटे रथी. २३ आम्हांला त्याचें वेड आहे. २४ पंक्ति. २५ भुंग्यांचीं. २६ तुझें राशिचक्रांतलें नांवच मुळीं मौन होय, मग स्तोत्र करावयाची हांव कुठून धरावी? तूं जगदाकारानें दिसतोस तो तर मिथ्या भास आहे,मग तुला भजायचें कसें?

# सहावा पाठ.

## अधिकार.

६७ वाक्यरचनेंतील तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे अधिकार. वाक्यांतील एका शब्दाला दुसऱ्या शब्दानें अमुकच विभक्ति किंवा प्रत्यय किंवा रूप घ्यावयास लावावें अशी जी सत्ता तिला **अधिकार** म्हणतात. मराठी व्याकरणांत हे सत्तेचे प्रकार तीन आहेत. १ क्रियापदांची प्रातिपदिकांवर चालणारी सत्ता. २ नामांची नामांवर चालणारी सत्ता. ३ आणि अव्ययांची नामांवर चालणारी सत्ता. यांपैकीं अव्ययांच्या नामांवर चालणाऱ्या सत्तेसंबंधानें प्रसंगोपात्त उल्लेख येईल. नामांच्या नामांवर चालणाऱ्या सत्तेचें उदाहरण एकच आहे, व तें षष्ठी विभक्तीचें होय. प्रातिपदिकांवर क्रियापदांची सत्ता मात्र अनेक प्रकारांनीं चालते व तिचा क्रमानें विचार करूं.

६८ "ज्या शब्दांनीं संख्या किंवा लिंग म्हणजे स्त्रीत्व किंवा पुरुषत्व ह्यांनीं युक्त अशा वस्तूंचा बोध होतो, त्यांस प्रातिपदिकें असें म्हणतात," ( रा. भि. जोशी ). अर्थात् प्रातिपदिकांत नामें, सर्वनामें आणि विशेषणें ह्यांचा अंतर्भाव होतो. असलीं प्रातिपदिकें वाक्यांत आलीं म्हणजे क्रियापदाशीं त्यांचा वेगवेगळ्या प्रकारांनी संबंध पोहोंचतो, व क्रियापद उलट त्यांना वेगवेगळीं रूपें घ्यावयास लावून आपला अधिकार चालवितें. प्रातिपदिकांचा क्रियापदाशीं जो संबंध असतो त्यास **कारक** असें म्हणतात.

६९ हीं कारकें १ कर्ता, २ कर्म, ३ करण, ४ संप्रदान, ५ अपादान, व ६ अधिकरण अशीं सहा असून तीं अनुक्रमें १ प्रथमा, २ द्वितीया, ३ तृतीया, ४ चतुर्थी, ५ पंचमी व ६ सप्तमी या विभक्तींनीं दाखविलीं जातात. अर्थात् विभक्ति म्हणजे "वाक्यांत प्रातिपदिकाचा क्रियापदाशीं किंवा इतर कोणत्या तरी शब्दाशीं संबंध दाखविण्याकरितां त्याचें जें रूप तयार करितात" तें होय. आतां त्यांचा क्रमानें विचार करूं.

७० वाक्याचे जे दोन भाग, १ ज्या विषयीं कांहीं सांगितलें आहे तो, व २ जें काय सांगितलें आहे तें; त्यांपैकीं ज्या विषयीं कांहीं सांगितलें असेल त्या शब्दाला व्याकरणांत ' उद्देश्य ' असें नांव आहे, व जें काय सांगितलें असेल त्यास ' विधेय ' अशी संज्ञा आहे. पैकी उद्देश्याचा वाचक शब्द प्रथमा विभक्तींत असतो, व त्यास ' कर्ता ' म्हणतात. अशा दृष्टीनें प्रथमा ही एखाद्या प्रातिपदिकाचा नुसता उल्लेख करणारी विभक्ति आहे, व म्हणून तिच्याकडे नेहमींच कर्तृत्व असतें असें नाहीं. जसें:—' रुपाया खोटा ठरला. '

७१ कलम ६ मध्यें सांगितलेलीं ' असणें, होणें ' वगैरे जीं अकर्मक क्रियापदें त्यांच्या कर्तरि प्रयोगांत व कलम २८ मध्यें सांगितलेलीं जीं ' करणें, बनविणें ' वगैरे सकर्मक क्रियापदें, त्यांच्या कर्मणि प्रयोगांत प्रथमान्त उद्देश्याशिवाय एक वेगळें विधेयपूरक येतें व तें प्रथमेंतच घालावें लागतें. जसें:— ' गोपाळराव ज्योतिषी होणार ' ' त्यांनीं यज्ञदत्त राजा केला. ' दुसऱ्या उदाहरणांत सकर्मक वाक्यांतलें मूळचें दुसरें कर्म विधेयपूरक होऊन आलें आहे हें उघड आहे.

७२ वजन, माप, अंतर, लांबी, रुंदी, उंची कालमान इत्यादिकांचें परिमाण दाखविण्याकरितां घातलेले शब्द अकर्मक प्रयोगांत प्रथमा विभक्तींत घालतात, व ही परिमाणार्थी प्रथमा मानिली जाते. जसें:—' हें कापड वीस वार आहे. ' ' मला येऊन आठ दिवस झाले. '

७३ कलम ६ मध्यें सांगितलेल्या क्रियापदांचें विधेयपूरक जरी नामावांचून इतर शब्द असला तरी तोही प्रथमेंतच असतो. जसें:—' तूं हुषार दिसतोस. ' " मला तें रूप ' बाधाति ' वाटलें व तुला ' बाधते ' वाटलें. "

७४ एखादे वेळीं उद्देश्य प्रथमेंत असून विधेय हें पूर्ण क्रियापद नसतें, तर क्रियापदाचें धातुसाधित रूप अव्ययार्थी असतें; अर्थात् अशा वेळीं उद्देश्याच्या लिंगवचन पुरुषाशीं विधेयाचा संवाद नसतो. तेव्हां त्या प्रथमेस ' अनियंत्रित प्रथमा ' असें म्हणतात. जसें:—' पंतोजी तेथें असतां मुलांनीं दंगा केला. '

७५ द्वितीयेचा मुख्य अर्थ कर्म आहे. कर्मणि प्रयोगांत कर्माला प्राधान्य मिळून तें उद्देश्य होतें व प्रथमा विभक्तींत येतें. एरवीं तें नेहमीं द्वितीयेंतच असतें. जसें:—' तो भात जेवला. ' ' शिपाई चोरास धरितो. '

७६ माप किंवा परिमाण दाखविणारे शब्द द्वितीयेंत घालतात. त्याचप्रमाणें कालमर्यादा दाखविणारे शब्द द्वितीयेंत घालतात. असले शब्द उद्देश्यार्थी नामासारखे असले म्हणजे त्यांची प्रथमा, व क्रियाविशेषणाच्या अर्थी असले म्हणजे त्यांची द्वितीया आहे असें समजावें. जसें:- 'मला दोन शेर गूळ दिसतो.' ( प्रथमा; ) व ' मला दोन शेर गूळ दे ' ( द्वितीया. ) ' त्याला संध्येस बसून दोन तास झाले ' ( प्रथमा. ) व ' तो दोन तास संध्येस बसला ' ( द्वितीया. ) क्वचित् अशा द्वितीयेला ' भर ' हा शब्द जोडतात.

७७ संस्कृतांत गतिवाचक क्रियापदें गतिदर्शक स्थलाची द्वितीया घेतात, तशींच ती मराठींतही घेतात. जसें:- ' तो रानें वनें फिरला. ' ' राम सीतेसाठीं सारें दंडकारण्य चालले. '

पण गतीचा भाव नामानें वेगळा काढला असल्यास स्थलाची सप्तमी किंवा चतुर्थी घालतात. जसें:- ' तो रानावनांत भ्रमण करिता झाला. '

७८ सकर्मक क्रियापदांना वेगवेगळे प्रत्यय लागून त्यांचीं धातुसाधितें बनलीं असलीं तरी कर्मावरच्या त्यांच्या सत्तेंत बदल होत नाही. जसें:- ' तो स्नान करून, कपडे घालून बाहेर पडला. ' ' तोच हें काम करूं जाणे. '

७९ कलम २८ मध्यें सांगितलेल्या द्विकर्मक क्रियापदांचीं दोन्ही कर्में द्वितीयेंतच असतात. असल्या क्रियापदांच्या कर्मणि प्रयोगांत दोन्ही कर्में प्रथमेंत जातात. जसें:- ' शाहूनें बाजीराव पेशवा नेमिला. ' पण भावे प्रयोगांत मात्र दोन्ही कर्में द्वितीयेंत राहून, ' कोणास ' असा प्रश्न विचारून येणारें कर्म सप्रत्यय द्वितीयेंत, व ' काय ' असा प्रश्न विचारून येणारें कर्म अप्रत्यय द्वितीयेंत येतें. जसें:- ' ऋषीनें उंदरास कुत्रा बनविलें. ' कर्तरि प्रयोगांत ' कोणास ' हा प्रश्न विचारून येणारें कर्म क्वचित् अप्रत्यय द्वितीयेंत येतें. जसें:- ' मी देवदत्तास किंवा देवदत्त आपला मित्र समजतो. '

८० कांहीं अकर्मक क्रियापदें संस्कृतप्रमाणें उपसर्ग घेऊन सकर्मक होतात व मग द्वितीया विभक्तींत कर्म घेतात. जसें:- ' तूं धर्माला अनुसरतोस. '

८१ अव्ययांपैकीं ' शब्दयोगी ' अव्ययें नामांवर जी सत्ता चालवितात ती एखाद्या विभक्तीच्या स्वरूपाची असते. अशांना संस्कृतांत उपपद विभक्ति म्हणतात, सबब त्यांचा विचार कारकांबरोबरच करणें बरें. हीं शब्दयोगी अव्ययें लागतांना

नामांचें सामान्य रूप होतें. या शब्दयोगी अव्ययांपैकीं द्वितीयेच्या अर्थाचीं 'प्रत किंवा प्राति,' 'लागी,' ( लागून, लागोनी, लागुनी, लागीं ) हीं होत. जसें:– 'हरी प्रत बोलाव.'

८२ 'बसणें' हें क्रियापद केव्हां केव्हां जेथें बसावयाचें त्या स्थलाची द्वितीया घेतें. जसें:– 'तो झाडाच्या शेंड्याला बसला.' 'सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे' ( रघु० पं० ),

---

## ६ पाठावली.

**अग वल्लरी ! चल कींग लवकर ! तासभर नटणें चाललें होतें, तरी आणखी काय राहिलें आहे ?** ( शारदा )

**सायन जन्मांत स्वसंतोषानें अशी मी कुणाला एक बोटभर चिंधी, किंवा तांब्याचा तुकडा, किंवा घासभर अन्न दिलेलें मला स्मरत नाहीं.** ( कित्ता )

**तशींच कांहीं विघ्नें येत गेल्यामुळें कांहीं दिवस मी तुझ्या आलिंगन-सौख्यास अंतरलों.** ( सौभद्र )

**अष्टौप्रहर मला त्यांजपाशीं असावें लागतें. मी जर क्षणभर जवळ नसलें, तर लागलीच त्यांची तब्येत बिघडून जाते.** ( कित्ता )

**इकडच्या तिकडच्या गोष्टींचीं धरणें बांधून इतका वेळ मी या गंगा[1]यमुना थोपवून धरल्या होत्या.** ( एकच प्याला )

**प्रीतिविवाह हा द्वंद्वसमास असून वकिलामार्फत त्याचा विग्रह[2] करून घ्यावा लागतो.** ( कित्ता )

---

**पडतां जडें[3] भारी । दासीं आठवावा हरी ॥**
**मग तो होऊं नेदी शिण । आड घालीं सुदर्शन[4] ॥**

---

१ रडें येऊं दिलें नव्हतें. २ वकिलामार्फत नोटिसा वगैरे देऊन लग्नगांठ तोडावी लागते. ३ अवघड संकट. ४ विष्णूंच्या हातांतलें चक्र.

हरिनामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥
तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरी[५] ॥ १ ॥ ( तुकाराम )

अंगीचें एक रोम उपडे । तें जैसें हृदयांत ठाउकें पडे ।
तेंवि प्रजा पावतां पीडे । जाणसी कीं तात्काळ ॥ १ ॥

वर्षकार्य[६] एक मास । मासाचें तें एक दिवस ।
दिवसकार्य एक निमिष । संपादीत असतो कीं ॥ २ ॥ ( मुक्तेश्वर )

शत गांवें रुंद सभा, दिव्या ती लांब दीड शत गांवें ॥
जी उंच पांच गांवें. जींत गुरुहि दुःख लेश न तगावें ॥१॥ ( मोरोपंत )

कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त; तिळ स्थळ नसे, नसावेंचि ॥
वसवा पुरें; पुरें कां म्हणतां ? धनवंत कण कसा वेंची ॥ २ ॥( कित्ता )

---

वर्षें चतुर्दशहि राखिन शासनातें । अंगीकरीन, न बसेन नृपासनातें ॥
सिंहासनावरि तुझ्या पदपादुका मीं । पूजीन तों तव-पदांबुज-लाभ कामी ॥ १ ॥ ( वामन )

खग मग नगरींचे गोपुरीं झेंप घाली । मृदुपवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली ॥
तदुपरि जवशाली वेंघला चंद्रशाला । निरखि विततशाला राजधानी विशाला ॥ १ ॥ ( रघु पं. )

तो मंडळाकृति फिरे उतरावयाला । भैमी-मुखेंदु-परिवेष म्हणों तयाला ॥
तेथें महीवर असा खग बैसताहे । कीं सुंदरी निज कुतूहल जेंवि पाहे ॥ २ ॥ ( कित्ता )

---

५ बाकी. ६ वर्षांत करावयाची गोष्ट. ७ एक योजन ( ८ मैल ). ८ सांठवी. ९ सिंहासनाचा फक्त स्वीकार करीन, पण त्यावर बसणार नाहीं. १० तुझ्या पदकमळाच्या लाभाची इच्छा करणारा. ११ गार वारा ज्यांतून येतो आहे अशा जाळींत. १२ नंतर वेगानें गच्चीवर जाऊन बसला. १३ मोठे आहेत वाडे जिच्यामधील अशी ( राजधानी ). १४ दमयन्तीच्या मुखचंद्राभोंवतीचें तेजोवलय. १५ कौतुक, मौज.

मग भरलेल्या जगा आंतु । जाउनि तिजें[१६]याची मातु ।
होउनि टाइल एकांतु । आम्हां तुम्हां ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर

जलिची प्रतिभा । जलनाशीं बिंबा ।
यें[१७]तां गाभागोभा । कांहिं असो ॥ २ ॥ ( कित्ता

काइ सांकडें कांहीं मातें । कीं कव्हणें एकें [१८]आंतें ।
अनुचरें मी कर्मातें । म्हणसी जरी ॥ ३ ॥ ( कित्ता



१६ मग उभ्या जगांत तिसरा पदार्थ नाहींसा होऊन तुझा व माझा एकांत होईल.
१७ येत ना. पाण्यांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाला पाणी आटल्यावर, सूर्यबिंबांत परत जातांना कांहीं आडकाठी असते काय? १८ इच्छेनें, लालसेनें.

# सातवा पाठ.

## अधिकार–तृतीया विभक्ति.

८३ कर्माणि व भावे प्रयोगांत मूळच्या कर्तरि प्रयोगांतला कर्ता तृतीयेंत घालून कर्म अनुक्रमें प्रथमेंत व द्वितीयेंत ठेवतात. ह्या तृतीयेला कर्तृपदार्थी तृतीया म्हणतात. जसें:—' हरीनें गाय बांधली. ' ' लक्ष्मणानें इंद्रजितास मारलें. '

८४ शक्यार्थक क्रियापदांचा कर्ताही तृतीयेंतच असतो. पण तृतीयेचा प्रत्यय लागण्यापूर्वी कर्तृपदाचें ' च ' प्रत्ययान्त किंवा संबंधी विशेषण होतें. जसें:— ' माझ्यानें हें काम करवत नाहीं. ' ' हरीच्यानें तेथें कसें राहवेल ? '

८५ केव्हां केव्हां तृतीयान्त कर्त्याचा संबंध वाक्यांत कोणत्याही पूर्ण क्रियापदाशीं नसून केवळ धातुसाधिताशीं असतो. अशा तृतीयेला अनियंत्रित तृतीया म्हणतात. जसें:—' त्यानें इतकें म्हणतांच चोहोंकडून पुष्पवृष्टि झाली. '

८६ पण तृतीयेचा मुख्य अर्थ करण, म्हणजे एखादी क्रिया करण्याचें साधन होय. जसें:—' डोळ्यांनीं बघतो, ध्वनी परिसतो कानीं. ' या साधनाच्या अर्थाचे अनेक सूक्ष्म भेद आहेत, ते क्रमानें पुढें सांगितले आहेत.

८७ तृतीयेनें केव्हां केव्हां कारण, मूळ किंवा निमित्त यांचा बोध होतो. जसें:—' आपल्या कृपेनें मी या पदवीस पोंचलों. ' ' तिनें लाजेनें तोंड लपविलें. '

८८ तृतीयेवरून केव्हां केव्हां अनुमानाचा, तर्काचा, किंवा आधाराचा बोध होतो. जसें:—माझ्या मतें तो आज परतावा. ' ' ही गोष्ट कायद्यानें करितां येण्याजोगी नाहीं. '

८९ शारीरिक व्यंग दाखविण्याकरितां तृतीयेचा उपयोग करितात. जसें:— ' तें हरिण एका डोळ्यानें आंधळें होतें. '

९० ज्या विशेषणांनीं गुणांची किंवा पदार्थांची न्यूनता किंवा समृद्धि दाखविली

जाते तीं विशेषणें तृतीयेशीं घालतात. जसें:—' पैशानें गरीब, ' ' कीर्तीनें मोठा. '

९१ तृतीयेनें केव्हां केव्हां रीतीचा बोध होतो. जसें: — ' तो नेहमीं नम्रतेनें बोलतो,' ' तो मिनतवारीनें खर्च करितो. '

९२ सह किंवा बरोबर असा अर्थ असतां तृतीया घालतात. जसें:—' एका वस्त्रानें बाहेर पडला. ' अशा अर्थाच्या तृतीयेबरोबर येणारें ' सह ' हें अव्यय व तृतीयेचा संस्कृत प्रत्यय यांचें ' निशीं ' असें अपभ्रष्ट रूप होऊन तेंही केव्हां केव्हां तृतीयेच्या अर्थानें येतें. जसें:—' एका वस्त्रानिशीं बाहेर पडला. ' 'जिवानिशीं सुटला. '

९३ ' शीं ' प्रत्ययान्त तृतीयेनें सांनिध्याचा किंवा क्वचित् सादृश्याचा अर्थ होतो. जसें:—' घराशीं घर भिडलें आहे. ' ' अर्जनाशीं झगडणारा कोण आहे? '

९४ गतिवाचक क्रियापदांची दिशा किंवा मार्ग दाखविण्याकरितां तृतीयेचा उपयोग करितात. जसें:-- ' तो भामटा कोणत्या दिशेनें गेला ? '

९५ कमी अधिक माप किंवा परिमाण दाखविण्याकरितां तृतीयेचा उपयोग करितात. जसें:—' पांचांनीं उणा, ' ' तिहींनीं अधिक, ' ' थेंबें थेंबें तळें सांचे. '

९६ ' कालाचा ठराविक भाग झाल्यावर ' अशा अर्थी तृतीया घालतात. जसें:—' तो पांच वाजून वीस मिनिटांनीं येईल. ' ' तपोधैर्याचा पर्वत, चूर्ण झाला क्षणार्धें ' ( मुक्तेश्वर ).

९७ कालक्रमणाचें स्थित्यर्थी साधन किंवा गत्यर्थी साधन, किंवा उपजीविकेचा आधार म्हणून तृतीयेचा उपयोग करितात. जसें·--' काशींत विद्यार्जनानें असतो. ' ' फकीराच्या पेषानें हिंडतो. '

९८ विशिष्ट अवस्था किंवा रूप दाखविणारें विशेषण तृतीयेशीं घालतात. जसें:— ' अंगानें गोरा. ' ' जटांनीं तपस्वी. '

९९ तृतीयार्थी शब्दयोगी अव्ययांपैकीं ' करवीं, ' ' कडून ' ' करून, ' ' द्वारें, ' 'हातीं, ' व ' हातून ' यांवरून कर्तृपदाचा बोध होतो. जसें:—' नानूकडूनच तें केलें गेलें असेल. ' ' द्यावी मजहातीं सेवा ' ( तुकाराम ).

( क ) ' निमित्त, निमित्तें, योगें, मुळें आणि वरून ' या शब्दयोगी अव्ययांवरून क्रियेच्या निमित्ताचा किंवा कारणाचा बोध होतो. जसें:— 'कलियगाचे

मुळें । झालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥ ( नामदेव ). ‘ माझ्या निमित्त तुझी गैरसोय नको. ’

( ख ) ‘ बरोबर, सह, गणिक, सकट, सहित, सहवर्तमान, सवें, संगें, संगती, सांगाती आणि सुद्धां ’ या अव्ययावरून साहचर्याचा बोध होतो. जसें:—‘ गाड्या-बरोबर नळ्याला यात्रा. ’ ‘ चागल्या सवें संगती धरी. ’

( ग ) ‘ वारी ’ ( जुनें रूप वेऱ्हीं ) या अव्ययांवरून वांटणीच्या प्रमाणाचा बोध होतो. जसें:—‘ त्याचा पैसा पाण्यावारी गेला. ’

‘ गणिक ’ या अव्ययावरूनही वांटणीच्या प्रमाणाचा अर्थ होतो. जसें:— ‘ पावलागणिक ठेंच लागते आहे. ’

( घ ) केव्हां केव्हां ‘ करून, द्वारें, विना ’ वगैरे तृतीयेची अव्ययें नामाच्या सामान्यरूपाला न लागतां विभक्त्यन्त रूपाला लागतात. जसें:—‘ सांठवणेंवीण धान्य ’ ( रामदास ). ‘ बहु होऊनि प्रिया मी आले तव अप्रिया विना-कलहें, ’ ( मोरोपंत )

( ङ ) ‘ परी, वाणी, सदृश, सारखें, ऐसें, पाडें, एवढें, प्रमाणें, सरसें, अन्वयें, अनुसार, व अनुरोध ’ या अव्ययांचा उपयोग तुलनार्थी करितात. जसें:– ‘ गुरु-परि उपदेश करी. ’ ‘ तिसऱ्या कलमान्वयें हा गुन्हा आहे. ’ ‘ कर्मानुसार मिळते गति मानवाला. ’

( च ) ‘ मार्फत ’ या अव्ययावरून मध्यस्थीचा बोध होतो. जसें:– ‘ वकिला-मार्फत फिर्याद कर. ’

( छ ) ‘ खेरिज, वगळून, सोडून, बगर, विणें, वीण, विना, वांचून, शिवाय, वेगळा ’ इत्यादि अव्ययांवरून ‘ एखाद्या गोष्टीस सोडून किंवा वगळून ’ असा अर्थ होतो. जसें:– ‘ प्रसंगाशिवाय परिचय होत नाहीं. ’ ( शारदा, ). ‘ तुजवीण वानूं आणिकाची थोरी ’ ( तुकाराम ). ‘गोविंदा सोडून बाकीचीं मुलें ढ आहेत. ’

---

## ७ पाठावली.

**एकदां लावला म्हणजे पुन्हां पांढरा केंस म्हणून आंतूनच निघायचा नाहीं असा जर कोणी मला कलप देईल, तर मी त्याला केंसागणिक रुपये मोजीन.** ( शारदा )

जी बाई नवी येईल तितक्यागणिक सगळ्या लग्नाच्या हकीगतीचा पाडा वाचायचा. ( पण ल० )

हरिश्चंद्राच्या फुटक्या रांजणासारखी या पेशवाईच्या यशाची गत मला तरी दिसते. ( तोत० बंड )

आमच्या सरदारांसारखे हरामखोर अलम दुनियेंत सांपडणार नाहींत! त्यांच्या घरबुडवेपणामुळें तर या थराला गोष्टी आल्या.(कित्ता)

अमलेचा शब्द ऐकतांच एखाद्या मांत्रिकाच्या हांकेप्रमाणें सुखनिधानाचें भूत[1] तोलयाच्या झाडांच्या तोंडानं बोलूं लागेल. (कित्ता)

मी कांहीं अगदीं बोळ्यानं दूध पीत नाहीं! या साळकायांशीं तुम्ही हसतां खिदळतां आणि माझ्याशींच बोलतांना असें तोंड कां बरें कडू होतें? ( प्रेमसंन्यास )

बोल, शब्दसृष्टीच्या परमेश्वरा, अगदीं मोकळ्या जिभेनें बोल. शब्दांनीं शरपंजरीं पडून मरणारा पहिला वीर म्हणून तरी माझा लौकिक होईल. ( भाववंधन )

---

मिठेंवीण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंवीण शृंगारिलें ॥
संपादणीविण[2] विटंबिलें सोंग । गुणेंवीण चांग[3] रूप हीन ॥ (तुकाराम)
जयाचेनि संगे समाधान भंगे । अहंता अकस्मात येऊन लागे ॥
तये संगतीची जनीं कोण गोडी । जये संगतीनें मती राम सोडी ॥१॥
( रामदास )

मोह असावा सज्जनांशीं । मद असावा दुर्जनांशीं ।
मत्सर सदा संसाराशीं । असावा तो असे कीं ? ॥ १ ॥ ( मुकेश्वर )

मोहतमाच्या सागरीं । कवळीत शोकार्णवाच्या लहरी ।
कुसुमवाटिके मातामेंगरी[4] । अंचळ-त्यागें[5] जातसे ॥ १ ॥ ( कित्ता )

कामसमवेत अप्सरा । सवें वसंतही दुसरा ।
क्रोध अवाधियां पुढारा । जो तापसांतें पुरा नागवी सदा ॥१॥(एकनाथ)

---

१ भुतानें झपाटलेल्या माणसाच्या. २ बरोबर बतावणी केल्यावांचून. ३ चांगलें. ४ तारामती हीच सुंदर. ५ पदर मोकळा सोडून.

पुष्पापरी दोंपरिचीच साची । हे वृत्ति संभावित जे तयांची ॥
लोकांचिये एक शिरीं सजाव । वनींच कीं एक सुकोनि जावें ॥१॥(वामन)
पावन पदरजेंकरुनि गौतम[6]-मुनि-दारा ॥ ( आनंदतनय )
शौरि[7] म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकांनं[8] ।
हरि[9]चें काय करावें ? परिसो तो हितकथा पिशुन कानें ॥१॥(मोरोपंत)
आयकितां असि वाणी । हृदया लागे खळाचिया असि[10]-वाणी ॥
चावी दांत करकर । क्रोधें चोळी रिपु-प्रणाशी[11]-कर कर ॥२॥(किता)
हे ना, तो आवडे । मज जीवाचेनि पाडें ।
हेंही एथ थोकडें[12] । रूप करणें ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )
जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहिंचि न देखे ।
आणि भोग[13]विशेषें । हरिखैजेना ॥ २ ॥ ( किता )
तरि तेया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें[14] सोयरें ।
नाहीं गा सांचोकारें[15] । तूझी आण[16] ॥ ३ ॥ ( किता )
सांघे सूर्याच्या घरीं । काइ प्रकाशु वातिवेन्ही[17] ।
कीं न लविजे तरी आंधारीं । कोंडेल तो ॥ ४ ॥ ( किता )
साध्वी शांति नागविली । माया मांगी श्रिंधारिली[18] ।
तियेकरवीं विटाळविलीं । इहीं साधुवृंदें ॥ ५ ॥ ( किता )
आजि श्रवणेंद्रियां पीकलें[19] । जेणें हें गीतानिधान देखिलें ।
आतां स्वप्नचि[20] हें तूकलें । साचासारिसें ॥ ६ ॥ ( किता )
जैसें बिंब तरी बचके एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ ७ ॥ ( किता )
विद्या-वय[21]-द्रविण रूप इहीं करोनी ।
हा आत्मतुल्य पति हेंचि मनीं धरोनी ॥
जे सर्व-लक्षणें[22]-विचक्षण सत्कुलीना ।
ते कां नृसिंह ! नवरी तुजला वरीना ? ॥ १ ॥ ( वामन )

---

६ गौतमऋषीची बायको अहल्या. ७ कृष्ण. ८ कुत्र्यांनें. ९ सिंहाचें. १० तरवारीप्रमाणें. ११ शत्रूंचा नाश करणारा ( हात ). १२ ही अलंकारिक भाषा देखील अपुरीच पडते. १३ सुखोपभोगाच्या प्रकारांनीं. १४ प्रिय, आवडतं. १५ खरोखर. १६ शपथ. १७ वातींनीं. १८ सजविली. १९ कानाला लाट लागली. २० कल्पित गोष्ट खरीशी वाटली. २१ विद्या, वय, पैसा व रूप. २२ सर्व लक्षणें ओळखणारी.

# आठवा पाठ.

## अधिकार–चतुर्थी.

१०० ज्या कारणानें किंवा ज्यास उद्देशून एखादी क्रिया घडते तो शब्द चतुर्थीत घालतात. चतुर्थीचा मुख्य अर्थ संप्रदान हा होय. जसें:– 'राजा ब्राह्मणांस दक्षिणा देतो. संप्रदानाच्या अर्थाच्या सूक्ष्म छटा पुढें सांगितल्या आहेत.

१०१ प्रमाण किंवा तुलना दाखविण्यास किंवा एखाद्या पदार्थाच्या विक्रीचा भाव सांगण्यास चतुर्थीचा उपयोग करितात. 'पांचांस जसे चार तसे दहांस आठ.' 'पैशाला एक आंबा तर दोन रुपयांना किती ?'

१०२ एखाद्या स्थानीं उत्पत्ति, प्रसार, स्थिति किंवा गति; खरी किंवा काल्पनिक दाखविण्याकडे चतुर्थीचा उपयोग करितात. जसें:– 'तो परमानंदाला पावला.' 'हरि हल्लीं कऱ्हाडास असतो.' 'अंगा लावूनिया राख । ऐन्यामध्यें पाहे मुख ॥' (तुकाराम.) 'जबलपूरला इन्फ्लुएंझाची साथ आहे.'

१०३ काल दाखविण्याकरितां केव्हां केव्हां चतुर्थीचा उपयोग सप्तमीसारखा करितात. जसें:– मी दिवसास निजत नाहीं. 'दहाला पानें बसतील.' 'दसऱ्याला सोनें वांटतात.'

१०४ चतुर्थीवरून कधीं कधीं तृतीयार्थी कारणाचा बोध होतो. जसें:– 'या कारणास्तव मनोमय मूस ओती.' (रघु० पंडित). 'पाऊस न पडल्यास दुष्काळ पडेल.'

१०५ चतुर्थीवरून केव्हां केव्हां पंचमीचा 'पासून' हा अर्थ होतो. जसें:– 'कसला कारटा माझ्या पोटाला आला आहे. ?'

१०६ केव्हां केव्हां चतुर्थीवरून षष्ठीच्या अर्थी 'सत्ता, स्वामित्व, मालकी, जनकत्व' वगैरेचा बोध होतो. जसें:– 'त्याला मुलगा झाला'. 'त्यांना तीनशें रुपये पगार आहे.' 'गोविंदाला हजार रुपये उत्पन्न आहे.'

१०७ ‘ मुकणें, बुडणें, नागवणें ’ इत्यादि हानि दाखविणाऱ्या क्रियापदांचा उपयोग करितांना हानीचा विषय किंवा प्रमाण चतुर्थींत घालतात. जसें:- ‘ तो पांचशेंला बुडाला. ’ ‘ त्या भामट्यानें मला सर्वस्वाला मुकविलें. ’

१०८ ‘योग्य, उत्तम, गोड, वाईट, कठिण, साजेसा ’ इत्यादि विशेषणें बहुधा चतुर्थीला जोडून येतात. जसें:- ‘ पति मला उचित सुत राजाचा ’ ( खरे. ) ‘ हा तुला शोभेसा नाहीं. ’

( क ) ही विशेषणें धातुसाधित नामांबरोबर आलीं म्हणजे त्या नामांची तर चतुर्थी करितातच, पण त्या धातुसाधितांच्या कर्तृपदांचीही चतुर्थी करितात. जसें:- ‘ कलिंगड तापकऱ्याला खायला ठीक नाहीं. ’

१०९ तुलना किंवा संवाद दाखविणारीं विशेषणें व क्रियापदें तुलनेच्या विषयाची चतुर्थी घेतात. जसें:- ‘ हा स्वर त्या स्वराला जमत नाहीं. ’ ‘ दोघेही उंचीला सारखे आहेत. ’

( क ) क्वचित् तुलनेच्या साधनासही चतुर्थींत घालतात. जसें:- ‘ ती ढेप ताजव्याला लाव. ’

११० ‘ नमस्कार, रामराम, जोहार, आशीर्वाद, विनंति ’ वगैरे उपचारांच्या प्रकारांत उपचार ज्याला उद्देशून होतात त्यास चतुर्थींत घालतात. जसें:- ‘ हरये नमः, ’ लहानथोरांस दंडवत ’ इ०.

१११ ‘ रुचणें, आवडणें, वाटणें, भासणें, दिसणें, समजणें, उमजणें, कळणें, येणें, साजणें, साधणें, सांपडणें, गवसणें, आढळणें, शोभणें, लागणें, खपणें, परवडणें, फावणें ,जमणें, बनणें ’ वगैरे इंद्रियगम्य व्यापारांचीं जीं दर्शक क्रियापदें त्यांचें कर्तृपद चतुर्थींत येतें. जसें:- ‘ हरीला व्याकरण आलें, पण गोविंदाला तें जमलें नाहीं. ’ ‘ मला हें खपणार नाही. ’

११२ शक्य क्रियापदांचें कर्तृपदही नेहमीं चतुर्थींत घालण्याचा प्रघात आहे; जसें:- ‘ मला चालवत नाही. ’ ‘ दारिद्र्याच्या यातना मनाला असह्य होतात. ’

११३ ‘ करावयास, जावयाचें, जावें, बोलावें, बोलूं, करणें, करितां, इत्यादि धातुसाधित नामें किंवा विशेषणें वाक्यांत कर्तृपदीं असतात तेव्हां त्यांच्या धात्वर्थाचें मूळ कर्तृपद चतुर्थींत घालतात. जसें:—‘ मला मुंबईस जावयाचें आहे. ’ ‘याला जाऊं दे. ’

११४ द्वितीयेचीं अव्ययें, ' प्रत, लागी, जवळ, पाशीं, पासाव, कडे ' यांचा अप्रत्यक्ष कर्मपद दाखविण्यासाठीं चतुर्थीच्या अर्थानें उपयोग करितात. जसें:— ' हें पुस्तक त्याचेकडे दे. ' ' तिहीं निषधापासाव म्हणीजेलें ' ( रघु० पंडित ).

११५ ' कारणें, करितां, निमित्त, निमित्तें, साठीं, स्तव, खातर' व समासांत घालून ' अर्थ ' या अव्ययांवरून संप्रदानार्थी चतुर्थीचा उपयोग होतो. जसें:— ' महालाभ फुकासाठीं ' ( तुकाराम ). ' हरीकरितां तर एवढी खटपट !'

११६ एकाच्या स्थानीं दुसरा अशा अर्थी ' खातर, दाखल, बद्दल, ऐवजीं या अव्ययांचा चतुर्थीच्या अर्थानें उपयोग करितात. जसें:—' तुझ्याखातर मी जातों;' ' शिष्याऐवजी गुरुला दंड. '

११७ ' प्रत, लागीं, लागोनी ' या अव्ययांवरून स्थलार्थी चतुर्थीचा बोध होतो. जसें:—' तो गांवाप्रत गेला. '

( क ) ' लागोनी-लागुनी-लागोनि-लागून ' या अव्ययाचा उपयोग ' होतून ' अशा अर्थानेंही केव्हां केव्हां केलेला आढळतो. जसें:—' वैराग्य नव्होचि तुज लागून ' ( महीपति )

---

## ८ वी पाठावली.

**शिवाय आम्हांला वर्षाची पांचशें रुपये नेमणूक, ऐकलेंस कां, श्वशुर म्हणून !** ( शारदा )

**अरे रागावली ! थट्टा सुद्धां समजत नाहीं हिला.** ( कित्ता )

**हें हंसत हंसत आतां म्हणतेस, पण मग लागशील धुसपुसायला ! तें नाहीं मला खपायचें !** ( किता )

**हीं असलीं कसाबासारखीं बोलणीं सख्या भावाला शोभतात कांग ?** ( सौभद्र )

**बरें आहे, एकदा माणसाला ठेंच लागते. पुन्हां कानाला खडा लावून घेईन !** ( पण लक्ष्या० )

**नवऱ्याच्या पगारामुळें तर तिला अगदीं अस्मान ठेंगणें झालें होतें.** ( किता )

असल्या नाटक्यांना कोंपरापासून नमस्कार असो !(विकार विल.)

तुझ्या कामवासनेला तर जसा कांहीं ऊतच आला आहे.(किता)

मी म्हणतों माझ्या आनंदीची परीक्षाच झाली नाहीं. पण हातच्या कांकणाला आरसा कशास पाहिजे ? पैज लावा. (त्राटिका)

गाड्याबरोबर नळयास यात्रा या न्यायानें, करमणुकीखातर परक्या भाषांचा अभ्यास केला असतां त्यापासून दुसरेही पुष्कळ फायदे होतात. ( केसरी )

---

नलगे मायेसी बाळ निरवावें ॥ आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥
मज[1] कां लागला करणें विचार ॥ ज्याचा कारभार त्याचे माथा ॥
गोड धड त्यासी ठेवी न मागतां ॥ समाधान खातां नेदी मना ॥
तुका म्हणे देह विसरे आपुला ॥ आघात ती त्याला लागों नेदी ॥१॥
( तुकाराम )

कुमुदिनी काय जाणे तो परिमळ ॥ भ्रमर सकळ भोगितसे ॥
तुज तैसें ठावें वाहीं तुझें नाम ॥ आह्मीच तें प्रेमसुख जाणों ॥
माते तृण, बाळा दुधाची ते गोडी ॥ ज्याची नये जोडी त्यासी कामा॥
तुका ह्मणे मुक्ताफळ शिंपी पोटीं ॥ नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥२॥
( किता )

ज्याच्या उदरासी आला । त्यासी फिरोनी पडला ॥
झाला स्त्रियेसी लंपट । मायबापांसी उद्धट ॥
नेणे माय कीं मावसी । कोणें सांगावें तयासी ॥
रामी रामदास म्हणे । यम केला त्या कारणें ॥ १ ॥ ( रामदास)

रुंड[2]-माळ ती कंठीं, कुंडलें, भुजंग रुळती कटीं[3] ॥
त्रिशूळ-पाणी, त्रिपुंड्र[4] भाळीं, लोहकंकण मनगटा ॥ १ ॥ ( प्रभाकर )

एकांत हाच वदला मज जाण बाळे ॥
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ॥

---

१ मला ही उठाठेव काय करायची ? २ मनुष्यांच्या मुंडक्यांची माळ. ३ कमरेला. ४ तीन बोटांचा टिळा.

एणेंपरी परिसतांच तया अनन्या[5] ॥
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ १ ॥ ( रघु. पंडित )
कोणी वणिग्जन विकी, तुळितां तराजे ॥
कस्तूरिका, तिजसवें अलिनी[6] विराजे ॥
दोनी समान निरखी विकणार, देतो, ॥
घेणार तें न समजून उगाच घेतो ॥ २ ॥ ( कित्ता )
तें श्वान एक तुकड्यास्तव चार[7] नाना ॥
दावी धन्यास जठरार्थ कसें पहाना ॥
दे आळवूनि जरि हस्तिप[8] ‘ बाप भाई ’ ॥
घेतोचि घास गजराज कशी बढाई ॥ १ ॥ ( वामन )
झाले जीर्ण मनीं मनोरथ, पहा मी वंचिले[9] यौवना ॥ ( कित्ता )
चंद्रास लागति कळा[10], उपराग[11] येतो ॥
गंगोसि भंग[12] बहु पाणउतार होतो ॥
जें चूर्ण होय तरि मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळराजमहायशाला ॥ १ ॥ ( रघु पंडित )
हें पाखरूं मजसि येईल काय कामा ॥
ऐसें नृपा न वद पूरित[13]-लोककामा ॥
मोलें उणें व्यजन[14] तें धरितां पुढारीं ॥
छाया करी तपनदीप्ति[15]सही निवारी ॥ १ ॥ ( कित्ता )
किती वय ? कसें तप प्रखर ? काय विश्वास तो ॥
ध्रुव ध्रुव खरा, स्तवा उचित होय विश्वास तो ॥ ( मोरोपंत )
नको[16] छळ, अधीर मी, तशि न कीर्ति हो, चामरें ॥
नृपास उचितें, वृथा मिरविलीं जरी पामरें ॥

---

५ एकनिष्ठ. ६ भुंगी. ७ चेष्टा. ८ महात. ९ तारुण्य घालवून बसलों. १० चंद्र-बिंबाचा सोळावा अंश. ११ ग्रहण. १२ लाटा. १३ ज्याने लोकांचें मनोरथ पूर्ण केले आहेत अशा. १४ छत्री, पंखा. १५ सूर्याच्या उन्हाला. १६ माझा छळ करूं नका, कारण बळीप्रमाणें मी छळाला टिकणारा नसून दुबळा आहे. आतां अशानें बळीसारखी माझी कीर्ति होणार नाहीं, पण ती न झालेली पतकरली. राजाला योग्य जीं चामरें तीं एखाद्या क्षुद्र मनुष्यानें मिरवून काय उपयोग ? मला अकीर्ति पतकरेल, कारण गोकुळांत तुम्ही उंची वस्त्रें नेसण्यास योग्य असूनही कांबळें पतकरल्याचा दाखला आहे. तेव्हां तोच कित्ता मी गिरवितों हें आपल्या कसें लक्ष्यांत येत नाहीं? मी दुबळा म्हणून हा कमीपणा पतकरिला. बलवान् असेल तो असली पड कां खाईल ? असा भाव.

अकीर्तिच असो, रुचे तुज कशी व्रजीं कांबळी ॥
असें न समजा कसें ? वरिल हारिला कांबळी ? ॥ १ ॥ ( कित्ता )

सुरर्षि म्हणतो, तुझें यशचि धन्य; यो[१७] गायना ॥
मला; कवि म्हणोत ते सुखद अन्ययोगायना ॥ ( कित्ता )

कीं याचकांसि देतां सरले चारीहि[१८] मुक्ति-धन-राशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशीं ॥ १ ॥
( मोरोपंत )

अथवा येतां झाला तन्मय शिवतांडवांत कैलासीं ॥
केला असेल गरुडें गर्व पुन्हां काय त्याच बैलासीं[१९] ॥ २ ॥ ( कित्ता )

जी भृगूचा कैसा अपकारु । किं तो मानूनि प्रियउपचारू ॥
तोषेचिना सारंगधरू[२१] ॥ गुरुत्वासी ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

देखें[२२] शवाच्या हातीं दीधलें ॥ जैसें रत्न कां वाया गेलें ॥
नातरि जात्यंधा[२३] पाहालें ॥ प्रमाण नोहे ॥ २ ॥ ( कित्ता )

---

१७ येवो. दुसरें ज्ञाते म्हणतात कीं तुझी प्राप्ती योगयोगादि साधनांना सुलभ आहे; तथापि नारद म्हणतो कीं 'तुझ्या सगुण लीलांची कीर्तिच धन्य आहे व ती माझ्या गाण्यांत येवो ! १८ सलोकता, सरूपता, समीपता व सायुज्यता या चार मुक्ति. १९ एकदां गरुडानें नंदीच्या नाकांत बोटें घालून त्याला चिडविलें असतां नंदीनें त्यास श्वासाबरोबर नाकांत ओढून घेतलें होतें. २० मोटा. २१ शार्ङ्गधनुष्य धारण करणारा ( कृष्ण ). २२ पहा. २३ जन्मांध मनुष्याला त्यांनें पाहिलेली गोष्ट प्रमाण होऊं शकत नाहीं.

# नववा पाठ.



## पंचमी.



११८ पंचमीचा मुख्य अर्थ अपादान म्हणजे वियोग. ह्या विभक्तीवरून कशापासून कशाचा तरी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष वियोग सुचविला जातो. जसें:-- ‘मथुरेहून आजच नाना आले.’ ‘ही बातमी मला तात्यापासून समजली.’ अपादानाचे भेद पुढें दिले आहेत.

११९ ज्या पदार्थापासून किंवा स्थानापासून क्रियेची उत्पत्ति होते तें स्थान पंचमींत घालतात. जसें:--‘आकाशांतून फुलें पडलीं.’ ‘झाडांवरून पानें गळतात.’

१२० क्वचित् वियोगाचा अर्थ असतां व ज्यापासून वियोग झाला तो शब्द सजीव प्राण्याचा वाचक असतां पंचमींत घालतात, आणि अशा पंचमीस ‘कर्तृपदी पंचमी’ असें म्हणतात. जसें:--‘ती आंगठी माझ्याकडून किंवा मजपासून गहाळ झाली.’ ‘हा रुपया गोविंदाजवळून आला.’

१२१ विशेषणांनीं किंवा क्रियेनें न्यूनाधिक्य किंवा वेगळेपणा वगैरे दाखवावयाचा असल्यास विशेषणामागचें नाम पंचमींत घालतात. जसें:--‘गंगेहून सिंधु मोठी आहे.’ किंवा मजहूनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला !’ (मोरोपंत)

१२२ दोन शब्दांतलि जाग्याची किंवा काळाची मर्यादा दाखविण्यासाठीं पंचमीचा उपयोग करितात जसें:-‘काशीहून रामेश्वर फार दूर आहे.’ ‘तो कालपासून घिरट्या घालतो आहे.’

१२३ ‘आंतून, जवळून, पासून, पासाव, पुढून, मधून, मोहरून, वरून आणि समोरून’ ह्या अवयवांनीं स्थळ-वियोगात्मक पंचमीचा बोध होतो. जसें:- ‘तुझ्या जवळून,’ ‘त्याच्या घरा समोरून, मज पुढून,’ इ०

१२४ अनेकांतून पसंती किंवा निवड दाखविण्याकरितां ‘ ‘आंतून, मधून, व पैकीं’ यांचा उपयोग करितात. जसें:-‘त्या पुस्तकांतून निळ्या पुठ्याचें पुस्तक आण.’ ‘ह्या आंब्यांपैकीं हवा तो घे.’

१२५ 'वरून' याचा अर्थ स्थलापासून, स्थलाजवळून, किंवा पार-पलीकडे असा होतो. जसें:-'उंटावरून शेळ्या हांकतो.' 'श्रीमंतांनीं हत्तीवरून साखरा वाटल्या.' 'चोरानें निवडुंगावरून उडी मारली.'

(क) 'वरून' या अव्ययानें क्वचित् आधार किंवा प्रमाण दाखविलें जातें. जसें:- 'तूं हें कशावरून म्हणतोस?'

१२६ कालाच्या किंवा स्थलाच्या गतीची किंवा स्थितीची मोजदाद करण्याकरितां 'पर्यंत, वर, वरी (वेऱ्हीं)' या अव्ययांचा उपयोग करतात. जसें:- 'घरा पासून डोंगरा पर्यंत धांवतो.' 'पासून' च्या ऐवजीं केव्हां केव्हां 'ते' हें अव्यय घालतात. जसें:-'जून ते जुलई (पर्यंत) एक महिना.'

१२७ 'पासून व स्तव' या अव्ययांवरून कार्य-कारण-संबंध दाखविला जातो. जसें:- 'असें करण्यापासून तुला धोका आहे.'

(क) 'स्तव' याचे बद्दल 'तव' असें ही जुनें रूप आढळतें. जसें:- 'लोकत्रय निफजे, इयेतव' (ज्ञानेश्वर).

---

## ९ पाठावली.

**मला ज्या गोष्टीचा मनापासून तिटकारा आहे ती गोष्ट तुम्ही जबरदस्तीनें माझ्याकडून करावयाला लागलांत तर ती विटंबना नव्हे कां!** (सौभद्र)

**असो, काळ्यापेक्षां पिठा दगड बरा. आमच्या तात्पुरत्या श्रीमंतांच्या पदरीं एक तात्पुरते पुराणिक पाहिजेत, ते आयतेच चालून आले.** (शारदा)

**म्हणजे जावत्काल पर्यंत हें उदर आहे तावत्काल पर्यंत त्याला अन्न हें पाहिजेच.** (किंत्ता)

**स्वारी पानिपताहून निभावून स्वराज्यांत यावी, आणि माझी बारा वर्षें दृष्टभेटही होऊं नये, असें कोणतें बरें पातक मी केलें होतें!** (तोत०बंड)

भाऊसाहेबांचें सोंग घेणाऱ्या ह्या दुष्ट सोंगाड्यानें अप्रतिष्ठा आणि विटंबना पेशव्यांच्या अंतःपुरापर्यंत आणून भिडविली याचा मला खेद होतो. ( किचा )

मोठा ढं[1] जरी असला तरी वरचेवर डोळ्यां समोरून व कानांवरून जाणाऱ्या गोष्टी त्याचे मनांत कांहींना कांहीं तरी बिंबतीलच. ( निबंधमाला )

या एकंदर बोलण्यांतील शब्द न शब्द शांतपणानें शिपायाच्या मुखांतून निघत होता. ( उषःकाल )

हा घुणाक्षर न्यायानें[2] या कटकटींतून खरें खरच नांव विचारण्याचा कनर्ड प्रश्न उमटला कीं काय ? ( भावबंधन )

इकडे काळ्या कुळकुळीत रंगावरून वाटे कीं ही आफ्रिकेची[3] हुंडी गफलतीनें पत्ता चुकून हिंदुस्थानच्या पेठीवर आली असावी. ( प्रेमसंन्यास )

---

दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गाड ॥
तुका म्हणे तैसा सज्जनांपासून । पाहतां अवगुण मिळेचिना ॥ १ ॥
( तुकाराम )

अग्नि, सर्प, चोर, व्याघ्र । रोग, राक्षस कां परचक्र ।
यां पासाव आपुलें राष्ट्र । रक्षिसी कीं नरेंद्रा ॥ १ ॥ ( मुक्तेश्वर )

पडे केळ जैसी महाचंडवातें[4] । असें देखतां ये कृपा माधवातें ॥
उठी शीघ्र टाकी पलंगावरोनी । धरी उत्तरीयांबरा[5] सावरोनि ॥ १ ॥
( वामन )

देखुनिया गमनें[6] निग्रह राघवाचा । बोले उभा भरत निश्चयरूप वाचा ॥
वर्षें चतुर्दशवरीच धरीन देहा । त्यानंतरें त्यजिन यास, निरोप देहा ॥ २ ॥ ( कित्ता )

---

१ ठोंब्या. २ चुकून ३ कुरूप व काळी स्त्री. ४ सोसाट्याच्या वाऱ्यानें. ५ पांघरावयाचें वस्त्र ६ जाण्याचा निश्चय.

आकाशामधुनी फुलें, जनकजानेत्रांतुनी हांसरे ।
दृक्पात, स्मित मंद राज ललना-चयांतुनी धावरें ॥
राजांच्या नत मस्तकांतुनि तदा सन्मान नानापरी ॥
विप्रास्यांतुनि धन्यवाद पडले येऊन रामावरी ॥ १ ॥ ( गृहविहार )

कदा नेणों वोढी, शरधिं[10]तुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वीं[11] जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या[12] वक्षावरि विवर-लक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान-करणी ॥ १ ॥ ( रघु० पंडित )

हळूहळू घन गर्जतसे नभीं । मुरलिहून चढेल म्हणून भी ॥
श्रवण-भक्ति[13]-अतिक्रम वर्जतो । करित कीर्तनही घन गर्जतो ॥ १ ॥
( वामन )

असुर म्हणति विद्यनं प्रबळ करायासि देव या नीचें ॥
मन मोहिलें गुरूचें गुरु-चित्ताहूनि देवयानीचें ॥ १ ॥ ( मोरोपंत )

द्वारवतींत वसे तो यति वार्षिक[14] चार मासपर्यंत ॥
हर्यंतःकरणा[15]सचि ठावा तद्योग जो संपर्यंत[16] ॥ २ ॥ ( किता )

कोठें गेली होती, श्वशुर-गृहाहूनि काय आणविली ॥
हा ! सचिवांनीं असुनी दानोचितता[17] इची न जाणविली ॥ ३ ॥
( किता )

तूझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट ते ॥
सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते ॥
क्षमा न करि एकदां, तरिहि फार खोडी करां; ॥
न देचि भय, ताडनोद्यमें[18]समेत सोडी करा ॥ ४ ॥ ( किता )

---

७ सीतेच्या डोळ्यांतून. ८ राजस्त्रियांच्या चेहऱ्यांवरून धावरें मंद हास्य. ९ ब्राह्मणांच्या तोंडून. १० भात्यांतून. ११ धनुष्यावर. १२ शत्रूच्या. शत्रूच्या छातीवर लाखों व्रण पटापट दिसूं लागले म्हणजे नळराजाच्या शरसंधानांचें कसब कळे असा भाव. १३ मुरलीपेक्षां आपला आवाज चढला तर श्रवणभक्तीची अमर्यादा केल्यासारखें होईल असें मनांत आणून मेघ बेतानें गर्जूं लागला. १४ पावसाळ्याचे चार महिने. १५ कृष्णाच्या मनाला. १६ संपूर्ण. १७ लग्न करावयास पात्रता. १८ मारण्याच्या उद्योगाबरोबरच तुझे हातही सोडती झाली. म्हणजे मारावयाचा बेत तर तहकूब केलाच, पण तुझे होते तेही सोडले.

देखे मेघांनि सुटति धारा । तिया न रूपती जैसिया अंबरा ।<br>
तैसी शुभाशुभें योगीश्वरा । नव्हाति आनें[19] ॥ १ ॥<br>
तेथ आदिलापांसोनि[20] पार्था । आइकिजे ऐसीच आस्था ।<br>
दुणावली हें यदुनाथा । पावों सरलें[21] ॥ २ ॥ (क्षित्ता)<br>
तरि आतां चंद्रापांसोनि[22] निवाविते । जें अमृताहीहूनि जीवावितें ।<br>
तेणें अवधानें कीजो[23] वाढतें । मनोरथां माझेया ॥ ३ ॥ (क्षित्ता)<br>
येऱ्हवीं तऱ्हीं भुइं आंतानि स्वयंभ । काइ घडे गाडुआंचे[24] निगताति कोंभ ।<br>
पुडुतिं ते कुलालमतिचे[25] गर्भ । उमटले किं ॥ ४ ॥



१९ योग्यांना शुभाशुभांत भेद दिसत नाहीं. २० पहिल्यापासून २१ कृष्णाला कळून चुकलें. २२ चंद्राहून शीतळ करितें. २३ अशा प्रकारचें लक्ष्य देऊन तुम्ही माझ्या इच्छेला उत्साह आणा. २४ गाडग्यामडक्यांचे. २५ तो कुंभाराच्या कल्पनेचा विलास आहे.

# दहावा पाठ.

## अधिकार.

### सप्तमी.

१२८ क्रियेच्या स्थानाला ' अधिकरण ' असें नांव आहे, व तें सप्तमी विभक्तीनें दाखविलें जातें. जसें:-' सूर्य आकाशांत तळपतो. ' ' मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. '

१२९ क्रियेचा काळ दाखविण्याकरितांही सप्तमीचा उपयोग करितात. जसें:- ' गेल्या वर्षीं पाऊस चांगला पडला. ' ' वैशाखमासीं वासंतिक समय शोभला ' ( सौभद्र ).

१३० अनेक व्यक्तींतून एखाद्या व्यक्तीचें विशिष्ट गुणांत श्रेष्ठत्व दाखविण्याकरितां अनेक व्यक्तींचा वाचक शब्द सप्तमींत घालतात. जसें:-' विष्णु वर्गांतल्या सर्व मुलांत उंच आहे. ' ' पांखरांत काऊ आणि माणसांत न्हाऊ ( धूर्त ). '

१३१ ' धरणें किंवा पकडणें ' अशा अर्थाच्या क्रियापदांचा उपयोग करितांना ज्या बाबतींत धरावयाचें तिची सप्तमी घालतात. जसें:-' मला असा शब्दांत धरूं नको. '

१३२ ' श्रद्धा, विश्वास, भक्ति, प्रीति ' वगैरे भावनादर्शक नामें किंवा क्रियापदें वाक्यांत आलीं असतां भावनेचा विषय किंवा पात्र सप्तमींत घालतात. जसें:-' त्याच्यावर माझा भरंवसा नाहीं. ' ' रत रे रत सखया राघव-नामीं. '

१३३ ' व्यग्र, तत्पर, चूर, मग्न, गुंग ' वगैरे तल्लीनपणा दाखविणारीं विशेषणें व क्रियापदें आणि ' कुशल, निपुण, चतुर, पटाईत, तरबेज, धूर्त, प्रवीण, पटु, पारंगत, पंडित, हुषार, निष्णात, ' इत्यादि विशेषणें ज्या कार्यांत गढलेला असेल किंवा ज्या गुणांत कौशल्य दाखवावयाचें असेल त्याची सप्तमी घेतात. जसें:- ' दुःखांत व्यग्र, ' ' अभ्यासांत चूर, ' ' वाचनांत गुंग ' ' पोहण्यांत पटाईत, ' ' गायनांत प्रवीण ' इत्यादि.

१३४ 'ई' हा सप्तमीचा प्रत्यय लागून झालेल्या रूपांना संबंधी विशेषणाचा 'च' प्रत्यय लागून विशेषणें होतात. जसें:-'मनींचें हितगुज' (सौभद्र). 'त्या दिवशींचा कार्यक्रम,' 'स्वर्गींचे अमर इच्छिताती' (तुकाराम).

१३५ सप्तमीचा केव्हां केव्हां उद्देशार्थी किंवा संप्रदानार्थी चतुर्थीसारखा उपयोग करितात. जसें:-'देह लावावें कारणीं' (रामदास).

१३६ सप्तमीचें अधिष्ठान दाखविणारीं अव्ययें पुष्कळच आहेत, तीं हीं:-- 'अलीकडे, अंतीं, आंत, अभ्यंतरीं, उपरि, कडे, खालीं, खालें, खालतीं, जवळ ठायीं, तळीं, पलीकडे, पार, पारें, पुढें, पुढ्यांत, पैल, बरोबर, बाहेर, भर, भीतरीं, भोंवतीं, भोंवतालीं, सभोंवतीं, मार्जी, माझारी, मागुती, मागें, मागोमाग, लगत, लगत्यास, लागून, लागोलाग, वर, वरता (वरोता), वरतीं, वरी, विरुद्ध, संनिध, समक्ष, समोर, सरशीं, सरसा, सरसून' इत्यादि.

(क) हीं सर्व अव्ययें स्थल किंवा काल यांचा बोध करितात. कित्येक दोघांचा बोध करितात. जसें:-'आडा अलीकडे,' 'घरामागें,' 'कांहीं दिवसां मागें' इ०.

(ख) 'भर' यावरून स्थल व काल या दोहोंचा तर बोध होतोच, पण सर्वत्र व्याप्ति सुचविली जाते. जसें:-'गांवभर,' 'रानभर,' 'वर्षभर' इ०

(ग) 'आंत' (आंतोतें) याचा उपयोग 'आंतल्या भागीं' असा होऊन शिवाय 'वर' किंवा एखाद्या स्थळीं अशा अर्थानेंही होतो. जसें:--'घरांत,' 'पायांत जोडा,' 'डोईस किंवा डोकींत पागोटें' इ०.

(घ) 'वर,' व 'विरुद्ध' यांचा समानार्थी उपयोग करितात. जसें:-- 'कुळावर किंवा कुळाविरुद्ध फिर्याद करितो.'

(ङ) 'बरोबर' याचा तत्काळ अशा अर्थी उपयोग होतो. जसें:—'त्याबरोबर सारे भ्याले.'

(च) 'सरसा' व 'सरशीं' यांचाही असाच उपयोग होतो. मात्र तीं मूळचीं विशेषणें असल्यामुळें त्यांचीं लिंगाप्रमाणें रूपें बदलतात. जसें:—'त्या सरसा तो गेला,' 'त्या सरशी ती उठली.'

(छ) 'अन्तीं' याचा अखेर शेवटी, अशा अर्थी उपयोग करितात. जसें:- 'अनुभवांतीं खात्री होईल.'

( ज ) नियमित संख्येंतून निवड सुचवावयाची असल्यास 'पैकीं' हें अव्यय योजतात. जसें:—'त्यांपैकीं तुला कोणता आंबा पाहिजे ?'

---

## १० पाठावली.

**मुंबईच्या जागेवर दोघातिघांचा डोळा होता.** ( पण लक्ष्यांत० )

**अगबाई सगळेंच मुसळ केरांत ? गौरीपुढें मिठाईचें तबक ठेवायला विसरलेंच !** ( शारदा )

**कारण ही दक्षिणा कांहीं चकारी[1] पकारीवर भागायची नाहीं. किमान पक्ष बाण[2] संख्या तर खरी !** ( किचा )

**हां, तर मग मी तुला सांगतों या ढोंग माजविण्याच्या अपराधांत गर्ग मुनि समील आहेत, त्यांच्यावर मी दादासाहेबांकडे फिर्याद करतों.** ( सौभद्र )

**मी आपणाकडे आलें होतें तेव्हां आपण साखरझोंपेंत होतां.** ( गुप्तमंजूष )

**ताई, आलें घोंगडें गळ्यांत ! आतां आपण होऊन आपली फजीती करून घेण्यांत काय शहाणपण आहे ?** ( त्राटिका )

**माल्लिके ! त्याच्या वचनावर भरंवसा ठेवूं नको. त्याचें तें सगळें पैठणी[3] प्रेम आहे.** ( विकारविलसित )

---

**नाहीं संतपण मिळत हें हाटीं[4] । हिंडतां कपाटीं[5] रानीं वनीं ॥**
**नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥**
**तुका म्हणे आहे आपल्या तें अंगीं । गवसेना जगीं दुजे ठायीं ॥ १ ॥**
( तुकाराम )

**ऐकूनि प्रधानांची युक्ति । कंसासी हर्ष न समाय चित्तीं ।**
**म्हणे तुमचे बुद्धीपुढें बृहस्पती । उणा वाटे मजलागीं ॥ १ ॥** (श्रीधर)

---

१ चवली पावलीवर. २ पांच (रुपये). ३ वरकरणी. ४ बाजारांत. ५ गुहेंत.

तों गोखुरांमागें चांगलीं । पावलें हरीचीं उमटलीं ।
अक्रूरें घेउनीयां धुळी । लाविली भाळीं आपुले ॥ २ ॥ ( कित्ता )

यावरि बोले कुरंगनयनी[6] । कोण तुम्हांस बैसविल भोजनीं ।
होचि चिंता अपार मनीं । मजलागोनी वाटते ॥ १ ॥ ( महीपती )

मोक्ष–सिंहासनाची पायरी । प्रथम नाम[7] अयोध्यापुरी ।
ज्ञानस्वरूप जीमाझारी । राज्य करी हरिश्चंद्र ॥ १ ॥ ( मुक्तेश्वर )

लतेतळीं रुंद निरुंद कालवे । गळोनि तेथें मकरंद[8] कालवे ॥
परागेंही[9] सांद्र[10] तयांत रंगती । फुलांसवें भृंगतती[11] तरंगती ॥१॥(रघु. पं.)

जो पाहे सदसद्विचार हृदयीं जोपा[12] जनाची करी ॥
जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनां[13]भीतरी ॥ ( कित्ता )
ज्ञाता जो सरसावला नव रसांमाझारि शृंगारसा ॥
शोभे तामरसाक्ष[14] तो नळ रसानाथ[15] स्तवूं फारसा ॥ ( कित्ता )

टाकी उपानह[16], पदें अतिमंद ठवी । केली विजार वरि डोरांहि[17] मौन सेवी॥
हस्तीं करी वलय[18] उंच, अशा उपायीं । भूपें हळूंच धारिला कलहंस पायीं
॥ २ ॥ ( कित्ता )

---

कळी[19] करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं ।
तयांत अविशुद्ध मी शलभ जेंवि दावानळीं ॥
व्रणार्त पशुच्या शिरावारि वनीं उभे काक–से ।
स्मरादि रिपु मन्मनीं, अहि न काळ भेका कसे ? ॥ ( केकावली )

---

६ हरिणाक्षी. ७ ‘ अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवन्तिका, । पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायकाः ’॥ १ ॥ या सात मोक्षदायक पुरींमध्यें अयोध्येचें नांव पहिलें आहे. ८ फुलांतला मध. ९ फुलांतले रजःकण. १० दाट. ११ भुंग्यांच्या ओळी. १२ पालन. १३ ‘ पुण्यश्लोको नलो राजा ’ इत्यादि श्लोकांत नळाचें नांव पाहिलेंच आहे, त्यावरून पवित्र मंडळींत विशेष मानिलेला असा आशय. १४ कमलनेत्र. १५ पृथ्वीपति. १६ जोडा. १७ झगा. १८ कडें. १९ नळराजा पवित्र, तरी त्याच्याशीं कलीनें भयंकर वैर केलें. मग मी तर पापी आहे, वणव्यांत सांपडलेल्या टोळासारखी माझी गत आहे. जखमी जनावराच्या डोक्यावर कावळे बसावे तसे काम क्रोधादि शत्रु माझ्या मनांत उभे आहेत. मग ( नसले ) साप ( मजसारख्या ) बेडकाचा चट्टामट्टा करणार नाहींत का ?

प्रभो शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे ।
म्हणोनि इतुकोंचि हें स्वहित-कृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें ।
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें[२०] ॥ २ ॥ (किता)

तेव्हां धावुनि बसे पार्थ सुभद्रारथीं जसा पाटीं ।
सुचिरें[२१] क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥ ३ ॥
(मोरोपंत)

हस्तांत कोदंडें[२२], पदांत पादुका, स्कंधासि तूणीर[२३], शिरीं जटावली ।
कासेस वल्कांबर[२४], मूर्ति राघवी[२५] ऐशापरी ती विपिनास चालली ॥ १ ॥
(वनविहार)

क्रोधें जळे मणि अचेतन सूर्यकांत ।
ज्या लागतांचि दिननायक-पाद घात[२६] ॥
संभावितांत गणना पहिली जयाची ।
साहेल तो पण कशी शठता[२७] दुजाची ? ॥ १ ॥ (वामन)

दिसे ज्या प्राणांची स्थिति जलजें-पत्रोदक[२८] जसें ।
तयासाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें ॥
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुर धनलोभास्तव वृथा ।
सलज्जें म्यां केली बहुतर मृषात्मस्तुति-कथा[२९] ॥ २ ॥ (किता)

जो मानसीं[३०] विहरतो विहरो परी तो ।
कां आमुची कुलसती असती करितो ? ॥

---

२० चातकाकरिनां मेघ पडतो हे खरें, पण त्यानें निदान तोंड तरी उघडलें पाहिजे. तसें तुम्ही तेव्हांच प्रसाद करितां हें खरें, पण जीवांनीं तुम्हांला शरण तरी आलें पाहिजे असा भाव. २१ फार वेळचा उपाशी. २२ धनुष्य. २३ भाता. २४ झाडांच्या सालींचें वस्त्र. २५ रामाची (मूर्ति). २६ सूर्याच्या पायांचा (किरणांचा) प्रहार. २७ लुच्चेगिरी. २८ कमळाच्या पानावरचें पाणी. २९ खोटी स्वतःच्या स्तुतीची कहाणी. ३० नळाचा कीर्तिरूपी हंस मानस सरोवरापर्यंत येऊन विहार करितो, तो करो बापडा, पण 'आम्ही सुवर्णकांति हंस' ही जी आमच्या कुळाची कीर्ति ती नाहींशी करितो. कारण तो शुभ्र असल्यामुळें त्याच्या छायेनें आम्ही शुभ्र होतों. तेव्हां नळा, तूं आपला कीर्ति हंस आवरून घे असें गाऱ्हाणें घेऊन आम्ही पृथ्वीवर आलों आहों.

राखीं नळा निज यशोमय हंसराया ।
आलों महीवर फिराद अशी कराया ॥ १ ॥ ( रघु० पं. )

मी गुंतलों नळ–महींद्र–गुणौघें[31]–पाशीं ।
सेवेसही मग करून तयाचपाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ।
लोकेशता विभवही चतुराननाचें ॥ २ ॥ ( कित्ता )

अवधानाचेनि[32] हातें । नेयाँ[33] पां हृदयाँ[34] आंतौतें ।
हे रिझवितील आणितें[35] । जाणांचिए[36] ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )
पैं गा मनुष्यांचेया सहस्रा । माझि विपाइलेयांचि[37] एथ धिंवसा[38] ।
तसेयां धिंवसेकरां[39] बहुवसां । माझि विरला जाणे ॥ २ ॥ ( कित्ता )

आतां तेया पडणेयाँ[40] अरौतें । पडण चूकवावया पुरतें ।
नाहिं म्हणौनि तेथें । पडावेंचि पडे ॥ ३ ॥ ( कित्ता )

इयापरी त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी[41] पावे मातें ।
जेयां पांवणेयां[42] परौतें । आणिक नाहीं ॥ ४ ॥ ( कित्ता )

आतां स्त्रीगणाचां पैकीं । माझिया विभूति सात येकि ।
तिया आइक कवतिकीं[43] । सांघिजती[44] ॥ ५ ॥ ( कित्ता )

पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासिं चि त्वचेचिया पदरासि आड ।
परि ते अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध[45] काइ नेघती ॥ ६ ॥ ( कित्ता )

---

३१ नळराजाच्या गुणांच्या जाळ्यांत. या चतुराला ( नळाला ) ब्रह्मदेवाचें लोकपतित्व व वैभव ( लाभलेलीं ) पाहून कोण नाचणार नाहीं ? ३२ लक्ष्य हाच हात, त्यानें. ३३ न्या. ३४ हृदयाच्या आंत. ३५ इच्छेला. ३६ जाणत्यांच्या. ३७ थोड्यांनाच. ३८ धमक. ३९ धमक बाळगणाऱ्या पुष्कळांत. ४० एकदं मनुष्यानें उडी घेतल्यावर पडण्याच्या अलीकडे, पडणें चुकविण्याजोगें साधन नाहीं. ४१ निश्चयानें. ४२ ज्या पावण्यापलीकडे. ४३ कौतुकानें. ४४ सांगितल्या जातील. ४५ दूध कातड्याच्या आंतल्या बाजूला जवळच असतें, पण तें सोडून मूर्ख गोचडी रक्तच घेत नाहीं का ?

# अकरावा पाठ.



## षष्ठी–अधिकार.



१३७. पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'षष्ठी' विभक्ति ही, नामाच्या नामावर चालणाऱ्या सत्तेचें उदाहरण असून, तिचा संबंध क्रियापदाशीं प्रत्यक्ष पोहोंचत नाही. षष्ठीचा दुसरा विशेष हा की, त्या विभक्तीच्या रूपांचें स्वरूप विशेषणासारखें असतें व पुढच्या शब्दाच्या लिंग वचनानुसार तें बदलतें. जसें:—'हरीचा रुमाल,' 'हरीची टोपी,' 'हरीचें पुस्तक.'

१३८. षष्ठीचा मुख्य अर्थ मालकी किंवा स्वामित्व. ज्या शब्दाची दुसऱ्या एखाद्या नामवाचक शब्दावर मालकी उद्दिष्ट असेल तो शब्द षष्ठीत घालतात. जसें:—'माझें घर,' 'राजाचा मुकुट.' या मालकीच्या अर्थांत पुष्कळ बारीक छटा उत्पन्न होऊन षष्ठीच्या उपयोगाची व्याप्ति पुष्कळच वाढली आहे, तिचा आतां क्रमानें विचार करूं.

१३९. क्रियेच्या फळाशीं कर्त्याचा असलेला संबंध दाखविण्याकरितां षष्ठीचा उपयोग होतो. जसें:—'पक्ष्याचें घरटं,' 'रामाचें पत्र.'

१४०. षष्ठीवरून केव्हां केव्हां 'नातें, पोष्यपोषकभाव, स्नेहभाव, आपलेपणा' वगैरे दाखविले जातात. जसें:—'माझा भाऊ,' 'विमा कंपनीचा एजंट,' 'आमचा भारत.'

१४१. सबंध पदार्थाचा आपल्या अंशाशीं संबंध दाखविण्याकरितां षष्ठी घालतात. जसें:—'घराचा मजला,' 'सुपारीचें खांड.'

१४२. वस्तूशीं गुणांचा धर्म–धर्मी संबंध षष्ठीनें दाखविला जातो. जसें:—'रागाचा पुतळा,' 'योग्यतेचा माणूस.'

१४३. ज्या द्रव्याचा एखादा पदार्थ बनविला असेल त्याचा त्या पदार्थाशीं प्रकृति–विकृति संबंध दाखविण्यास षष्ठी घालतात. जसें:—'बोरूची लेखणी,' 'मोत्यांची कठा,' 'कायद्याचें पुस्तक' इ०.

१४४. जेथें एखादा पदार्थ ठेवावयाचा, त्या पदार्थाशीं त्या स्थानाचा आधाराधेय संबंध षष्ठीनें दाखविला जातो. जसें:—'तेलाची तपेली,' 'पुस्तकांचें कपाट' इ०.

१४५. वंशाचा किंवा घराण्याचा व्यक्तीशीं संबंध षष्ठीनें दाखवितात, पण गोत्रांचा संबंध सामासिक विशेषणानें किंवा सप्तम्यन्त विशेषणानें दाखवितात. जसें:—'दामल्यांचा विनू.' पण 'काश्यपगोत्री किंवा काश्यपगोत्रांतला नवरामुलगा.'

१४६. मनोविकारांचें उत्पत्तिकारण षष्ठांत घालतात. जसें:—'आईची ममता.' 'पैशाचा लोभ.' 'बोलण्याचें नवल.' 'वाघाची भीति.'

१४७. व्यक्तीचा गुणाशी गुणि-गुण संबंध षष्ठीनें दाखवितात. जसें:-'मनाचा मोकळा,' 'जिभेचा जड,' 'वचनाचा धड,' 'मेद मुर्खांचा कोंवळा' (तुकाराम).

१४८. 'कारण, उपयोग, किंवा हेतु' दाखविण्याकरितां कधीं कधीं षष्ठीचा उपयोग करितात. जसें:—'गाडीचा घोडा,' 'विक्रीचा माल,' 'खाण्याचा जिन्नस.'

१४९. एका स्थितींतून दुसऱ्या स्थितींत संक्रमण षष्ठीनें दाखवितात. जसें:-'श्रीमंताचा गरीब झाला.' 'संस्कृताचें प्राकृत करा.'

१५०. दोष, आरोप, व तन्निमित्त होणारी शिक्षाही षष्ठीनें दाखवितात. जसें:—'चोरीचा आरोप,' 'बालहत्येचा दोष,' 'काळ्या पाण्याची शिक्षा.'

१५१. एखाद्या मिळकतीचें उत्पन्न किंवा वस्तूची किंमत सांगतांना त्या मिळकतीची किंवा वस्तूची षष्ठी घालतात. जसें:—'शेताचा फाळा.' 'ह्या डाळबाचा एक आणा येईल.'

१५२. गुणि-गुण संबंध दाखवितांना एखादे वेळीं गुणवाचक शब्दाचीच षष्ठी घालून त्याजकडे स्वामित्व देतात. जसें:-'सचोटीचा माणूस,' 'चतुराईचें काम.'

१५३. कर्तृवाचक नामांचा कर्माशीं संबंध षष्ठीनें दाखवितात. जसें:-'मुलांचा शिक्षक.' 'तापाचा उतारा.'

१५४. पदार्थाच्या किंमतीचा भाव किंवा दर सांगण्यास षष्ठीचा उपयोग करितात, जसें:-'तिसांचें सोनें' (तीस रुपये तोळा मिळणारें सोनें). 'तीन शेरांचे गहूं' (रुपयाला तीन शेर भावाचे गहूं).

१५५. एकाच शब्दाची द्विरुक्ति होऊन पूर्वीच्या शब्दाचें संबंधी विशेषण होतें आणि पुढला शब्द त्याचें विशेष्य होतो. या विशेष्याप्रमाणें षष्ठ्यन्त विशेषणाचें रूप फिरतें, व त्यापासून समाहाराचा, निश्चयाचा, दुःखाचा वगैरे बोध होतो. जसें:-'पैशाचा पैसा गेला.' 'गांवचे गांव ओस पडले,' 'कोण कुणाचा सखा.' हानीच्या अर्थी क्वचित् 'परी' हें अव्यय घालतात. जसें:- 'पैशापरी पैसा गेला.'

१५६. काळासंबंधी नियमितपणा दाखविण्यासाठींही द्विरुक्त षष्ठीचा उपयोग करितात. जसें:-'तो तारखेच्या तारखेस भाडें देतो.'

१५७. षष्ठीनें केव्हां केव्हां कालदर्शक सप्तमीचा अर्थ होतो. जसें:—'रात्रीचा जागतो व दिवसाचा निजतो.'

१५८. षष्ठीवरून पुष्कळ वेळां संबंधी विशेषणाचा, गुणविशेषणाचा, रीति विशेषणाचा वगैरे अर्थ होतो. जसें:- 'मंगळवारचा केसरी,' 'काळ्या रंगाचा घोडा,' 'फिरण्याचा छंद.'

१५९. स्थळ व काळ यांची मर्यादा दाखवितांना षष्ठ्यन्त विशेषणाचा अधिकरणार्थी उपयोग होतो. जसें:—'मी घरचा एकटा आहे.' 'सात दिवसांचा उपाशी.'

१६०. षष्ठीचा क्वचित् अपादानार्थी पंचमीच्या अर्थानें उपयोग होतो. जसें:-'पंतोजीचा मार मिळेल.' 'त्या वाटेला चोरांचें भय आहे.'

१६१. षष्ठीचा केव्हां केव्हां चतुर्थीच्या अर्थानें उपयोग करितात. जसें:- 'मला तुझी काळजी करावी लागते.' 'देव सर्व जगाची चिंता वाहतो.'

१६२. 'बद्दल, बाबत-द, विषयीं, विशीं, संबंधी,' या शब्दयोगी अव्ययांवरून षष्ठीचा बोध होतो. जसें:-'घराबद्दल वाद.' 'हक्कासंबंधी तक्रार.' 'येविशीं चिंता करूं नये.'

१६३. षष्ठीचा उपयोग संस्कृतांत फार अनियंत्रित आहे. मराठींत तो तितका नाहीं, तरी बराच आहे. जुन्या मराठींत षष्ठीचा प्रत्यय गाळून नुसत्या सामान्यरूपानें विभक्ति दाखविण्याचा प्रचार होता. जसें:—'तें मना नये श्रीमुरारि (च्या)' (ज्ञानेश्वर). क्वचित् इतर विभक्तीच्या संबंधानेंही असा प्रकार आढळतो. जसें:—'होता तेयाचा हातु (हातीं)। पैठें जालें'। (ज्ञानेश्वर).

१६४. अधिकाराचा तिसरा प्रकार जो 'नामांवर चालणारी अव्ययांची सत्ता' त्याचा एक मासला कलम १३६ (च) मध्यें आला आहे. दुसरा मासला म्हणजे शब्दयोगी अव्ययें प्रातिपदिकांचें सामान्यरूप करितात तो होय. बहुतेक शब्द-योगी अव्ययें हीं स्वतः कोणत्या तरी प्रातिपदिकांचीं विभक्त्यन्त रूपें आहेत व जुन्या मराठींत त्यांचा स्वतंत्र उपयोग होतही होता. पण आतां त्यांतील बहुतेक अव्ययें बनलेलीं असून त्यांच्या पूर्वीं शब्दाचें सामान्य रूप होतें. अव्ययांच्या सत्तेचा तिसरा मासला म्हणजे संबोधनार्थी अव्ययें आपल्या नामांवर वचनांपुरती सत्ता चालवितात हा होय. जसें:- 'बायांनो या सोडोनी' (शाकुंतल). 'अगा प्रचीतीचे लोक हो!' (रामदास).

---

## ११ पाठावली.

**हीं बघीतलीस खुणगांठींच्या फुग्यांनीं उपरण्याचीं कशी सुतपुंतळी झाली आहे ती!** (प्रेमसंन्यास)

**प्रकरण जरा जड आहे, पण तुझ्यापासून तिला नरम करण्याची गुरुकिल्ली आतां शिकलोंच आहे.** (त्राटिका)

**मी या तोतयाची थोडी गय केली, पण त्यामुळें तोतया शेणा-मेणाचा होता, तो लोखंडाचा होऊन बसला.** (तोत० बंड)

**शेषाचा भार हलका करायला सरड्यानें धांवण्याचें कारण नाहीं.** (किचा)

**प्रत्यक्ष चक्रवर्ती राजाच्या दर्शनाचे अभावीं त्याच्या प्रतिनिधीचें दर्शन सुद्धां 'रवि-अरुण' न्यायानें त्यांना मंगलदायकच होतें.** (केळकर)

**आणि इकडचा सूर्य इकडे उगवला तरी इकडून कांहीं पै सुद्धां सुटायची नाहीं.** (शारदा)

**तेच शेवटीं त्याच राष्ट्रांचे दासानुदास झालों, आणि याला कारण आमचे आम्हीच!** (किचा)

---

१ कापसाचें वस्त्र (स्त्रिया पूजेंत करतात तें).

तुला सांगून ठेवतें पडली तर त्या महाराजांची सेवाच माझ्या उपयोगीं पडेल. ( सौभद्र )

---

माय ती सर्पीण बाप जरी बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ॥१॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान-गर्व-ताठा॥३॥
( तुकाराम )

मोक्षाचें तों आम्हां नाहीं अवघड । तों असे उघड गांठोडिशीं ॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरावितां ॥
ज्याचें त्यासी देणें कायसें उचित । मानूनिया हित घेतों सुखें ॥
तुका म्हणे सुखें देई संवसार । आवडीसी थार करीं माझ्या ॥ २ ॥
( कित्ता )

नामा म्हणे मज वाटतसे चित्तीं । करीतसे खंती फार तुझी ॥(नामदेव)
अवघाची संसार सुखाचा करीन । अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक॥
( नामदेव )

दिनाचा दयाळू मनाचा मवाळू । स्नेहाळू कृपाळू जनीं दासपाळू ॥
तया अंतरीं क्रोधसंताप कैंचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥१॥
( रामदास )

भल्या माणसा दसलाखांची गोष्ट सांगतो फोडुं नको ।
पन्नाशीची झुळुक लागली बाइल दुसरी करूं नको ॥ ( शारदा )

---

मंदाकिनीमधिल[2] जीं कनकारविंदें[3] ।
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें[4] ॥
आम्ही असों नृपसुते तरि कांचनाचे[5] ।
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचें ॥ १ ॥ ( रघु. पं. )
पढवीन ज्यासि विद्या ही त्यास. फळेल, तूंहि घे शाप ।
तुज कोणीही ऋषिसुत न वरील फळो तुझें तुला पाप ॥ १ ॥ (मोरोपंत)

---

२ गंगेतील. ३ सोन्याचीं कमळें. ४ ज्यांचे देठ, तंतु व गड्डे मऊ आहेत अशीं कमळें ).५ सोन्याचे.

# चवदावा पाठ.

## कृदन्तें.

२२० ज्या शब्दावरून क्रियेचा अपूर्ण बोध होतो, अशा धातुसाधितास 'कृदन्त' असें म्हणतात. संस्कृतप्रमाणें मराठी वाक्यरचनेंतही कृदन्तांचा उपयोग मोठा आहे. संक्षेप, विस्तार, आणि शोभा या तिन्हीं कामांला कृदन्त येतात. १ धातुसाधित नामें, २ वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें, ३ वर्तमानकालवाचक अव्ययांचे दोन प्रकार, ४ भूतकालवाचक कर्तरि व कर्मणि विशेषणें, ५ भूतकालवाचक अव्ययें, ६ भविष्यकालवाचक विशेषणें, आणि ७ विध्यर्थक विशेषणें; हीं मुख्य कृदन्तें आहेत. त्यांचा क्रमानें विचार करूं.

२२१ धातूला ' णें ' प्रत्यय लागून नपुंसकलिंगी नाम होतें, व तें इतर नामांप्रमाणें वचन विभक्ति घेतें. हें व इतर धातुसाधितें सकर्मक क्रियापदांपासून झालीं असल्यास कर्मासह उपयोगांत येतात. ह्या धातुसाधित नामावरून क्रियेच्या अर्थाचा बोध होतो. जसें:—'माझें बोलणें तुला आतां कडू लागेल.'

( क ) ' णें ' कारान्त नामावरून केव्हां केव्हां ' विनंति, सूचना, निरूपण ' वगैरेंचा बोध होतो. जसें:–' शरीर भेदावरी न जाणें ' ( रामदासस्वामींचें पत्र ). ' आपण श्रीच्या आज्ञेप्रमाणें देवाचा कार्यभाग चालूं देणें, ' ( कल्याणस्वामींचें पत्र ). ' सकाळीं लवकर उठणें, मग स्नानसंध्या करणें, मग पुराण सांगणें, असा त्यांचा नित्यक्रम असे. '

( ख ) ' णें ' कारान्त नाम ' आहे ' या क्रियापदाचें उद्देश्य असतांना ' जरूरीचा ' किंवा ' कर्तव्याचा ' बोध होतो. जसें:—' तुला काय करणें असेल तें कर. '

( ग ) पुष्कळ वेळां हीं नामें सामान्यनामांच्या अर्थानें उपयोगांत येतात. जसें:—' असें बोलणें ( भाषण ) ठीक नाही. '

# बारावा पाठ.

## नामें व सर्वनामें.

---

१६५. वाक्याच्या घटकांमध्यें प्रातिपदिकें, अव्ययें, क्रियापदें व कृदन्तें असें वर्गीकरण करितां येईल. पैकीं प्रातिपदिकांची व्याख्या पूर्वीं दिलीच आहे ( कलम ६८ पहा ). प्रातिपदिकांपैकीं जीं प्रत्यक्ष रीतीनें पदार्थ दाखवितात, म्हणजे त्यांचीं नांवेंच असतात तीं नामें होत, जीं अप्रत्यक्षपणें पदार्थ दाखवितात तीं विशेषणें होत. आतां त्यांचा क्रमानें विचार करूं.

१६६. नामांच्या ( १ ) सामान्य नाम ( २ ) विशेष नाम ( ३ ) भाववाचक नाम, अशा तीन जाती मानिल्या आहेत. खरें पाहिलें असतां हीं तीन्ही,पदार्थांचींच नामें आहेत; परंतु सामान्य नामांवरून पदार्थाच्या सामान्य जातिधर्मांचा, विशेष नामांवरून विशिष्ट व्यक्तिमत्वाचा व भाववाचक नामांवरून एखाद्या विवक्षित गुण धर्माचा बोध होतो, असा त्यांत सूक्ष्म फरक आहे. जसें:-'मनुष्य' ( सा. ना. ); ' देवदत्त ' ( वि. ना. ); ' मनुष्यत्व ' ( भा. ना. )

१६७. प्रसंगोपात् हा भेद बाजूस ठेवून विशेषनामें व भाववाचक नामें यांचा सामान्य नामांसारखा उपयोग करितात. जसें:-' तो शुद्ध म्हसोबा आहे. ' ' आपण माठे बृहस्पतिच कीं नाहीं '! ' यांत तुम्हीं काय थोरपणा केलांत ? '

१६८ एखाद्या पदार्थाचें चिन्ह देखील प्रसंगीं नाम होऊं शकतें. जसें:- ध' चा ' मा ' कोणी केला हा प्रश्न अजून वादग्रस्त आहे !' ' अहो भाजी ! ( भाजीवाली माळीण ) इकडे या. '

१६९ ' ज्या प्रातिपादिकांना स्वतःचा अर्थ नसतो, व जीं नामांबद्दल योजतात आणि ज्यांना त्या नामांचा तेवढ्यापुरता अर्थ आलेला असतो त्यांस सर्वनामें असें म्हणतात. ' ( रा. भि. जोशी ). सर्व नामांचे ( १ ) पुरुषवाचक ( २ ) दर्शक ( ३ ) संबंधी आणि ( ४ ) प्रश्नार्थक असे चार भेद आहेत.

१६९ मराठींत पुरुषवाचक सर्वनामें 'मी' आणि 'तूं' हीं दोनच आहेत, व त्यांचीं अनेक वचनें अनुक्रमें 'आम्ही' व 'तुम्ही' अशीं होतात. या सर्वनामांचा विशेष हा कीं त्यांना लिंगविकार नाहीं, अर्थात् त्यांचीं तीन्ही लिंगीं रूपें सारखींच होतात.

१७० पुरुषवाचक सर्वनामांचा दर्जा एकाद्या स्वतंत्र नामाप्रमाणें असतो. म्हणून तीं नामाला विशेषणादाखल लागत नाहींत. क्वचित् त्यांच्यापुढें जर नामाचा उपयोग केलेला असला तर तीं आपले प्रत्यय स्वतंत्र घेतात व पुढचें नाम त्यांचें विशेषण मानावें लागतें. जसें:- 'मला गरिबाला काय, तुम्ही द्याल तें चालेल.' 'तुम्हीं पोरांनीं अलीकडे नाळ सोडला.'

१७१ पुरुषवाचक सर्वनामांच्या अनेकवचनांत स्वतः पुरुष आणि इतर यांचा समावेश होतो. जसें:—'आम्ही' म्हणजे बोलणारा स्वतः व इतर मंडळी. 'तुम्ही' म्हणजे तूं व इतर मंडळी (बोलणारा खेरीज). ज्या वेळीं द्वितीय पुरुषाच्या अनेकवचनांत बोलणारा स्वतःस सामिल करूं इच्छितो तेव्हां तो अनेकवचनीं 'आपण' असा प्रयोग करून क्रियापद प्रथम पुरुषीं अनेकवचनीं घालतो. जसें:— 'आपण आज नाटकाला जाऊं' (मी व तुम्ही नाटकाला जाऊं), 'आपण आज नाटकाला चला' (तुम्ही नाटकाला चला.)'

१७२ बोलणारा हा मोठा मनुष्य, ग्रंथकार, वर्तमानपत्रकार वगैरे असल्यास किंवा सलगीनें, विनोदानें वगैरे बोलत असल्यास, प्रथम पुरुषाच्या अनेक वचनाचा उपयोग करतात. जसें:—'आम्हीं कालच्या अंकांत हेंच म्हटलें होतें.' 'आम्ही नाहीं येत जा.'

१७३ त्याचप्रमाणें द्वितीय पुरुषालाही बहुमान देण्याकरितां अनेकवचन घालतात. जसें:—'तुम्ही (तूं,) परम चांगले बहु समर्थ दाते' (मोरोपंत).

१७४ केव्हां केव्हां 'खुद्द, अस्मादिक' वगैरे शब्द घालून पुरुषवाचक सर्वनामांचा बोध होतो. जसें:—'आज अस्मादिक (मी) नाटकाला जाणार आहेत.' 'खुद्दांची स्वारी (तूं) आलेली दिसते.' अशा वेळीं क्रियापद तृतीय पुरुषीं नामाच्या पुरुषानुसार असतें.

१७५ पुरुषवाचक सर्वनामांना बहुमानानें बोलविण्याकरितां केव्हां केव्हां 'आपण' या नामाचा उपयोग करितात. जसें:—'आपण आपल्या पंक्तीचा लाभ

आम्हांस दिला पाहिजे.' या नामाचा प्रथम व द्वितीय पुरुषी अर्थ होतो, पण मध्य हिंदुस्थानांतील मराठींत 'आपण'चा उपयोग तृतीय पुरुषीं देखील करितात. जसें:– 'आपण उत्तर पाठविण्याची कृपा करतील.'

१७६ 'आपण' शब्द 'स्वतः' या अर्थानेंही घालतात. जसें:—'तो आपणच येईल, तूं नको त्याला बोलावूं.'

१७७. एकादें नाम किंवा सर्वनाम एकदां येऊन लगेच त्याची षष्ठी येणार असल्यास त्याची षष्ठी न घालतां 'आपण' शब्दाची षष्ठी घालतात. जसें:—'मीं आपला धडा उत्तम केला.' 'मोर आपला पिसारा उभारतो.'

१७८ 'आपला' हें षष्ठ्यन्त विशेषण केव्हां केव्हां निरर्थक आलेलें असतें. जसें:— 'मी आपला जातों कसा.'

१७९ 'स्वारी, राजश्री, ब्याद, धिंड-का, वगैरे कांही नामें सर्वनामांबद्दल घालतात. जसें:-- 'आपली धिंड आतां जाऊं दे' 'ही ब्याद (हा) कां आली ?' नवरा, सासू, सासरा वगैरे मंडळींना बहुमानार्थी बोलविण्याकरितां महाराष्ट्रांतील स्त्रिया 'इकडे' 'तिकडे' 'स्वारी,' 'स्वतः', 'स्वामी' वगैरे शब्दांचा उपयोग करितात. जसें:— 'इकडे (नवरा किंवा सासू इ०) चलणार ना ?'

१८० मराठींत दर्शकसर्वनामें दोन आहेत. पैकीं 'तो' यावरून दूरच्या, व 'हा' यावरून जवळच्या पदार्थाचा बोध होतो. हीं सर्वनामें नामांस विशेषणभूत होऊन किंवा स्वतंत्रही येतात. जसें:-- 'तो', 'हा आला,' इ०.

१८१ 'तो' व 'हा' हीं दोन्ही सर्वनामें एकाच विशेष्याला लावून 'पूर्वीं सांगितलेला' असा अर्थ आणतात. जसें:– 'तो हा (पूर्वोक्त गुणविशिष्ट) न करी तें काई ॥ (तुकाराम).

१८२ जुन्या गोष्टींची आठवण काढतांना 'तो' हें सर्वनाम अनेक विशेष्यांना लावतात. जसें:– 'ती शाळा, ते पंतोजी, तीं चिंचांचीं झाडें–लहानपणाची मौज कांहीं वेगळी होती.'

१८३. तुलना करितांना दर्शक सर्वनामांचा उपयोग करितात. जसें:—'हा आपला व तो परका असा भेद साधूंपाशीं नसतो.'

१८४. पण केव्हां केव्हां हीं सर्वनामें पुरुषवाचक सर्वनामांप्रमाणें नामाचा दर्जा घेऊन वाक्यांत येतात. अशा वेळीं त्यांच्यापुढें नाम असलें तर तें नाम ह्या सर्वनामांना विशेषणभूत होतें, सर्वनामांना स्वतंत्र विभक्ति प्रत्यय लागतात, व अर्थदृष्ट्याही त्यांना प्राधान्य येतें. जसें:—'त्याला भामट्याला काय, सारें आपलेंच' व 'त्या भामट्याला काय, सारें आपलेंच.' ह्या दोन्ही वाक्यांत अर्थाचा फरक आहे. पहिल्या वाक्यावरून नामाचा (भामट्याच्या वर्गाचा) बोध होतो, व भामटा म्हटला कीं तो लोकांचा जिन्नस उपटणारच, तसाच हाही उपटणार असा ध्वनि निघतो. दुसऱ्या वाक्यावरून विशेषणाचा अर्थात् एका विशिष्ट भामट्याच्या चोरपणाचा बोध होतो.

१८५ ज्या वस्तूविषयीं अगर व्यक्तीविषयीं संबंध दाखवून पुढें बोलावयाचें आहे, तिचा संबंध दाखविणारें जें सर्वनाम त्यास संबंधी सर्वनाम म्हणतात. मराठींत 'जो' हें एकच संबंधी सर्वनाम आहे, व तें दर्शकसर्वनामाप्रमाणें नामास विशेषणभूत असतें. हें सर्वनाम वाक्यांत आलें म्हणजे त्याच्यापुढें त्याच्या बरोबरीचें दर्शक सर्वनाम येतें. जसें:-- 'जो ज्येष्ठ राम तो गौर' (मोरोपंत) 'ज्याचें जया ध्यान। तेंचि होय त्याचें मन' (तुकाराम).

१८६ मराठींत 'कोण' व 'काय' हीं दोन प्रश्नार्थक सर्वनामें आहेत. पकीं 'कोण' पासून व्यक्तीगत नामाचा व उच्च प्राणिवाचक नामाचा बोध होतो. 'काय' हें सर्वनाम निर्जीव वस्तु व हलक्या प्रतीचे प्राणी यांस लावतात. क्वचित् तिरस्कार दाखविण्याकरितां उच्च प्राण्याला उद्देशूनही 'काय' चा उपयोग करतात. जसें:— 'तो कोण मनुष्य ?' 'तें काय आहे ?' 'हें रे काय ?' 'काय मूर्ख मनुष्य आहेस रे ?'

१८७ 'कोण' व 'काय' यांचा केव्हां केव्हां संबंधी सर्वनामासारखा उपयोग करितात. जसें:— 'कोण करील तो निस्तरील.' 'काय सांपडेल तें उचल.'

१८८ 'कोण' व 'काय' हीं सर्वनामें विशेषणरूप असूनही त्यांना लिंगविकार होत नाहींत. 'काय' ला तर विभक्तिप्रत्यय देखील लागत नाहीं. 'कोण' चा अज्ञात व्यक्तीबद्दल उपयोग करितांना त्याचें नपुंसकलिंग ठेवतात. जसें:— 'कोण तें ?' 'इकडून आतां कोण गेलें ?'

१८९ नियमित पदार्थांतून किंवा व्यक्तींतून एका विषयीं बोलावयाचें असल्यास ' कोणता ' किंवा ' कोणचा ' या शब्दांचा उपयोग करितात. जसें:— ' तुला कोणतें पुस्तक पाहिजे ? '

१९० तुलनात्मक निर्देश करितांना ' काय ' चा उपयोग ' हा झाला तरी ' 'तो झाला तरी' अशा अर्थानें करितात. जसें:- 'रामा काय, आणि गोविंदा काय, दोघे सारखेच.'

---

## १२ पांठांवली.

**तिकडल्या मित्रमंडळींनीं तिकडली थट्टा कांहीं कमी केली असें नाहीं.** ( पण लक्ष्यां० )

**ऐका हीं स्वारीचीं मुक्ताफळें !** ( फाल्गुनराव )

**पण यांचा कोठें भरंवसा बसतो आहे ? मग मला असें वाटलें कीं या राजश्रीची प्रत्यक्षच खात्री करावी.** ( विकार विल० )

**आजोबांचें व त्यांचें विळयाभोंपळयाइतकें उजूं ! प्रत्यक्ष बाप पण आपलें एवढें तेढें !** ( पण ल० )

**हं, आतां शेलारीवर वळली वाटतें संक्रांत !** ( शारदा )

**यजमान, आपण कांहीं वृद्ध नाहींत. तेव्हां यांचा निषेध आपल्याला लागूं पडतच नाहीं.** ( किचा )

**आहा, काय नेसली आहेस पण ! ते वेणीचे केस काय विसकटले आहेत !** ( किचा )

**अहाहा ! बृहस्पतीच तुम्ही ! ! सांगा सांगा पाहूं काय इंगित तें!** ( सौभद्र )

**गेल्या तीस शतकांत आम्हीं एवढें मात्र केलें कीं आठ हात लाकूड व नऊ हात ढलपी अशा मासल्याचीं अकटोविकट पुराणें रचून ठेविलीं !** ( निबंधमाला )

---

१ सरळ. २ वांकडें.

या जगांत अखेर सर्वांनाच साधतां येत नसतें. राजकारण काय, व्यवहार काय, गंजीफांच्या डावासारखा आहे. ( तोत० बंड )

ते आमचे वेद, त्या आमच्या श्रुति[3], त्या आमच्या स्मृति[4], तीं आमचीं उपनिषदें[5], तीं ब्राह्मणें[6]- ( प्रेमसंन्यास )

---

अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे[7] । आतां कां रोकडे दावूं नये ॥
थोर भाग्य आम्ही समर्थाचे कांसे । म्हणवितों दास काय थोडें ॥
तुका म्हणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ १ ॥
( तुकाराम )

स्तवित तुजला आलों माई ! जसें सुचलें तसें ।
शपथ करितों त्वत्पादांची तुझेंचि मला पिसें ॥
अजुनि कठिनें चित्तें मातें न दाविशि पाय जी ।
लव-कुश तुझीं बाळें, आम्ही अमातृक[8] काय जी ? ॥ १ ॥
( निर्माल्यसंग्रह )

कुंती कर्णासि म्हणे, कर्णा कौंतेय तूं न राधेय ।
'राधे' यथेष्ट म्हण, परि कर्णा कर्णास फार बाधे 'ये'[9] ॥ १ ॥
( मोरोपंत )

पार्थ म्हणे वैराटे[10] ! रथ कुरुकटकासमीप राहूं दे ॥
गोधन हरावयास्तव आले भट कोण कोण पाहूं दे ॥ २ ॥ ( कित्ता )
तो गुरु, तो गुरुनंदनें[11], तो कृप, तो कर्ण, तो पितामह रे ॥
यांहीं धेनु वळाव्या शिव शिव ! गोपाळ ! रामकृष्ण ! हरे ! ॥ ३ ॥
( कित्ता )

---

३ वेद. ४ धर्मशास्त्र. ५ वेदान्त ग्रंथ. ६ वेदांतील एक भाग. ७ पराक्रम. ८ आई नसलेला. ९ तूं 'राधे' अशा हांका हव्या तितक्या मार, पण त्या शब्दाला जोडून जो 'य' लावतोस त्याची मला फार बाधा होते. कारण त्यावरून तूं राधेचा मुलगा असा अर्थ होतो, आणि तूं खरोखरी तसा नाहींस; असा कुंतीचा आशय. १० विराटपुत्रा उत्तरा ! ११ द्रोणपुत्र ( अश्वत्थामा ).

होतील नंदन-विलास जयास तो हा ।
आहे धनंजयहि धर्महि जाणतो हा ॥
रत्नाकरीं[12] तुज विराजविता विहारी ।
हा पाहिजे तर वरीं नळरूपधारी ॥ १ ॥ ( रघु० पं. )

मग मशकु हा गजु । कां श्वपचु[13] हा द्विजु ।
पैल इतरु हा आत्मजु । हें उरेल कें[14] ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

सांधे कुमुददळांचेनि[15] ताटें । जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु आहे ॥ २ ॥ ( कित्ता )

हें असो, वयसेचिये[16] सेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी ।
मग ते मोहाची तुंगुटी[17] । नाचों लागे ॥ ३ ॥ ( कित्ता )

वेद तंवचि वानूनि चांग । जवं न दीसे तुझें आंग ।
मग आम्हां तेया मूग । एके[18] पांती ॥ ४ ॥ ( कित्ता )



१२ समुद्रात. १३ अंत्यज, १४ कोठें. १५ कमलपत्रांच्या ताटांत. १६ वयाच्या उत्तर कालांत. १७ सत्व,रज, तम असें त्रिविध रूप. १८ वेद तुमची स्तुति करितो हें कुठपर्यंत? जोंपर्यंत तुमच्या रूपाची त्याला कल्पना झाली नाहीं तोंपर्यंत. ती झाल्यावर त्याचें वक्तृत्व बंद पडतें, व मग वेद आणि आम्ही एकाच माळेचे मणि ठरतों !

# तेरावा पाठ.

## वाक्यांचे घटक.

### विशेषणें.

१९१ 'नामानें दाखविलेल्या पदार्थाचा कांहीं विशेष गुण दाखविणारा शब्द तो विशेषण होय.' मराठींत विशेषणाची योग्यता नामापेक्षां गौण मानलेली असल्यामुळें, त्याचा स्वतंत्र उपयोग बहुधा होत नाहीं. क्वचित् त्याचा स्वतंत्र उपयोग केला असल्यास तो नामादाखल केला आहे असें समजावें. जसें:–'शहाण्यास शब्दांचा मार.'

१९२ मराठींत विशेषणांच्या पुढील विशेष्यांना विभक्तिप्रत्यय लागले असले तरी विशेषणांस ते लागत नाहींत. 'आ'कारान्त विशेषणांना लिंगवचनें लागतात, इतरांस लागत नाहींत. विशेष्यास विभक्तिप्रत्यय लागले असले तर 'आ'कारान्त विशेषणांचें सामान्यरूप होतें. इतरांचें तेंही होत नाहीं. जसें:–'चांगला मुलगा,' 'चांगली मुलगी,' 'चांगलें मूल,' 'चांगल्या मुलग्यास-मुलगीस-मुलांस,' 'वाईट मुलगा-मुलगी-मूल,' 'वाईट मुलास-मुलीस.'

१९३ विशेषणाचा विशेष्याशीं निकट संबंध असल्यामुळें तें नेहमीं त्याचे अगोदर येतें. परन्तु 'अस' धातूचा उपयोग केलेल्या वाक्यांत विधेयपूरक होणारें विशेषण विशेष्यानंतर येतें. जसें:–'शाबास! हुषार आहेस' (शारदा)

(क) अशा वाक्यांत एकाच विशेष्यास अनेक विशेषणें असल्यास विधेयपूरक विशेषण तेवढेंच पुढें येतें. सगळींच विधेयपूरक असल्यास सगळींच पुढें येतात. जसें:–'विद्वान् मनुष्य पूज्य असतो.' 'तूं मलिन, कुटिल, नीरस (आहेस), (मोरोपंत). कलम ६ मधील इतर क्रियापदांसंबंधीं देखील हाच नियम समजावा.

१९४ चा-प्रत्ययान्त आणि ला-प्रत्ययान्त विशेषणें यांचें सामान्यरूप विकल्पानें 'आ'कारान्त व 'ए'कारान्त होतें. जसें:— 'महारीण गेली वरले(ल्या) आळी,' ( एकनाथ ).

१९५ संबंधी विशेषणाचें विशेष्य क्वचित् गुप्त असतें, तेव्हां त्याचा समावेश त्या विशेषणांतच झाला आहे असें समजून त्याचें नपुंसकलिंगी एकवचनीं रूप ठेवतात. जसें:— 'माझें असें आहे.' 'तुमचें कसें चाललें आहे ?'

१९६ एका संबंधी विशेषणापुढें आलेलें विशेष्य वाक्यांत दुसऱ्या संबंधी विशेषणापुढें त्याच अर्थानें येणार असल्यास त्याची विभक्ति दाखविणारा प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय संबंधी विशेषणाला लावून, विशेष्य गुप्त ठेवतात. जसें:— 'गोविंदाचा तोंडवळा रामाहून निराळा आहे.'

१९७ धातुसाधित संबंधी विशेषणांचा देखिल क्वचित् नामांप्रमाणें उपयोग होऊन तीं कर्त्याच्या, कर्माच्या किंवा इतर कारकांच्या विभक्ति घेतात. जसें:— मला पुष्कळ वेळ बसावयाचें आहे.' ( कर्ता ). 'तो वाचायचें ऐकत नाहीं.' (कर्म ). 'पाठ म्हणायच्याला इतका वेळ कशाला ?' ( संप्रदान ).

१९८ अव्ययांना 'चा, ला, ईल' प्रत्यय लागून होणारीं विशेषणें स्थलवाचक, किंवा कालवाचक असतात. जसें:— 'कालचा ज्ञानप्रकाश', 'तेथला बाजारभाव', 'घराबाहेरील मोकळी जागा.'

१९९ 'इत्यादि, वगैरे, संबंधीं, विषयीं ( विशीं ) वगैरे अव्ययांना देखील 'चा', प्रत्यय लागून संबंधी विशेषणें होतात. जसें:— 'वाघ, सिंह, वगैरेंचें वर्णन.' 'घराबद्दलचा दावा.'

२०० सर्वनामांना प्रत्यय लागून झालेलीं विशेषणें सर्वनामांचें कार्य करितात. हीं विशेषणें 'असा, जसा, तसा, कसा, केवढा, तेवढा, एवढा, जेवढा, कोणता, कोणचा ( कंचा ), अमका, तमका, भलता, फलाणा, कांहीं' वगैरे आहेत. त्यांतून कांहींचे उपयोग पुढें सांगितले आहेत.

२०१ 'असा ( ऐसा ), असला, असलाला, तसा, ( तैसा ), तसला' यां वरून प्रकाराचा बोध होतो. जसें:— 'असा मनुष्य.' 'तसलें पुस्तक.' 'असलाला आंबा.'

२०२ ' इतका, तितका, एवढा, ( एसणा, एतुला ),तेवढा ( तेसणा, तेतुला ), इतकाला, एवढाला, तेवढाला, तितकाला ' यांवरून संख्या किंवा प्रमाण दाखविलें जातें. जसें:—' इतका भात उरला. ' ' तेवढाले लाडू वळूं नको.' तितकी शाई कशाला ? '

२०३ ' असा-तसा ' वगैरेंच्या जोडप्रयोगावरून मोठेपणाचा किंवा तुच्छतेचा बोध होतो. जसें:— ' तो असा-तसा नव्हे. ' ' गातो आपला असातसाच. '

२०४ ' जसा ( जैसा ), जसला, जसलाला, जितका ( जेउता ), जितकाला, जेवढा, जेवढाला ' यांवरून संबंधी सर्वनामाचें कार्य होतें. जसें:— ' जेवढा व्याप तेवढा संताप. ' ' जसा राजा तशी प्रजा. '

२०५ ' कोणता, कसा, ( कैसा-चा ), किती, कितका, केवढा, कितीक ' यांवरून प्रश्नार्थक विशेषणांचें कार्य होतें. जसें:—' कोणता मुलगा? ' ' किती पेरू ? ' ' केवढा थाट ' !

( क ) ' किती, कसा, कसला, केवढा ' यावरून केव्हां केव्हां आदरादि भाव दाखविले जातात. जसें:-'केवढा माणूस ?' ' किती विनय ?'

२०६ 'कसला व कसचा' यांवरून कधीं कधीं अशक्यता व तुच्छता दाखविली जाते. जसें:-' तो कसचा जातो ?' क्वचित् अशा अर्थी 'काय' चा उपयोग करितात. 'तो काय मला मारितो ?'

२०७ 'कोण, कोणी, कोणसा, अमुक, फलाणा, अमका, कित्येक, अवघा, आघवा, सर्व, सगळा, कांहीं, थोडा, कैक, कितीक, कित्येक, भलता, एक, हरएक' हीं सामान्य विशेषणांचें काम करितात. जसें:-' कोणी एक मनुष्य, ' 'कोणसा मुलगा दिसला खरा,' 'फलाणा म्हणतो म्हणजे काय ?'

२०८ 'उभय, उभयतां, परस्पर, अन्योन्य, एकमेक, येरयेरा ' हीं परस्परान्वयी विशेषणांचें कार्य करितात. जसें:-'उभयतां बंधु,' 'एकमेकांशीं बोलूं नका'.

२०९ 'एक एक, प्रत्येक, हरएक' यांनीं विभाग दाखविला जातो. जसें:— ' एक एक चला. ' ' हरएक मनुष्य. '

२१० 'स्वतः' हें व्यक्तिदर्शक विशेषण म्हणून उपयोगांत येतें. जसें:—' मी स्वतः येतों. ' क्वचित् स्त्रिया नवऱ्याला उद्देशून त्याचा उपयोग करितात. जसें:- ' स्वतः येणें झालें. '

२११ 'काही,' 'कोणी,' 'कित्येक' 'एक,' 'एक–दुसरें' वगैरे विशेषणें समुदायवाचक आहेत. जसें:—'कांहीं असें म्हणतात, कित्येक तसें म्हणतात.'

२१२ एकाच तऱ्हेचीं दोन विशेषणें किंवा क्रियाविशेषणें मागें पुढें आलीं म्हणजे दोन कल्पनांचा विरोध दाखवितात. जसें–' तूं कुणीकडे, मी कुणीकडे !'

२१३ संख्यावाचक विशेषणांचा नामांप्रमाणें व विशेषणांप्रमाणें उपयोग होतो. या विशेषणांसंबंधीं पुढील गोष्टी ध्यानांत धरण्याजोग्या आहेत.

(क) दोन संख्या जोडून तयार झालेल्या विशेषणांवरून सामान्यतः त्या दोन संख्यांच्या दरम्यानच्या किंवा जवळजवळच्या संख्येचा बोध होतो. जसें:– 'पांचपन्नास लोक,' 'दहावीस गाई.'

(ख) क्वचित् एकाच संख्यावाचकाचाही असा उपयोग करितात. जसें:— 'दहा मुलींत मुलगी.'

(ग) 'शेंकडों, हजारों, लाखों' इत्यादि विशेषणांनीं मोठ्या समुदायाचा बोध होतो. जसें:—'तैमुरलंगानें शेंकडों गांवें उध्वस्त केलीं.'

(घ) संख्यावाचकाला 'एक' हा शब्द जोडून अदमासाचा बोध होतो. जसें:– 'शंभर एक घरें जळलीं.'

२१४ संस्कृतप्रमाणें मराठींत विशेषणांचीं तारतम्यदर्शक निराळीं रूपें होत नाहींत. कांहीं संस्कृत रूपें मराठींत आयतीच घेतलेलीं आहेत. जसें:—'श्रेष्ठ, वरिष्ठ, कनिष्ठ, ज्येष्ठ,' इ०. मराठींत तारतम्यभाव दाखवावयाचा असल्यास विशेषणाच्या मागें. 'अधिक, पेक्षां, कमी, सर्वांत, सर्वांहून,' वगैरे शब्द अर्थानुरोधानें घालतात. जसें:—'तो अधिक उंच आहे.' 'हा सर्वांत हुषार आहे.'

२१५ 'वडील' व 'धाकटा' या शब्दांनीं वयाचें तारतम्य दाखविलें जातें. जसें:—'वडील भाऊ,' 'धाकटी बहीण.'

२१६ कांहीं विरोधी अर्थाच्या विशेषणांवरून तारतम्य दाखविलें जातें. जसें: 'गडद–फिका,' 'शिळा–ताजा,' 'कडक–सौम्य,' इ०.

२१७ जुन्या कवितेंतून कित्येक विशेषणांच्या मागें व क्वचित् नामाच्याही मागें 'अ' हें नकारवाचक अव्यय लावून मूळचाच अर्थ कायम राखलेला आढळतो. जसें:–'अचपळ मन माझें नावरे आवरीतां' (रामदास).

२१८ 'अ' किंवा 'न' हें अव्यय मागें लावून विशेषणादि सर्व शब्दांचे अर्थ सहा प्रकारांनीं बदलतात. हे अर्थ येणेंप्रमाणें:-( १ ) तत्सादृश्य ( सारखे-पणा ). जसें:-'अब्राह्मण म्हणजे ब्राह्मणासारखाच पण प्रत्यक्ष ब्राह्मण नव्हे. ( २ ) अभाव. जसें:-'अब्राह्मण' म्हणजे ब्राह्मणांचा अभाव जेथें आहे असा ( गांव ). ( ३ ) तदन्यत्व. जसें:-'अब्राह्मण' म्हणजे ब्राह्मणाहून वेगळा कोणीही. ( ४ ) तदल्पता. जसें:-'अब्राह्मण' म्हणजे क्वचित् एखादा ब्राह्मण जेथें आहे असा ( गांव वगैरे ). ( ५ ) अप्राशस्त्य. जसें:-'अब्राह्मण' म्हणजे अप्रशस्त किंवा तुच्छ ब्राह्मण. ( ६ ) विरोध. जसें:-'अब्राह्मण' म्हणजे ब्राह्मणाच्या अगदीं उलट, अंत्यज वगैरे.

( क ) संस्कृत व्याकरणांत सांगितलेले हे नञाचे साही उपयोग मराठींत फारसे दिसत नाहींत. शेवटचा 'विरोधा' चा उपयोग मात्र पुष्कळ प्रचारांत आहे. जसें:-'सित म्हणजे पांढरा, असित म्हणजे काळा.' 'चतुर म्हणजे हुषार, अचतुर म्हणजे मूर्ख.' त्याचप्रमाणें 'नेणणें, नेघणें, नेदणें' इ. क्रियापदांच्या रूपांतही अकरणरूपाचा अर्थ विरोधाचाच आहे.

२१९ कांहीं संस्कृत नामें मराठींत विशेषणें होऊन आलीं आहेत. जसें:-'मूर्ख, प्राज्ञ' इ. तर, कांहीं विशेषणें नामें होऊन त्यांचा विशेषणपणा पार लोपून गेला आहे. जसें:-'वहिन्से-वन्सें ( संस्कृत भगिनीसम ).' त्याचप्रमाणें 'मातुलानीसम = मामिसें.' 'मातृसम = माउशी.' 'अंबसम = आउसी, आइसी; अने० आइसा' इ. विशेषनामांना सम शब्द जोडून झालेल्या सामासिक विशेषणांचीं विशेषनामें झालीं आहेत. जसें:-'नारायणसम = नारायणसा.'

---

## १३ पाठावली.

**मी याविषयीं बोललें कीं, एकेक डोळा एवढाला करायचा; मग मी बाई भिऊन जातें.** ( सौभद्र )

**सर्पाला दुखवून जिवंत सोडीन इतका मी भोळा नाहीं.** ( शारदा )

**कित्येक थेरडे आठ नऊ वर्षांच्या मुलीशीं लग्न लावून प्रपंचास पुन्हां आरंभ करण्याचा आव घालतात.** ( आगरकर )

पाहीन ना आतां कसला मदनाचा पुतळा हिला नवरा मिळतो तो ! ( पण लक्ष्या० )

एखादा कारखाना एकाकडेच असल्यानें जितका सुरळीत चालण्याचा संभव असतो, तितका बारभाई[1] झाल्यानें असत नाहीं. ( केसरी )

जरा हात धूत होतें तर पन्नास हांका झाल्या. वाघ कां पाठीस लागला आहे तुमच्या ? ( प्रेमसंन्यास )

सुभेदार म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ! ( नाट्यकथार्णव )

इंग्रज केवढे, आम्ही केवढे ! चालले आपले त्यांच्याशीं बरोबरी करायला ? करंगळी सुजली म्हणून डोंगराएवढी मोठी होईल काय ? ( केसरी )

एवढा नेपोलियन बादशहा, कीं तो एकटा सैन्यांत असणें आणि अर्ध्या लाख फौजेची कुमक मिळणें बरोबर असे, ती स्वारी स्वतः कशी होती म्हणाल, तर वामनमूर्त[2] ! ( निबंधमाला )

---

वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥
एकाविण[3] एका । कैसें मोल होतें फुका ॥
विषें दाविलें अमृत । कडू गोडें[4], घातें हित ॥
काळीमेनें ज्योती । दिवस कळों आला राती ॥
उंच नीच गारा । हिरा परिस मोहरा ॥
तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ १ ॥ ( तुकाराम )

सकळ गुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥
वरकड कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥

---

१ अनेकांचा कारभार. २ खुजा मनुष्य. ३ एकाशिवाय दुसऱ्याचें मोल फुकट कसें होईल. ४ कडूमुळें गोड कळतें व घातामुळें हिताची किंमत समजते.

षड्गुणैश्वर्यसंपन्न[5] । एक भगवंत जाण ॥
तुका म्हणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥ २ ॥ ( कित्ता )

हरी कर्णिके[6]च्या स्थळीं मध्यभागीं । मुलें भोंवतीं ऱ्हस्वदीर्घे[7] विभागीं ॥
ल्हानांपुढें थोर अंभोजपत्रें[8] । अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें[9] ॥ १ ॥
( वामन )

कोणी एक वनीं विचित्र पुतळा जेवावया बैसला ।
पात्रीं[10] जेवण जेवितां निजबळें पात्रेंचि तो भक्षिला ॥ ( विठ्ठल )

धांवाति अन्योन्यांवारि ते दोघे आठवूनि अपकार ।
जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतीच अपकार[11] ॥ १ ॥ ( मोरोपंत )
पार्थ त्रिदंडि[12]-वेष स्वीकारी हलधरासि[13] वंचार्या[14] ।
युक्तीनें स्वपरविहित[15]-हित करितां कपट-दोष कंचा या ? ॥ २ ॥
( कित्ता )

तर्यीं प्रभुवरा ! तसे सदय, कां असे आज हो ? ।
विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज हो ॥ ( केकावली )
करा श्रवण येवढें, अपटु[16] लोक हासो मला ।
अहो जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला ॥
तयास ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी ।
तिला स्व-शिशु[17]वंचनें अदयता शिवे काय जी ? ॥ ३ ॥ ( कित्ता )

---

तरि तिहीं एतुलीं[18] अवसरीं । काय कीजतसे येरएरीं ।
तें झडकरी कथन करीं । मजप्राति ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

---

५ भाग्यवंताच्या सहागुणांनीं संपन्न. हे सहा गुण ज्ञानेश्वरांनीं 'आइका यश, श्री, औदार्य । ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ' असे सांगितले आहेत. ६ वर्तुळाच्या मध्यबिंदूच्या. ७ लहान मोटीं. ८ कमळाच्या पाकळ्या. ९ संसाररूपी सूर्याला निवारणारी छत्रीच असलेल्या कृष्णानें. १० कमळाच्या फुलांत मध खात बसलेल्या भुंग्यावर हें कोडें आहे. सूर्यास्त झाल्याबरोबर कमळ मिटलें व जेवण करणारा भुंगा नाटांत अडकला असा आशय. ११ ज्यांत 'प' नाहीं असे दंपती म्हणजे दंती ऊर्फ हत्ती. १२ कायिक, वाचिक व मानासिक दंड पतकरणारा संन्यासी. १३ बलरामास. १४ फसवायाकरितां. १५ आपल्या व दुसऱ्याच्या उपयोगास येणारें. १६ अडाणी. १७ आपल्या मुलांच्या फसवणुकीनें. १८ एवढ्या वेळांत.

आदिचि समुद्र काई । तेथ दुवाडपणं[19] कवणा नाहीं ।
मग वडवानल तैसेयाही । विरजों[20] जसा ॥ २ ॥ ( कित्ता )

जेयां उपकार होते केले । जे आपदिं होते रक्षिले ।
हें असो वडिल धाकुले । आदिकरुनी ॥ ३ ॥ ( कित्ता )

जैसें भ्रमर तरि भेदी कोडें[21] । भलतसें काष्ठ कोरडें ।
परि कलिकेमाजी सांपडे । कोंवलिये ॥ ३ ॥ ( कित्ता )

अक्षत भरली भाणीं[22] । दुजा ब्राह्मण मेहुणा ।
आला होता पाहुणा । स्त्रियेसि मूळें[23] ॥ ४ ॥

मी जऱ्हीं सलगीचा चांगु । तऱ्हीं काइ आयिसांहूनि[24] अंतरंगु ।
परि तियेंही हा प्रसंगु । पूसों भियालीं ॥ ५ ॥ ( कित्ता )

---

१९ दुस्तरत्व. २० साह्यकर्ता. २१ लीलेनें. २२ बहिणीला ( सवाष्ण सांगितली ). २३ माहेरीं बोलावावयास आलेला मनुष्य. कंजुष मनुष्य बहिणीला सवाष्ण सांगतो, व बायकोला माहेरीं न्यावयास आलेल्या आपल्या मेहुण्याला ब्राह्मण सांगतो असें विनोदी वर्णन केलें आहे. २४ आईबापांहून.

# चवदावा पाठ.

## कृदन्तें.

२१० ज्या शब्दावरून क्रियेचा अपूर्ण बोध होतो, अशा धातुसाधितास 'कृदन्त' असें म्हणतात. संस्कृतप्रमाणें मराठी वाक्यरचनेंतही कृदन्तांचा उपयोग मोठा आहे. संक्षेप, विस्तार, आणि शोभा या तिन्हीं कामांला कृदन्त येतात. १ धातुसाधित नामें, २ वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणें, ३ वर्तमानकालवाचक अव्ययांचे दोन प्रकार, ४ भूतकालवाचक कर्तरि व कर्मणि विशेषणें, ५ भूतकालवाचक अव्ययें, ६ भविष्यकालवाचक विशेषणें, आणि ७ विध्यर्थक विशेषणें; ही मुख्य कृदन्तें आहेत. त्यांचा क्रमानें विचार करूं.

२२१ धातूला 'णें' प्रत्यय लागून नपुंसकलिंगी नाम होतें, व तें इतर नामांप्रमाणें वचन विभक्ति घेतें. हें व इतर धातुसाधितें सकर्मक क्रियापदांपासून झालीं असल्यास कर्मासह उपयोगांत येतात. ह्या धातुसाधित नामावरून क्रियेच्या अर्थाचा बोध होतो. जसें:--'माझें बोलणें तुला आतां कडू लागेल.'

(क) 'णें' कारान्त नामावरून केव्हां केव्हां 'विनंति, सूचना, निरूपण' वगैरेंचा बोध होतो. जसें:-'शरीर भेदावरी न जाणें' (रामदासस्वामींचें पत्र). 'आपण श्रीच्या आज्ञेप्रमाणें देवाचा कार्यभाग चालूं देणें,' (कल्याणस्वामींचें पत्र). 'सकाळीं लवकर उठणें, मग स्नानसंध्या करणें, मग पुराण सांगणें, असा त्यांचा नित्यक्रम असे.'

(ख) 'णें' कारान्त नाम 'आहे' या क्रियापदाचें उद्देश्य असतांना 'जरूरीचा' किंवा 'कर्तव्याचा' बोध होतो. जसें:—'तुला काय करणें असेल तें कर.'

(ग) पुष्कळ वेळां हीं नामें सामान्यनामांच्या अर्थानें उपयोगांत येतात. जसें:—'असें बोलणें (भाषण) ठीक नाही.'

(घ) केव्हां केव्हां 'णें' हा प्रत्यय गाळून नुसत्या धातुरूपाचाच नामासारखा उपयोग केलेला आढळतो. जसें:—'ज्याला कर नाहीं, त्याला डर नाहीं.' 'आतां माझ्याच्यानें इतक्या लांब ये जा होत नाहीं.'

(ङ) केव्हां केव्हां 'णें' कारान्तावरून क्रियेच्या कर्तृवाचक किंवा कर्मवाचक नामाचा बोध होतो. जसें:—'नागवी धांवणें' (मदतीला धांवून येणारा मनुष्यच लुबाडतो) तुकाराम.

**२१२** धातूस 'त' प्रत्यय लागून वर्तमान-काल-वाचक धातुसाधित होतें. धातु सकर्मक असल्यास 'ईत' प्रत्यय लागतो. कांहीं धातूंना हा प्रत्यय विकल्पानें लागतो. या धातुसाधिताचा पुढील अर्थानीं उपयोग होतो. (१) कृति चालू ठेवणें. जसें:—'तूं देवास भजत जा.' (२) नकारात्मक वाक्यांत इच्छा किंवा प्रवृत्ति, जसें:—'तो हल्लीं माझ्याशीं सरळ वागत नाहीं.'

(क) ह्या धातुसाधितांना लिंगवचनादि लागत नाहीत, पण क्रियेचें कर्तृत्व-दर्शक विशेषण म्हणून किंवा नामाच्या अर्थानें जेव्हां त्याचा उपयोग करतात तेव्हां त्यांना ते विकार होतात. जसें:—'रांगतें मूल,' 'जागती ज्योत' इ.

(ख) 'अस' धातूचें वर्तमानकाल वाचक 'सांता' किंवा 'साता' असें होतें व तें बहुधा दुसऱ्या एखाद्या कृदन्ताशीं जोडून उपयोगांत येतें. जसें:—'कृत-कृत्य होत्साता नगरास आला.' 'तूं योगयुक्त जाला सांता' (ज्ञानेश्वरी).

**२२३** धातूस 'तां' आणि 'तांना' प्रत्यय लागून होणाऱ्या वर्तमानकाल वाचक अव्ययांचा पुढीलप्रमाणें उपयोग होतो. (१) धातुसाधितानें दर्शविलेली क्रिया चालू होती अशा बाबत वेळेची हमी देणें. जसें:—'तो चालत असतां ठेंचकाळला'. (२) धातुसाधिताची द्विरुक्ति केल्यास, धातुसाधितानें दर्शविलेली क्रिया व मुख्य क्रियापदानें दर्शविलेली क्रिया यांच्यामधील अंतराचा कालदृष्ट्या अभेद दाखविणें. जसें:—'चालतां चालतां दिसेनासा झाला.' (३) क्रियेच्या अप्रत्यक्ष कर्मा-दाखल येणें. जसें:—'मी त्यास घोड्यास मारतां किंवा मारतांना पाहतों.' (४) शक्यार्थी वाक्यांत नामाप्रमाणें कर्तृस्थानीं येणें. जसें:—'मला पोहतां येतें.' (५) संकेतार्थाचें काम करणें. जसें:—'तुम्ही गेलां असतां काम होईल.' (६) धातुसाधिताच्या व मुख्य क्रियापदाच्या कल्पनेंत विरोध दाखविणें. जसें:—'मी

शिकवीत असतां तुला इंग्रजी येत नाहीं.' अशा अर्थी धातुसाधित बहुधा 'ही' हें अव्यय जोडून घेतें. जसें:—'ग्रहणांत सूर्य असतांनाही अंधार पडतो.'

२२४ धातूला 'ऊं' प्रत्यय लागून होणाऱ्या निमित्तवाचक धातुसाधित अव्ययांचे उपयोग असे होतात. (१) मुख्य क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेचा प्रारंभ सुचविणें. जसें:-'तो बोलूं लागला.' (२) नामाप्रमाणें कर्त्याचें किंवा कर्माचें काम करणें. जसें:-'मला जाऊं दे.' 'आई जेऊं घालीना व बाप भीक मागूं देईना.' (३) 'इच्छिणें, पाहणें' इत्यादि क्रियापदांशीं आलें असतां 'इच्छे' चा किंवा 'संभवा' चा बोध करणें. जसें:- 'तो पतंग पडूं पाहतो.' 'मी आतां निरोप घेऊं इच्छितों.' (४) 'येणें व शकणें' इत्यादि क्रियापदांबरोबर शक्यतेचा बोध करणें. जसें:-'तो झाडावर चढूं शकतो.'

२२५ 'अता व इता' प्रत्यय लागून होणारें भूतकालवाचक धातुसाधित विशेषण नामाच्या लिंगवचनानुसार विकार पावतें, व भूतकाळीं क्रियापदाबरोबर तें भूतकाळाचा अर्थ दाखवितें. जसें:-'ती जाती झाली.' 'तो पत्र पाठविता झाला.'

२२६ धातूस 'ल' आणि 'लेल' प्रत्यय लागून होणारें भूतकालवाचक कर्मणि विशेषण होतें. त्याला लिंगादि विकार लागतात, व तीं सकर्मक व अकर्मक धातूंपासूनहि होतात. जसें:-'बसलेला उंट,' 'केलेलें काम,' 'केला प्रकार', 'झाला व्यवहार.'

(क) गौण वाक्याचे शेवटीं भूतकाळचें क्रियापद असतां, सर्व वाक्याचा संक्षेप करून एक वाक्य बनविण्यासाठीं गौणवाक्यांतील क्रियापदाच्या कर्मणि कृदन्ताचा नामासारखा उपयोग करतात. जसें:—'गेल्याचा शोक वृथा न करावा.' 'झाल्या गेल्या गोष्टी आतां विसरून चला.'

(ख) कर्मणि धातुसाधिताचा पुष्कळ वेळां कर्तरि अर्थानें उपयोग करितात. जसें: 'हातांत छत्री घेतलेला मनुष्य.'

(ग) 'जळला', 'मेला' हीं कर्मणि कृदन्तें, स्त्रियांच्या तोंडीं 'दुःख, आश्चर्य' वगैरे मनोविकारांची तीव्रता-दर्शक म्हणून येतात व केव्हां केव्हां निरर्थकही येतात. जसें:—'जळला माझा संसार!' 'मेली कशी ती आठवणच रहात नाहीं.' 'हा मेल्यांनो, रुपायाला एवढाच कां गूळ येतो!'

२२७ धातूला 'ऊन' प्रत्यय लागून होणाऱ्या भूतकालवाचक अव्ययानें 'एक क्रिया झाल्यानंतर' असा अर्थ होतो. अशा रचनेंत गौण वाक्य व प्रधान वाक्य बहुधा करणरूपींच असतें. ह्या अव्ययाचा पुढील अर्थांनीं उपयोग होतो. (१) एका क्रियेची पूर्णता व दुसरीस प्रारंभ. जसें:- 'मी कपडे घालून फिरावयास निघालों.' (२) दोन क्रियांचा साध्यसाधन संबंध किंवा कार्यकारणसंबंध. जसें:—'रडून घर घेऊं पाहतो.' (३) क्रियार्थाला जोर. 'तें काम एकदां करून टाक कसा!' (४) विरोधात्मक परिणाम. जसें:—'तो शाहाणा असून फसला.' (५) दोन क्रियार्थांचें एककालीनत्व. जसें:—'वीज कडकडून पाऊस आला.'

(क) ह्या कृदन्ताला अनुकरणात्मक रूप जोडून मुख्य क्रियार्थाला जोर आणतात. जसें:-'बोलून चालून मूल तें.' 'मी तुला सांगून सवरून पकडलें आहे.'

(ख) 'ऊन' प्रत्ययान्त धातुसाधितानें जी क्रिया दाखविली जाते ती कर्तरि असल्यास कर्ता प्रथमेंत, व कर्मणि किंवा भावे असल्यास कर्ता तृतीयेंत येतो. जसें:—'तो असें बोलून गेला.' 'त्यानें असें सांगून सोडलें.'

(ग) एकाच 'ऊन' प्रत्ययान्त कृदन्ताला अनुकरणात्मक जोडण्याऐवजीं जर त्याची द्विरुक्ति केली असेल, तर कृदन्ताच्या धात्वर्थाला जोर येतो. अशा वेळीं पहिल्या कृदन्त रूपांतला प्रत्यय गाळण्याचा विशेष प्रचार आहे. जसें:— 'तो तुला बोच-बोचून खाईल.'

२२८ धातूला 'णार' प्रत्यय लागून भविष्यकालवाचक विशेषण होतें व त्याला लिंगवचनादि प्रत्यय लागतात. ह्या विशेषणाचे पुढील उपयोग होतात. (१) कर्त्याचा क्रिया करण्याचा उद्देश दाखविणें. जसें:—'मी आज मुंबईस जाणार आहे.' (२) अजमास, तर्क, करणें. जसें:—'आज पाऊस पडणार.' (३) सामान्य विधिविशेषणाचा बोध. जसें:—'गाणारा दमतो, आणि ऐकणार कुंथतो.' 'काय देतील देणार?' (रामदास).

२२९ धातूला 'आव' प्रत्यय लागून विध्यर्थक विशेषण तयार होतें, व त्याला लिंगादि विकार लागतात, तें सकर्मक क्रियापदापासून झालें असल्यास कर्मणि असून कर्माचें विशेषण असतें, व अकर्मक क्रियापदापासून झालें अस-

ल्यास नामासारखें उपयोगांत येतें. जसें:– 'बाजीरावास पुणें सोडावें लागलें.' 'मला काल उपाशीं रहावें लागलें.'

(क) क्वचित् सकर्मकाचाहि उपयोग कर्तरि विशेषणासारखा केलेला आढळतो. जसें:—'काय देतील देणार। द्यावा (देणारा) एक रघुवीर' (रामदास).

(ख) विध्यर्थक विशेषणाला चतुर्थीचे प्रत्यय लागून हेत्वर्थी चतुर्थी होते अशा वेळीं 'आव' मधील 'व' गाळतात, क्वचित् चतुर्थीचा प्रत्यय गाळतात व क्वचित् दोनीही गाळतात. जसें:— 'करावयास, करायास, किंवा कराया.'

२३० विध्यर्थक विशेषणाला षष्ठीचा प्रत्यय लागून होणाऱ्या जोड विशेषणाचे पुढील उपयोग होतात. (१) बिनतोड आवश्यकता. जसें:–'मला आज त्याच्या घरीं जेवावयास जायचें आहे.' (२) सामन्य आवश्यकता. जसें:– 'मला गांवोगांवीं हिंडावयाचें असतें.' (३) संभव. जसें:—'तो एखादे वेळीं मार खावयाचा!'

२३१ ह्या बहुतेक कृदन्तांचे प्रत्यय संस्कृतवरून मराठींत आले आहेत. अर्थात् संक्रमणावस्थेंत त्यांचीं अनेक तऱ्हेचीं रूपें होत असत. जसें:–'होइजत, म्हणिजत, पाविजत,' (कर्मणि वर्त. धातु.). 'हसवित, म्हणवित, इ.' (प्रयो. वर्त.) 'खातलें, तुटलें, तातलें, जालें, उदैलें, म्हणतलें, म्हणियलें, दिलें, दिधलें-दिन्हलें-दिन्नलें, विआलें' इ. (कर्मणि भूत.). 'करूनि, करुनि, करुनु, करौनि, म्हणौनि, नोहुनि, नेंदुनि इ. (अव्ययात्मक कृदन्तें). जिणूं, जिणों, रमों, नेणों, हसों, हसूं, हसुं' इ. (भविष्य). अव्ययात्मक कृदन्तें, 'व्हावयाचें, होयाचें, होयास' इ. (विध्यर्थक विशेषणें).

२३२. मराठींत नुसत्या कृदन्तावरून पूर्ण वाक्य होत नाहीं हें खरें, तरी जुन्या मराठींत नुसतेंच कृदन्त पूर्णार्थवाचक क्रियापदादाखल योजलेलें क्वचित् आढळतें. जसें:–'आम्ही पूर्ण काम होउनि। जरि आत्मस्थिति राहुनि। तऱ्हि प्रजा हे कैसेनि। निस्तरैल' (ज्ञानेश्वरी).

---

## १४ पाठावली.

**अंतःपुरांत असा पांचटपणा करायला लागलें ह्मणजे चतुर्भुज होण्याला उशीर लागत नाहीं. (मूकनायक)**

त्याला दाखवाल तें तो सांगेल किंवा सांगाल तें तो दाखवील. त्याला दाखविण्याची मात्र भीड धरितां कामां नये, ह्मणजे सांगायला तिसरा पाय ! ( विकार विलसित )

आतां तरी याचे डोळे उघडले असले म्हणजे पुष्कळच चांगलें झालें म्हणायचें ! ( उषःकाल )

भास्करभाऊची ती स्थिति पाहून सीतारामाला वाईट वाटलें, पण पंड्याजीची चर्पटपंजरी चाललीच होती. ( जग हें असें आहे )

आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला. या उपरी माझे ठायीं तुम्ही आहां. ( रामदासस्वामींचें पत्र )

त्याचा धारा होईल तो बिलाकुसूर श्रीकडे पावीत जाणे जाणीजे. ( राम० कागदपत्रें )

लुब्री मेली, मी काय बोलतें, काय सवरतें, तें सगळें जाऊन रेवती वहिनीला सांगते. ( सौभद्र )

मरेना कां तो यति, त्याला घेऊन याला काय करायचें आहे कोण जाणे ! ॥ ( कित्ता )

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तां[1] कहीं[2]वाले[3] व बाजे[4] लोक लस्कर सुॉ[5] ईहिदे[6] खमसैन मयां अलफ मौजे[7] सायगांव तों[8] मेढें हा गांव श्रीस्वामी यांजकडे आहे, तर दाणावैरण कडबा वगैरे काडीइतका मौजेमा[9]रास उपसर्ग न देणें तेथील येक तन[10]सैंडीस ढका न लागणे बोभाट आलियां मारले जाल. जाणिजे छ[11]९ जमादि[12]लोवल. ( रामदास सं. काग०, लेखांक ७३९ )

---

वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥
तेवि शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनिया ॥

---

१ त्याचें उत्पन्न येईल तें हयगय न करितां श्रीसमर्थांच्या देवालयाकडे पोंचतें करावें. २ कहून. ३ धान्य सामुग्री वगैरे नेणारे लोक. ४ इतर लोक. ५ सुरूसन ६ सुरूसन ११५१ (शके १६७२). ७ छोटा गांव. ८ तालुके. ९ मौजे मजकुरास, सदरहू गांवास. १० काडीइतक्या जिनसास. ११ चंद्र. १२ मुसलमानी पांचवा महिना.

बोलाचीच कढी बोलाचाच भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ॥
कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोड[13] जेवी ॥
तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ १ ॥
(तुकाराम)

कृपेचें पोसणें[14] तुमचें मी दीन । तुम्ही संतजन मायबाप ॥ (किता)
मागल्याची पुरे । धणी[15], आणिकांसी उरे ॥ (किता)

नीच यातीसी सांगात । परांगनेसीं एकांत ।
मार्गी जाय खात खात । तो एक मूर्ख ॥ १ ॥

पुत्र कलत्र आणि दारी[16] । इतुकाचि मानूनियां थारा ।
विसरोन गेला ईश्वरा । तो एक मूर्ख ॥ १ ॥

आदरेंविण बोलणें । न पुसतां साक्ष देणें ।
निंद्य वस्तु अंगीकारणें । तो एक मूर्ख ॥ ३ ॥ (दासबोध)

यावरी म्हणे वैराग्यशील । किंनरी[17] सांगेल गोष्टी प्रांजल ।
तुम्ही टाकूनि मायाजाळ । व्यर्थ हळहळ न करावी ॥ १ ॥ (महीपती)

शर्व-कंठ-विष-गर्व[18] हराया ॥ शक्त नामचि तुझें रघुराया ॥
सेतु[19] सागर कपी उतराया ॥ नामसेतु भवसिंधु तराया ॥१॥ (वामन)

कलकल कलहंसें फार केली सुटाया ॥
फडफड निज पक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणिबंधीं[20] टोंचिता होय चंचू ॥
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू[21] ? ॥ १ ॥ (रघु० पं.)

बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत[22] रुतला ।
महा-सिंधू-लाटा-तरण करूं येई निजबळा ॥
महासर्पातेंही सुमसम[23] धरूं ये निजाशिरीं ।
परन्तु क्षुद्राचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ १ ॥ (वामन)

---

१३ कागदावर लिहिलेला साखर हा शब्द जसा चाटतांना गोड लागत नाहीं. १४ पोसलेला, पोष्य. १५ तृप्ती. १६ बायको. १७ कानफाटे लोकांचें एक वाद्य. १८ शंकरांच्या गळ्यांत उतरलेल्या हालाहल विषाचा गर्व. १९ दगडांचा सेतु वानरांना समुद्र तरायला उपयोगी पडला पण रामनामाचा सेतु भवसागर तरून जावयास उपयोगी अतएव श्रेष्ठ आहे असा भाव. २० मनगटावर. २१ फन्शी, पठ्ठा, बहादूर. २२ मगराच्या तोंडांत. २३ फुलासारखा.

धड भांग्रत काय जाहलें ? समरीं लोळत हाय कां रितें ? ॥
जंळली परदार[२४]लालसा ! जळलें युद्ध कुलांत[२५]कारि तें ! ॥१॥ (रणविहार)

---

करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें ।
धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें ॥
न जाणे न नेणे अशा पामराला ॥
बुझा[२६]वूं शकेना विधाता तयाला ॥ १ ॥ (वामन)

हा पांडवांसि भस्मचि करिल उपेक्षा करूं नये याची ॥
पदरीं अकीर्ति आश्रितें[२७]-सुहृदनवन पथकरून येयाची ॥१॥ (मोरोपंत)

सीतेवरि जातां तो दे लाज पिसाळल्याहि कुत्यातें ।
मेल्या रांड तुझी हो ! ऐसें शापी हळूंच कुं[२८] त्यातें ॥ २ ॥ (मोरोपंत)

किंवा म्हणासि समर्थो[२९]ऽहं कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं ।
दीनावनाविणें[३०] क्षण दयिता देईल दया कशी वर्तूं ॥ ३ ॥ (किंत्ता)

प्रतिज्ञा लंघूनि वेंल्लरी[३१] । नयनीं लोटिल्या अश्रुलहरी ।
उदित हात वरिच्यावरी । शस्त्र जाऊनि वारिलें ॥ १ ॥
कौशिक[३२]कृपेचा वरदवात । डोलतां विबुध-पारिजात ।
सुकृत-सुमनें परागभरित । राजमुकुटीं वर्षती ॥ २ ॥ (मुक्तेश्वर)

ते दोन्ही शब्द अचाट । मनिलें एकावट ।
तेथ ब्रह्मकटाहो शतकुट । हों[३३] पांत असें ॥ १ ॥

---

२४ परस्त्रीचा अभिलाष. २५ वंशाचा नाश करणारें. २६ अर्धवट माणसाची समजूत ब्रह्मदेवाला सुद्धां घालतां येत नाहीं. २७ आपले आश्रित, इष्ट मित्र यांचें रक्षण न करण्याचा मार्ग जर धरला तर पदरांत अपकीर्ति येण्याचा संभव आहे. २८ पृथ्वी. २९ '(१) एखादी गोष्ट करणें, (२) केलेली मोडणे, किंवा (३) तिला तिसरेंच रूप देणें'; अशा तीन शक्तींचा उपयोग करावयास मी समर्थ आहें. ३० तर तुमची बायको दया ही दीनांचें संरक्षण केल्यावांचून तुम्हांला कशी नांदूं देईल ? ३१ विश्वामित्राच्या हृदयांत उचंबळलेल्या प्रेम-समुद्रानें 'हरिश्चंद्राचें सत्व भंगीन' ही प्रतिज्ञारूपी मर्यादा ओलांडली, व त्याच्या लाटा डोळ्यांतून लोटूं लागल्या. ३२ विश्वामित्रांच्या कृपेचा प्रसाददायक वारा वाहूं लागतांच देव हेच पारिजातक वृक्ष रजोयुक्त पुण्याचीं फुलें हरिश्चंद्राच्या मस्तकावर वर्षूं लागले. ३३ होऊं पाहायला लागला. ब्रह्मांडरूपी कढईचे तुकडे होणारसें दिसूं लागलें.

पृथिवीतल उलंडों पांत । आकाश असे अडँ[३४]दरत ।<br>
तेथ रासौ[३५]भा हौंत । नक्षत्रांचा ॥ २ ॥

मग ज्ञानाच्चिये वेळे । झांकति जाणिवेचे डोळे ।<br>
जैसी तीरीं नांव न ढळे । टेंकली सांती ॥ ( ज्ञानेश्वर

परि धर्मपत्नी कां धांगँ[३६]डी । पोसितां जरि एकि वोढि ।<br>
तरि कां अपखडी । आणावी आंगा ॥ ४ ॥ ( कित्ता )

अधि[३७]कारिया रिगतां गावों । जाला जैसा उत्सावो ।<br>
कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ ५ ॥ ( कित्ता )

पडतां गळां म्हणे कच, भागिनीला वरुनिया न भाउ तरे ॥<br>
करितां अधर्म सद्यः स्व-पि[३८]तृ-सुहृज्जन-मुख-प्रभा उतरे ॥ १ ॥<br>
( मोरोपंत )

कृष्णा[३९] म्हणे अहो जरि मत्प्रिय करणें, वधाचि तरि त्यातें ॥<br>
मारावेंचि [४०]नयज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ २ ॥ (कित्ता)

[४१]कविस. रुचे घालावें विषयसुख करूनि घोर तप डावें ॥<br>
मूढास आवडे बहु जेवुनि सस्त्रीक घोरत पडावें ॥ ३ ॥



३४ घाबरत. ३५ सडा, खिचडी. ३६ लग्नाची बायको आणि वेश्या या दोघींच्या पोषणांत जर सारखीच यातायात आहे तर वेश्येचें पोषण करून अपकीर्ति कां घ्यावी ? ३७ राजाचा अमलदार. ३८ आपली पितरांची आणि इष्ट मित्रांची. ३९ द्रौपदी. ४० लक्ष्मी आणि गृहलक्ष्मी ( बायको) यांचें हरण करणाऱ्याला नीती जाणणारानें मारूनटाकावें. ४१ विषयसुखाला तुच्छ करून घोर तप करणें शाहण्याला आवडतें.

# पंधरावा पाठ.

## क्रियापदें.

२३३ वाक्यांत उद्देश्याबद्दल जें काय सांगितलें असेल तें व्यक्त करणारा शब्द किंवा शब्दसमूह म्हणजे विधेय होय. पुष्कळ वेळ हें कार्य करणारा शब्द एकच असतो व तें तो कालदृष्ट्या पूर्ण करून जातो. अर्थात् 'ज्या शब्दाच्या योगानें पदार्थाचें असणें किंवा करणें याचा काळाच्या संबंधानें पूर्ण बोध होतो त्यास क्रियापद असें म्हणतात,' आणि क्रियापदानें दर्शविलेल्या क्रियेचा वाचक जो मूळ शब्द त्यास 'धातु' म्हणतात. संस्कृतमध्यें कालदृष्ट्या पूर्ण क्रिया दर्शविणाऱ्या शब्दाला 'आख्यात' असें नांव आहे, व स्थूल मानानें आख्यातानें दर्शविलेल्या काळाचें 'वर्तमान,' 'भूत' व 'भविष्य' असें तीन प्रकारांनीं वर्गीकरण केलें आहे. मराठींतही काळाचें स्थूल वर्गीकरण असेंच आहे. जसें:— 'झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु' (भूत, भविष्य, वर्तमान)– मोरोपंत.

२३४ क्रियावाचक धातूला प्रत्यय लागून कालवाचक रूपें तयार होतात, त्याचप्रमाणें कांहीं अर्थवाचक रूपेंही तयार होतात. अशा ठिकाणीं क्रियेनें दर्शविलेला अर्थ पूर्ण असूनही कालाचा निश्चित बोध होत नाहीं, म्हणून अशा रूपांना 'अर्थ' म्हणतात. हे मराठींत तीन आहेत. १ आज्ञार्थ. जसें:– 'तूं कर.' २ विध्यर्थ. जसें:—'त्वां करावें' ३ संकेतार्थ. जसें:—'तूं करतास तर बरें होतें.'

२३५ संस्कृतांत काळांचें व अर्थांचें पोटवर्गीकरण करून दहा प्रकार केले आहेत व त्यांस त्यांच्या नांवांच्या आद्याक्षरावरून दहा 'लकार' असें म्हणण्याची चाल आहे. या लकारांपैकीं बहुतेक 'महाराष्ट्री,' 'अर्धमागधी,' 'अपभ्रंश' वगैरे प्राकृत भाषांच्या द्वारा मराठींत आले. ज्ञानेश्वरांच्या वेळेला यांतले आठ लकार मराठींत होते. कालमानानें ते मागें पडून त्यांच्या नामरूपांत बदल झाला व आतां त्यांतले थोडेच मराठींत रूढ आहेत. कल्पनेसाठीं पुढें एक कोष्टक देतों.

| लकार | संस्कृतकाळ | संस्कृत अर्थ | संस्कृत रूप | प्राकृत रूप | मराठी रूप | हल्लींचें मराठी नांव |
|---|---|---|---|---|---|---|
| १ लट् | वर्तमान | ... | हसामि | हसामिहसउं | हसें,हसों | जुना वर्तमान. |
| २ लेट् | ... | ... | धीमहि | ... | ... | वेदांपुरता मर्यादित |
| ३ लुङ् | भूत | ... | अभूत् | अहोत्था | होता | (मराठींत एवढेंच रूप बाकी लुप्त झाला) |
| ४ लङ् | भूत | ... | आसम् | आसिं | असें | रीतिभूत. |
| ५ लिट् | भूत | ... | आस | ... | आहा | ( मराठींत एवढेंच रूप आलें होतें. बाकी लुप्त. ) |
| ६ लिङ् | ... | विध्यर्थ | नमेयम् | णमेज्जा | नमिजे | (हल्लीं रूढ नाहीं. ज्ञानेश्वरींत आढळतो) |
| ७ लोट् | ... | आज्ञार्थ | हसाम | हसमु,हसामु | हसों,हासों | आज्ञार्थ |
| ८ लृङ् | ... | संकेतार्थ | अकरिष्यम् | करिस्सम् | करीन | संकेतार्थ |
| ९ लृट् | अनिट् भ० | ... | हासिष्यामि | हसेहिमि | हसेन | भविष्य |
| लृट् | सेट् भविष्य | ... | करिष्यामि | करिस्सामि, करिहिमि | करीन | भविष्य |
| १० लुट् | भविष्य | ... | पुरयितास्मि | पुरवितांहे | पुरवितों | वर्तमान |

मराठींतील रूढ भूतकाळ, संस्कृतमधल्या 'त' या कर्मणि भूतकालवाचक आणि 'तवत्' या कर्तरि भूतकालवाचक प्रत्ययावरून; व विध्यर्थ, 'तव्य' ह्या विध्यर्थक प्रत्ययावरून झाला आहे. जसें:–

१ मया भक्षितम् – भक्खिदे म्यां किंवा मीं भक्षिलें

२ अहं कृतवान् – किअवां मी केला-लों.

३ मया कर्तव्यम् – करिअव्व मी कराव ( विशेषण असल्यामुळें वा-वी-वें अशीं रूपें ).

२३६ मराठींत हल्लीं रूढ असलेल्या काळांचीं व अर्थांचीं रूपें प्रत्ययांनीं सिद्ध होतात व त्यावरून क्रियेच्या काळाचा व अर्थाचा पूर्ण बोध बहुधा होतो. पण कित्येक वेळां क्रियापदाच्या एकट्या रूपानें असा बोध होत नाहीं. अशा वेळीं

क्रियापदाच्या रूपाला एखाद्या कृदन्ताची जोड देऊन अर्थ पुरा करितात. त्याचे प्रकार येणेप्रमाणेः—( १ ) अपूर्णकालदर्शक. जसेंः—'तो बोलत होता.' ( २ ) पूर्णकालदर्शक. जसें:-'तो बरा झाला आहे.' ( ३ ) रीतिदर्शक. जसें:-'मी पहांटे स्नान करीत असतों.' ( ४ ) शक्यार्थक. 'तुझा भाऊ येथें येऊं शकत नाहीं.' ( ५ ) कर्मणि. जसें:-'शिपायांकडून चोर धरिला जातो.' ( ६ ) प्रकर्षदर्शक. जसें:-'मी राग गिळून बसलों.' ( ७ ) सातत्यदर्शक. जसें:-'तो नुसता पहात राहिला.' ( ८ ) इच्छादर्शक. जसें:-'तो निसटूं पहातो.' ( ९ ) आज्ञादर्शक. जसें:-'त्वां गेलें पाहिजे.' ( १० ) उपक्रमदर्शक. जसें:-'तो बोलूं लागला.' ( ११ ) अनुमोदक. जसें:-'मी तुला बोलूं देणार नाहीं.' ( १२ ) आवश्यकत्व बोधक. जसें:-'मला पुष्कळ खेपा घालाव्या लागतील.' ( १३ ) उद्देशार्थक. जसें:- तो जेवणार नाहीं.'

२३७ क्रियेच्या अर्थाचा पूर्ण बोध शक्य तों एकाच शब्दानें दर्शविण्याची प्रवृत्ति संस्कृतांत असल्यामुळें धातूस वेगवेगळे संस्कार किंवा 'प्रक्रिया' करून निरनिराळे अर्थ दाखविणारीं साधित धातुरूपें संस्कृतांत होतात. त्यांतील बहुतेक प्रक्रिया प्राकृत भाषांच्या द्वारें आलेल्या जुन्या मराठींत आढळतात. त्यांतील कांहींचें रूप आतां मर्यादित झालें असून कांहीं पुष्कळ प्रचारांत आहेत. त्यांचा क्रमानें विचार करूं.

**२३८ १ 'णिच्' ऊर्फ प्रयोजक प्रक्रिया.** दुसऱ्याकडून क्रिया करविण्याचा अर्थ व्यक्त करावयाचा असतां प्रयोजक प्रक्रियेचा उपयोग करितात. प्रयोजक रूप अकर्मक धातूपासून झालें असल्यास मूळचा कर्ता प्रयोजक धातूचें कर्म होतो. जसें:-'वारा फळें पाडतो.' 'भात शिजतो'- 'आचारी भात शिजवितो' इ.

( क ) मूळ धातू सकर्मक असल्यास त्याचें कर्म प्रयोजक धातूंत कायम राहतें, मूळच्या कर्त्याला 'कडून' किंवा त्या अर्थाचें दुसरें अव्यय लागून तो तृतीयेंत जातो, व क्रिया करविणारा कर्ता होतो. जसें:—'विद्यार्थी पुस्तक वाचतो.' 'पंतोजी विद्यार्थ्यांकडून पुस्तक वाचवितो.'

( ख ) संस्कृतमध्यें प्रयोजक प्रक्रियेचें विशिष्टत्व बरेंच असूनही सर्वच प्रयोजक रूपें प्रयोजकत्वाचा अर्थ दाखवीत नाहींत, मग मराठींतली प्रयोजक प्रक्रिया त्या मानानें पुष्कळच शिथिल असल्यामुळें बऱ्याच मराठी प्रयोजक रूपांना साध्या

सकर्मक क्रियापदांपलीकडे अर्थ नसतो हें ठीकच आहे. जसें:—' तो जानव्याची गुंतागुंत सोडवितो. '. ' ब्रह्मा सृष्टि घडवितो. ' ' तो चाकरास गांवाला धाडतो. '

**२३९ सन् प्रक्रिया.** संस्कृतमध्यें क्रियापदाला 'स' प्रत्यय लागून इच्छादर्शक क्रियारूपें तयार होतात. असले कांहीं धातु प्राकृताच्या द्वारा मराठींत येऊन राहिले आहेत. जसें:—बुभुक्ष्-बुभुक्ख-बुभुक (णें); चिकित्स्-चिइच्छ-चेच (णें); पिपास्-पिआस-प्यास; दिध्यास्-...-ध्यास इ०.

**२४० (३) यङ् ऊर्फ पौनःपुन्यवाचक प्रक्रिया.** संस्कृतमधील पौनःपुन्यदर्शक प्रक्रियेच्या आधारानें प्राकृत भाषांतून मराठींत असले धातु अनेक आले आहेत व त्यांतले बरेच अद्याप रूढही आहेत. कांहींचा पौनःपुन्याचा अर्थ कायम आहे, व कांहींचा लुप्त झाला आहे. जसें:—ढंढल्ल-ढेंढाळणें, डंडल्ल-डंडळणें, ढंढुल्ल-धुंडाळणें, जग्ग-जागणें, चंकम्म-चकवणें इ. त्याचप्रमाणें ' भांभावणें, जगणें, गागणें, केंकाटणें, तुडुंबणें, तातडणें, गांगरणें, फोफावणें, खोकणें ' इ.

**२४१ (४) नामधातु.** संस्कृतच्या धर्तीवर मराठीनेंही पुष्कळ नामधातु बनविले आहेत. अशा धातूंमध्यें क्रियापदांत नामासह क्रियेचा अर्थ आलेला असतो. जसें दुक्खामि-दुखें, सुहामि-सुहें (सुख पावतों), सुक्कहिं-सुके, संज्ञाअइ-सांझावें, इ०. त्याचप्रमाणें 'कलासणें, दमद्मणें, थरथरणें, कुरकुरणें, वेगावणें, मंदावणें, हाताळणें, फेंसाळणें, पिसाळणें, उत्तरणें' इ०.

**२४२ (५) नञर्थक धातु.** क्रियापदाला ' अ ' जोडून संस्कृतांत नकाराचा अर्थ आणतात. जुन्या मराठींत क्रियापदाला 'न' लावून हा प्रकार आणला आहे. कांहीं धातूंमध्यें हा 'न' इतका एकजीव मिसळून दिला आहे कीं, ते धातु स्वतंत्र नञर्थक धातु मानावयास हरकत नाहीं. जसें:—'नेघणें' (न घेणें), 'नेदणें' (न देणें), नेणणें (न जाणणें), 'नोहणें' (न होणें) इ०.

**२४३** मराठीनें कांहीं आपले स्वतःचे धातु-प्रकारही बनविले आहेत. मात्र त्यांना देखील संस्कृत प्राकृतांचा परंपरित आधार आहेच हे प्रकार येणेंप्रमाणें:—

(क) **शक्य क्रियापदें.** हीं प्रयोजकांचींच कर्मणि व भावे रूपें होत. मूळ धातु सकर्मक असल्यास शक्य क्रियापद कर्मणि, व मूळ धातु अकर्मक असल्यास तें भावे असतें. जसें:—'माझ्यानें तें काम करवतें.' ' माझ्यानें अथवा मला जाववतें.'

( ख ) शक्य क्रियापदांत क्रियेचें मूळचें कर्तृपद विकल्पानें 'च' प्रत्ययान्त विशेषण होऊन मग त्याला तृतीयेचे प्रत्यय लागतात. जसें:—'रामाच्यानें किंवा रामाला जाववतें.'

( ग ) केव्हां केव्हां साध्या अकर्मक धातूवरूनही शक्यतेचें काम होतें. जसें 'मला भाकरी चावते.' 'त्याला गहूं सोसतो.'

( घ ) **अनुकरणात्मक धातु.** कांहीं क्रिया होतांना होणाऱ्या ध्वनींचें अनुकरण करून बनलेल्या धातूंचा उपयोग तसल्या ध्वनिदर्शक अर्थाच्या वाक्यांतून करतात. जसें:—'हंसानें पंख फडफडावले.' 'तें घड्याळ कां टिकटिकत नाहीं ?' 'पैल तो काऊ कोकत आहे.' ( एकनाथ )

( ङ ) **भावकर्तृक धातु.** जेव्हां नुसत्या क्रियापदाच्या रूपावरूनच कर्त्यासह क्रियेचा अर्थबोध होतो, पण क्रियेच्या भावाशिवाय वेगळा कर्ता दाखवितां येत नाहीं, तेव्हां त्या धातूंना भावकर्तृक धातु म्हणतात. जसें:— 'मला फावलें तर येईन.' 'हल्लीं सहा वाजतां उजाडतें.' 'नामधातु' व भावकर्तृक धातु यांत एवढाच फरक आहे कीं, नामधातूंतलें नाम जसें वेगळें काढतां येतें तसें भावकर्तृक धातूंत येत नाहीं.

( च ) **जोड धातु.** कृदन्ताशीं जोडून येऊन अर्थ पूर्ण करणारे कांहीं धातु मराठींत आहेत. जसें:— ( १ ) ( जन् ) जाल. 'बोलता जाला', 'बसती ( जाली )' इ०. (२)(या) जा. 'होतु जाए', 'धरिला जाई', ( ३ ) ( ई ) ए. 'घेऊनि ये', 'घेऊं ये'. त्याचप्रमाणें 'बैस, दे, घे, सह, आवड, पाह, सर, लाग, सक, लाभ, लाह, ल्हा, टाक, ठाक, घाल, म्हण,' इ०.

( छ ) **व्यंजक धातु.** मराठींत कांहीं क्रियापदें अशीं आहेत कीं दिसावयास स्वतंत्र आहेत. पण मागील कर्माशीं मिळून त्यांचा जो अर्थ होतो तो मूळार्थाहून अगदीं वेगळा होतो. जसें:—'मारणें' या धातूचा मूळ अर्थ 'गप्पा मारणें' या जोड शब्दप्रयोगांत अगदीं बदलून जातो. 'करणें, खाणें, घालणें, घेणें, ठेवणें, देणें, धरणें, फोडणें, बसणें, बाळगणें, मांडणें, मारणें, येणें, लागणें, लावणें, होणें' इ० धातु व यांचे समानार्थक धातु असल्या क्रियापदांचीं उदाहरणें होत. जसें:— 'तो झोप घेतो.' 'अंगांत बंडी घालतो.' 'फराळावर ताव मारतो' इ०.

**२४४. अनियमित क्रियापदें.** मराठींत कांहीं धातूंचीं एकटीं दुकटीं चुकार रूपें आढळतात. पण त्यांचा उपयोग बराच होत असल्यामुळें त्यांचा विचार करणें जरूर आहे.

( १ ) भले. व्हल् धातूचें कर्मणि रूप-नेहमीं 'तें, तो, ती, तैसा, तैसी' इत्यादि सर्वनामांशीं जोडून येतें. जसें:—'भले तैसा'. 'भले' आणि 'आवडे' यांचा जुन्या मराठींत 'वाटेल तो' 'पाहिजे तो' अशा अर्थीं उपयोग होतो.

( २ ) नको. 'न कुरु' पासून झालेलें क्रियापद. क्रियेचा निषेध दाखवितें. जसें:—'नको नको मना गुंतूं मायाजाळीं' ( रामदास ).

( ३ ) नको. 'न कम्' पासून झालेलें विशेषण व अव्यय. याचाही निषेधार्थींच उपयोग होतो. जसें:—'मला हा आंबा नको.'

( ४ ) पाहिजे. हें संस्कृत 'दृश्-पश्य्,' 'प्रकाश्' ( प्रार्थ् ), ( प्राप् ), आणि 'प्राह्' इतक्या पांच धातूंपासून सिद्ध होत असून, मराठींत स्वतंत्र धातूसारखें उपयोगांत आहे. या रूपावरून आवश्यकतेचा बोध होतो. क्वचित् द्वितीय पुरुषी एकवचनीं 'पाहिजेस' व सर्व पुरुषीं अनेकवचनीं 'पाहिजेत' या रूपांचा उपयोग करितात. या धातूचा विशेषणासारखाही उपयोग होतो. जसें:— 'तुला आज गेलें पाहिजे.' 'मला पुस्तकें पाहिजेत'.

( ५ ) व्हावा, हवा. हीं मूळचीं 'हो' धातूचीं विध्यर्थक विशेषणें असून आतां क्रियापदादाखल किंवा विशेषणादाखलही उपयोगांत येतात. जसें:—'तुम्ही आंधळे व्हावेत हा नेमानेमच म्हणायचा.' 'मला पेरू हवा.'

( ६ ) नलगे. हें नञर्थ जोड धातुरूप स्वतंत्र धातु म्हणून फक्त वर्तमान काळांत चालतें. जसें:—'औषध नलगे मजला '( रघु० पंडित)

( ७ ) नये. हाही असाच नञर्थ जोड धातु असून फक्त तृतीय पुरुषी रूपांनीं उपयोगांत येतो. जसें:- 'मीं करूं नये,' 'त्यांनीं जाऊं नये.' इ०

## १५ पाठावली.

जसें काय कारटीचें स्वयंवरच चाललें आहे ! गळ्यांत दावें बांधून मी विकीन तेथें तुला गेलें पाहिजे. (शारदा)

तोच तो ! म्हणे पोरीला विकूं नका. मग तुला विकून त्या सावकाराचें कर्ज फेडूं का ? (किचा)

मी किती नको नको म्हटलें, तरी काळ कुठें ऐकतो आहे ? त्याचा आपला क्रम चालायचाच. (किचा)

रेशमी शेल्याला सुताच्या दशीसारखी गरीबाची पोरगी मी ! शोभलें तरी पाहिजे ना ? (किचा)

दादासाहेब, तो काय म्हणतो हें पुरतें ऐकून घेतल्यावांचून टीका करूं नये. (सौभद्र)

पण मी जेवणार आणि सरकार स्वारी आग्रह करून वाढविणार ही जुनी आठवण झाली कीं, काय सांगू सरकार, अजूनही हात फुरफुरतात. (तोत० बंड)

छे छे, असें बोलूं नये. असलें भाषण आम्हां बायकांना शोभत नाहीं. (सौभद्र)

पण नव्या लोकांनीं सरसकट 'नवें तें हवें' असा हेका धरला, तेव्हां अर्थातच आघाताइतक्याच नेटाच्या प्रत्याघातामुळें 'जुनें तें सोनें' असा जुन्या लोकांनीं आग्रह धरिला. (प्रेमसंन्यास)

ज्या काळाच्या प्रवाहांत आमचीं खरीं बाळरूपें वाहून गेलीं त्याच्याच ओघांत त्यांच्या या चित्रांनाही लोटून देतें. (किचा)

तिनें जो एक रट्टा सुंदरीचे पाठींत दिला, त्यानें ती पोर कळवळली, पण तें लक्ष्यांत न घेतां ती आपल्या डोक्याला लागल्याबद्दलच कांगावा करूं लागली. (पण लक्ष्या०)

भाषा सुधारण्याचें व लोकांत ज्ञानप्रसार करण्याचें काम जरी हातीं घेतलें, तरी तें सिद्धीस नेण्यास याची गचांडी धर, त्याची

गचांडी धर, याप्रमाणें वारंवार अर्धचंद्रप्रयोग करण्याचें कांहीं विशेष कारण दिसत नाहीं. (निबंधमाला)

---

अगा करुणाकरा करीतसें धांवा । या मज सोडवा लवकरी ॥
ऐकोनीयां माझीं करुणावचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥
मागें पुढें अवघा दिसे रितां[2] ठाव । ठेवुनी पायीं भाव वाट पाहे ॥
उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला मायबापा ॥
उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य झालें ॥
तुका म्हणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळा ॥ १ ॥[1]
(तुकाराम)

करिती कवित्व चातुर्याच्या योगें । प्रासादिक रंग आणितां नये ॥
संन्याशाचें सोंग संपादिलें चांग । वैराग्याचें अंग आणितां नये ॥
चंद्रसूर्यचित्रें लिहिती अव्यंग[3] । प्रकाशाचें अंग आणितां नये ॥
शिपायाचें सोंग आणितां येई सांग । शूरत्वाचें अंग आणितां नये ॥
तुका म्हणे गाऊ-नाचून करिती सीमा । पांडुरंगीं प्रेमा आणितां नये
॥ २ ॥ (तुकाराम)

सद्गुरुचा पूत कहीं न डंडले[4] । न खचतां चाले गोवांगुंती[5] ॥ (रामदास)
बळें धुंधार्ट[6] सुटला वारा । थोर प्रजन्यँ[7] मोकळी[8] धारा ।
फडफडा पडती गारा । रेरे ! हींव वाजतें थरारा रे ॥ १ ॥
घडीमध्येंचि पाणजंजाळ[9] । पूर लोटले पाभेळ[10] ।
नदी फुंफाती[11] चळचळ । रे रे ! जाऊं नेदिती वोहळ[12] रे ॥ २ ॥ (रामदास)
काखेसी मेरू घेउनी देखा । कैसें नृत्य करील पिपीलिका[13] ।
कैसें ब्रह्मांड उचलेल मशका । भूगोल मक्षिका केंवि हालवी ॥ १ ॥
(श्रीधर)

---

१ मानगुटी धरणें. २ ओस जागा. ३ निर्दोष (रंगवितात). ४ डळमळत नाहीं. ५ बिकट प्रसंगांतून न गडबडतां पार पडतो. ६ प्रचंड झंझावात. ७ मोठा पाऊस. ८ साडतो. ९ पाण्याचा प्रलय. १० कौलांच्या सखलटी. ११ फों फों करीत चाललया. १२ ओढे. १३ मुंगी.

गणवतील पृथ्वीचे रजःकण । मोजवेल सागरींचें जीवन[१४] ।
कनकाद्रीचा चेंडू करून । उडविजेल सर्वथा ॥ २ ॥ (किन्ता)

पृथ्वीचें वजन होईल कोडें[१५] । करवेल ब्रह्मांडाची घडामोड ।
परि वैराग्य बहुत अवघड । जाण रोकडें नृपनाथा ॥ ३ ॥ (महीपती)

दृणदृण मेदिनी वाजत वामचरणें[१६]-निघातें ।
थोंगीतें[१७] थोंगीत थाक तोडीत चित्त अनुकारें संगीतें ।
टाळछंदें मन वेधे टाळी वाजे अनुहीतें[१८] ।
धिमधिमं[१९] धिमतांग थोंकीत तालछंदें सांवळें नाचतें ॥ १ ॥ (एकनाथ)

तारा एक तशांत पश्चिमदिशा फोडून बाहेरेली[२०] ॥
संध्याकुंकुमिं दिग्वधूच टिकली लावी रुपेरी जणूं ॥ (वाग्वैजयंती)

---

नयन-शर-धनुष्यें-भोंवयांच्या प्रतापें ।
श्रवणवरिहि[२१] येती तांवडे कोपतापे ॥
अधर थरथरींती रक्तवर्ण स्वभावें ।
आशिस तुज पहावें बोललों याच भावें ॥ १ ॥ (वामन)
स्तंभ तो अवचितांचि कडाडी । अब्जजांड[२२] अवघेंचि तडाडी ॥
अब्जजादि[२३]-हृदयांत धडाडी । कालमेघ शंत[२४]-नाद गडाडी ॥ २ ॥
(किन्ता)

लोकांचे परमाणु-तुल्य गुण जे मेरू परी वानिती ।
चित्तीं तोषहि पावती सुजन ते नेणो किती नांदती । (किन्ता)
आयुष्य वर्षशत त्यांत निमे निजेलें[२५] ।
त्याही निमेंताहि निमे दिन वांद[२६] झाले ॥

---

१४ पाणी. १५ लीलेनें, सहज. १६ डाव्या पायाच्या आघातानें. १७ संगीताचें अनुकरण करणारे पायांतील घुंगरांचे नाद चित्त ओढून घेतात. १८ टाळांच्या छंदांत मनाला समाधि लागून अनुहात नांवाचे समाध्यवस्थेंतील नाद ऐकूं येतात. १९ आणि मृदंगावर निघणाऱ्या बोलांच्या तालाला अनुसरून कृष्ण नाचतो. २० बाहेर आली. २१ रागाच्या लहरी कानापर्यंत गालावर येताहेत. २२ ब्रह्मांड. २३ ब्रह्मादिकांच्या हृदयांत. २४ प्रळयकाळच्या शेंकडों मेघांचा आवाज. २५ झोंपेंत गेलें. २६ फुकट.

वार्धक्य शैशवपणें, उरलें वियोगें ।
दुःखां[२७]मयेंचि सरलें, सुख काय सांगें ॥ ३ ॥ ( किक्ता )

हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज, होय विनोद तुम्हांला ॥
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच तुम्ही नलगेच, असें वदुनी नृपराजसुता ते ॥
राहाविला सखिचा जन, आपण मात्र तयास धरूं मग जाते॥१॥( रघु० पंडित

न रंजे कारंजें; निरखुनि फणीतें फणफणी ॥
मुदेनें मोदेना, नल-गुण-ग[२८]णीं जे गुणगुणी ॥
न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुकगिरा ॥
न नाहे, माना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ २ ॥ ( रघु० पंडित )

मग कंठनाल चरचर तो सत्य करावया बिरु[२९]द कापी ॥
मिटक्या देउनि मटमट घटघट त्या स्वाहितां[३०]सृगुदका पी ॥१॥( मोरोपंत )

चिंताज्वरांत माझा रात्रौ नाहींच लागला डोळा ॥
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ॥ २ ॥ ( मोरोपंत )

जो कां तुम्ही सिक्ष्या[३१]पिला । वियेसि वसे[३२]ठा केला ।
तेणें हा सैन्यसिंधु पाखरिलों[३३] । देखदेख ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

तरि स्पर्शों सर्वांग जीववी । स्वादें जीभेतें नाचवी ।
तेवींचि कानाकरवीं[३४] म्हणवी । 'बापु माझा '॥ २ ॥ ( किक्ता )

देखा आवडे[३५] तेसणा धुंधुरू[३६] । परि महातेजीं न मिरवे काय करूं ।
अमृताचे ताटीं वोगरू[३७] । ऐसी रसोय कैंची ? ॥ ३ ॥ ( किक्ता )

गावां गेलेयां वल्लभु । पतिव्रतेचा विरह[३८]क्षोभु ।
भले[३९]तसा हानिलाभु । नमनी[४०] जोवि ॥ ४ ॥ ( किक्ता )

---

२७ दुःख आणि रोग यांत. २८ नव्या राजाचा गुणसमुदाय गुणगुणू लागली २९ बाणा. ३० आपल्या शत्रूच्या रक्तरूपी पाण्याला ३१ शिकविला. ३२ आश्रयस्थान ३३ पसरिला. ३४ 'अरे बाप' ( काय मौज आहे ?) असें कानाकडून म्हणविते तो स्पर्श, स्वाद आणि नाद या तिन्ही गुणांत श्रेष्ठ आहे असा भाव. ३५ वाटेल तसला. ३६ काजवा. ३७ अमृताच्या ताटांत वाढावें असले दुसरें पक्वान्न कुठलें आणायचें ? ३८ विरहाचा संताप. ३९ वाटेल तसला ( नफा तोटा ). ४० जुमानीत नाहीं. पति गांवास गेला असता पतिव्रतेला कसलाही लाभ चालून आला तर त्याचा ती स्वीकार करीत नाहीं, किंवा हानीची पर्वा करीत नाहीं असा भाव.

# सोळावा पाठ.



## क्रियापदांचे काळ व अर्थ.



२४५ सांप्रतच्या मराठींत देखील क्रियापदांचे काळ व अर्थ मिळून एकंदर आठ आख्यात विभक्ति आहेत. त्या ह्याः- ( १ ) जुना वर्तमान. ( २ ) नवा वर्तमान. ( ३ ) जुना किंवा रीति भूत ( ४ ) चालू भूत. ( ५ ) भविष्य काळ. ( ६ ) आज्ञार्थ. ( ७ ) विध्यर्थ. ( ८ ) संकेतार्थ. ह्या आख्यात विभक्ति म्हणजे "क्रियापदांना प्रत्यय लागून होणारीं कालदर्शक व अर्थदर्शक स्वतंत्र रूपें बनविणाऱ्या विभक्ति" होत. काळांचे व अर्थांचे इतर सूक्ष्म प्रकार कृदन्तांच्या साह्यानें दाखविले जातात, व हीं कृदन्तें योजलीं तरी मुख्य क्रियापद या आठ आख्यातांपैकीं कोणत्या तरी एकांत असतेंच. जसें: —'पांडु पुस्तक वाचीत होता' ह्या वाक्यांत 'वाचीत' हें कृदन्त 'होता' या भूतकाळाच्या रूपाला जोडून अपूर्णभूत काळाचा अर्थ उत्पन्न झाला. ह्या आख्यातांचा आतां क्रमानें विचार करूं.

२४६. **जुना वर्तमान**, हा हल्लीं बराचसा प्रचारांतून निघाला आहे. जुन्या मराठी लिखाणांत विशेषतः कवितेंत त्याची व्याप्ति मोठी आहे. हल्लीं रूढ असलेल्या मराठी म्हणातून ह पुष्कळ आढळतो,व ह्याचा अर्थ 'वर्तमाकानळीं क्रिया चालू आहे हें दाखविणें' हा असतो. जसें:—'बोले चाले हरी' ( तुकाराम ). 'दाम करी काम'.

( क ) चालू मराठींत ह्या काळाचा उपयोग ( १ ) संशय दाखविण्याकरितां, ( २ ) दुसऱ्याच्या शब्दांचें मनन किंवा नक्कल करण्याकरितां व ( ३ ) निषेधार्थ दाखविण्याकरितां 'न' या शब्दासह करितात. जसें: 'कोण जाणे तो येतो कीं नाहीं.' 'म्हणे दारू सुटत नाहीं,' ( एकच प्याला ). 'तो तें काम आपणही करीना व मलाही करूं देई ना.'

२४७. **नव्या वर्तमानकाळा**वरून सामान्यपणें क्रिया वर्तमानकाळीं चालू आहे असा बोध होतो. जसें:—'तो पुस्तक वाचतो.' नेहमीं सिद्धांतवत् खऱ्या

मानल्या जाणाऱ्या गोष्टीही वर्तमान काळानें सांगितल्या जातात. जसें:—'लवंगेनें पित्त वाढतें.'

(क) या काळावरून जवळचा भविष्यकाळही दाखविला जातो. जसें:–'तूं चूल पेटवितेस तों मी भाजी आणतों.'

(ख) क्वचित् या काळावरून जवळचा भूतकाळही दाखविला जातो. जसें:– 'मी म्हणतों (म्हणालों) काय? आणि तूं त्याचा अर्थ करितोस (केलास) काय!'

(ग) एखादी जुनी हकीगत सांगतांना किंवा दुसऱ्याचें अवतरण देतांना भूतकाळाबद्दल ह्या काळाचा उपयोग करतात. जसें:—'एक इतिहासकार म्हणतो-मॅग्नाचार्टा सनदशीर राज्यपद्धतीचा पाया होय.' 'समर्थ म्हणतात-परस्त्रीसी प्रेमा धरी, तो एक मूर्ख.'

**२४८. जुन्या भूतकाळाला** हल्लीं **रीतिभूत** असें म्हणतात व त्यावरून 'अमुक गोष्ट पूर्वी नियमानें किंवा रीतीनें होत असे' असा बोध होतो. जसें:— 'तो रोज मला तासभर शिकवी.'

**२४९. भूत** काळावरून सामान्यतः, गेलेल्या काळीं एखादी क्रिया घडली असें दाखविलें जातें. जसें:—'काल मोठा पाऊस पडला.' 'तो हा पुन्हा नुठाया वसुधे तुज दृढ धरून निजला गे!' (मोरोपंत)

(क) नम्रपणें इच्छा दाखवितांना ह्या काळाचा वर्तमान काळाच्या अर्थानें उपयोग करतात. जसें—'मला थोडें सुचवायच होतें.'

(ख) या काळावरून केव्हां केव्हां भविष्यकाळही दाखविला जातो. जसें:– 'तूं चालूं लाग, मी आलोंच.'

**२५० भविष्य**काळावरून एखादी क्रिया पुढें होणार आहे असा बोध होतो. जसें:—'तो येईल.'

(क) प्रश्नार्थक वाक्यांत या काळावरून शक्यतेचा किंवा अशक्यतेचाही बोध होतो. जसें:— 'तो येथें कसा येईल?' 'तो कां येईल?'

(ख) संकेतदर्शक वाक्यांत प्रथम हा काळ आला असल्यास, 'विनंति, कल्पना, बेपर्वाई' इत्यादींचा बोध होतो. जसें:—'मला पांच रुपये उसने देशील तर बघ.' 'गुरुजी रागें भरतील तर भरतील.'

( ग ) ह्या काळावरून क्वचित् वर्तमानकाळाचाही बोध होतो. जसें:— 'जाशील तर जा.'

( घ ) केव्हां केव्हां या काळावरून भूतकाळाचा देखील अर्थ होतो. जसें:— 'तो असें करील अशी मला कल्पना नव्हती.'

( ङ ) भविष्यकाळाचा प्रश्नार्थी उपयोग करून आज्ञेचा किंवा विनंतीचा बोध होतो. जसें:—'तेवढें पत्र टपालांत टाकशील कां ?'

२५१ आज्ञार्थाचा प्रथम पुरुषांत उपयोग केला असल्यास प्रश्नाचा बोध होतो. जसें:—'मी नाटकाला जाऊं ?'

( क ) प्रथम पुरुषीं आज्ञार्थानें द्वितीय पुरुषासह प्रथम पुरुषाची एखाद्या क्रियेविषयी आतुरता सुचविली जाते. जसें:—'चला, पंढरीसी जाऊं,' (तुकाराम)

( ख ) द्वितीय पुरुषीं आज्ञार्थावरून 'आज्ञा, हुकूम, सल्ला, मसलत, विनंति, उपदेश,' इत्यादींचा बोध होतो. जसें:—'खडा रहा !', 'आपलें काम कर'. 'तुम्ही आपल्या सोप्याला फरशी करा,' 'देवा मला तार'.

( ग ) तृतीय पुरुषी आज्ञार्थावरून 'परवानगी, सवलत, आशीर्वाद, इच्छा' शाप, बेपर्वाई,' इत्यादिकांचा बोध होतो. जसें:—'अवन करो तुमचें सदा तो आत्मसमाधी' ( देवल ). 'जो जें वांछील तें लाहो, प्राणिजात' ( ज्ञानेश्वर ). 'त्या मेल्याचें समूळ तळपट हो,' ( मोरोपंत ). 'न मिळो खावया न वाढो संतान' ( तुकाराम ).

( घ ) एखाद्या व्यक्तीनें सामान्यतः एकाच प्रकारच्या अनेक क्रिया केल्याचा उल्लेख करतांना वर्तमान किंवा भूतकाळ दाखल आज्ञार्थाचा उपयोग करतात. जसें:—'पाटी फोड, टोपी फाड, झिंज्या उपड, असा त्यानें प्रळय करून सोडला.'

( ङ ) क्वचित् अशा अर्थी विध्यर्थ विशेषणाचाही उपयोग करतात. जसें:— 'इकडेच बघायचें, तिकडेच पळायचें, असा त्याचा रस्त्यानें उद्योग चालला होता.'

( च ) आज्ञार्थाच्या जोड रूपांचा नामासारखा उपयोग होतो. जसें:— 'तुझ्यासारखी माझ्याच्यानें धांव-पळ होत नाहीं.'

( छ ) अनेक वस्तूंचा निर्देश करितांना आज्ञार्थाचा पादपूरकासारखा किंवा अर्थपूरकासारखा उपयोग करितात. जसें:—'जिन्नस म्हणा, पान्नस म्हणा, मुलीच्या अंगावर घातले पाहिजेत.'

२५२. आज्ञार्थी वाक्याचें कर्मणि किंवा भावे रूप म्हणजेच **विध्यर्थ** होय. विध्यर्थाचे पुढील उपयोग होतात. ( १ ) सभ्य तऱ्हेची आज्ञा. जसें:—'पसंतीनुरूप तजवीज करावी.' ( २ ) औपरोधिक आज्ञा. जसें:—'आपण आतां आपलें वक्तृत्व थांबवावें.' ( ३ ) संभव, तर्क. जसें:—'आज पाऊस पडावा.' ( ४ ) जुनी आठवण. 'आपण मधल्या सुटींत आंबराईत जावें, चिंचा पाडाव्या.' ( ५ ) उपदेश, सल्ला. 'मना चंदनाचे परी तां ( त्वां ) झिजावें. ( रामदास ).

( क ) जोड विध्यर्थानें ( १ ) विरोध, ( २ ) कार्यकारण संबंध, ( ३ ) तिरस्कार, इत्यादींचा बोध होतो. जसें:—'सोम्यानें करावें, आणि गोम्यानें भरावें.' 'द्यावें तसें घ्यावें.' 'नाऱ्यानें गावें आणि केशानें ऐकावें.'

२५३ **संकेतार्थ** उत्पन्न होण्याकरितां 'जर—तर' हे शब्द गुप्त किंवा प्रकट यावे लागतात. संकेतार्थाचे पुढीलप्रमाणें उपयोग होतात. ( १ ) इच्छा, कल्पना, अनुमान, सिद्धांत वगैरेचा निर्देश. जसें:—' तो आज येता तर तुम्हांस भेटता ' ( २ ) भूतकाळीं एखादी गोष्ट टळल्याचा उल्लेख. जसें:—'थोडक्यांत बचावलें नसतें तर तो मेलाच असता.' ( ३ ) पुढील बेत किंवा संकेत यांचें कथन. जसें:— तूं येशील तर मी तयार राहीन ! ( ४ ) हमी देणें. जसें:—' तो येईल तर हराम. '

( क ) संकेतार्थ उत्पन्न करण्याचे आणखीही कांहीं प्रकार आहेत. ते असे:— ( १ ) ' यास ' किंवा ' यानें ' हा प्रत्यय लावून केलेलें भूतकालवाचक कृदन्त घालून. जसें:—' मी पुण्यास गेल्यास तुझ्या काकांना भेटेन. ' ( २ ) भूतकाळीं क्रियापदापुढें ' असतां ' हें रूप घालून. जसें:—' मला रजा दिली असतां मोठी सोय होणार आहे. ' ( ३ ) ' म्हणजे ' या अवयवाचा उपयोग करून. जसें:— ' मी बाजारांत गेलों म्हणजे तुला खुळखुळा आणीन. '

---

## १६ पाठावली.

**भद्रेश्वर:—हो, कां बरं ? कोदंड:—त्यांची भेट घ्यायची होती.**

( शारदा )

**आणि समजा, बोलण्याचा प्रसंग आलाच, तर धोरण पाहून श्रीमंताला रुचेल तेंच बोलावें, खरें असो, खोटें असो. समजलांत?**

( शारदा )

आतां फक्त मुहूर्तनिश्चय व्हायचा अवकाश, कीं आम्ही पुन्हा सहकुटुंब झालों. (कित्ता)

हें बाबांचें द्रव्याचें वेड मला भोंवतें आहे. आणि हें वेड घालविणारा मांत्रिक म्हणा, वैद्यराज म्हणा, या जगांत तरी कुणी नाहीं म्हणतात. (कित्ता)

बैठकी मारायच्या, कोहाळेपाक बडवायचा, जोरजोडी करायची अटीव दूध झोंकायचें. नमस्कार घालायचे, बदामाची खीर चापायची ! (कित्ता)

शिव शिव ! बाईसाहेब ! खरेखुरे भाऊसाहेब जिवंत असते तर ते मला नको कां होते ? (तोत० बंड)

वहिनी, सगळ्यांनींच माझ्यावर शस्त्र उपसलें आहे तेव्हां तूं तरी कां कमी करशील ! चालूं दे ! मी आतां दगडापेक्षां देखील घट्ट झाले आहे ! (सौभद्र)

तूं दुसऱ्या कोणाजवळ अवाक्षर बोललास, तर ठार मेलास म्हणून समज. (उषःकाल)

कोणतेंही व्हावयाचें नाहीं, परंतु राजश्री नानांनीं मनावर धरल्यास[1] कांहीं होईल असें वाटतें. (परशु०पट०पत्र,खरे यांचा पत्रसंग्रह)

वरकडें[2] इतर भाव मनामधें असेल, तरी रघुनाथ साक्ष असे. (समर्थांचें पत्र, श्रीसंप्र० कागदपत्रें)

जॉनसनसारख्या रसिकांनीं ज्यांस कवित्वसिंहासनावर आरूढ करवून सर्वांच्या अभिनंदनास पात्र करून ठविलें होतें, त्यांस मेकॉलेप्रभृति निबंधकारांनीं पदच्युत करून, 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' या न्यायानें जॉनसनप्रभृति मोचेलयाल्यांसही[3] त्यांच्याबरोबरच खालीं ओढलें. (निबंधमाला)

---

१ नाना फडणिसांनीं मनांत आणल्यास ते या अडचणींतुन वाट काढून देतील असा परशुरामभाऊंचा भाव. २ दुसरा कांहीं हेतु. ३ स्तुतिपाठकांसही.

आम्ही वैकुंठवासी । आलों याच कारणासी ।
बोलिल जें ऋषि । साचें[4] भावें वर्ताया ॥ १ ॥
झाडूं संताचे मारग[5] । आडरानीं भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥ २ ॥
अर्थें लोपलीं[6] पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ।
विषयलोभी मनें । साधनें बुडविलीं ॥ ३ ॥
पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।
तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें ॥ ४ ॥ (तुकाराम)

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं माझा भावो ॥
चरण न सोडीं सर्वथा । आण तुझी पंढरिनाथा ॥
वदनीं तुझें मंगलनाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥
नामा म्हणे केशवराजा । केला पण चालवीं माझा ॥ १ ॥
(नामदेव)

साधकांची[7] दशा उदास असावी । उपाधी नसावी अंतर्बाह्य ॥
लोभातें टाकावें, निद्रेतें जिणावें । भोजन करावें परिमित ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांसी भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपें ॥ १ ॥
(तुकाराम)

वानोत निंदोत सुनीतिमंत । चळो[8] असो वा कमला गृहांत ॥
हो मृत्यु आजीच, घडो युगान्तीं[9] । सन्मार्ग टाकूनि भले न जाती॥१॥
(वामन)

महावाद्यें नाना निनदहि[10] तनाना मग घडे ॥
पिता तीचा पाटीभरि धनहि वांटी. बहु विडे ॥ (रघु० पं.)

---

४ त्यांतील तत्वार्थाप्रमाणें वागून दाखविण्यास. ५ मार्ग. ६ पुराणांचा खरा अर्थ लोपला. ७ 'जो संतांसि शरण गेला । संतजनीं आश्वासिला । मग तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥१॥ रामदास. ८ निघून जावो. ९ कालाचे मोठे चार खंड. ते 'कृतयुग सत्रा लक्ष अठ्ठावीस सहस्त्र । त्रेतायुग बारा लक्ष शाण्णव सहस्त्र । द्वापरयुग आठ लक्ष चौसष्ट सहस्त्र। आतां कलियुग ऐका ॥१॥ कलियुग चार लक्ष बत्तीस सहस्त्र ।' असे मानवी वर्ष-संख्यांनीं दासबोधांत सांगितले आहेत. १० वाजंत्र्यांचा आवाज.

रिपुंना मिळो बिभीषण, झाली मशकांत वाढ एकाची ।
जो कुलकलंक झाला, त्याला हे उचित वृत्ति भेकांची[११] ॥ ( रणविहार )

---

न कळतां पद अग्निवरी पडे । न करि दाह असें न कधीं घडे ॥
अजितें[१२]-नाम वदो भलत्या मिसें । सकळ पातक भस्म करीतसे ॥१॥
( वामन )

आली समीप यजमानिन पट्टराणी ।
पाहे हरीस, जिचि हो न पुरे शिराणी[१३] ॥
ओती करें कनकपात्र धरून वारी ।
सर्वस्व दे पति तयास न जे निवारी ॥ २ ॥ ( कित्ता )

राया तिचें मुख-सुधाकरें[१४] या द्वयाला ।
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असता, नसता कलंकी ।
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ १ ॥ ( रघु० पंडित )

राजे असाल तरि धन्य वसुंधरा हे ।
शोभाल देव तरि नाक[१५] यथार्थ आहे ॥
भोगी[१६] तुम्ही उपजलां जरि नागलोकीं ।
खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ २ ॥ ( कित्ता

करिती सूर्यास्तोदय[१७] एक मुहूर्तांत एक शतदा ते ।
त्यांत न एकासमही होती मघांअसेहि शत दाते ॥ १ ॥ ( मोरोपंत )

मार्गेचि तुम्ही भजतां धर्माला तरि तुम्हांस वांचविता ।
आतां मरा, न वांचे दीप्तगृहीं जो न तोय सांचविता ॥ २ ॥( कित्ता )

---

११ बेडकाची. १२ परमेश्वराचें नांव. १३ कौतुक, आवड. १४ तिचें तोंड आणि चंद्र यांच्यांत वेगळेपणा वाटलाच नसता. १५ स्वर्ग. १६ तुम्ही जर नागलोकांतले नाग असाल तर त्यांचा लोक जो पाताळ तो सर्वांच्या तळीं असूनही (तुमच्यामुळें) सर्वांच्यावर होईल. १७ एकानें आपल्या बाणानें सूर्य झांकुन टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुन्हा सूर्याचा उदय करावा, असें ते एक एक मुहूर्तांत ( दोन घटकांत ) शेंकडों वेळ करीत होते ह्या बाबतींत त्यांच्यापैकीं एकासारखाही कोणी दाता होणार नाहीं, एरवीं मघांसारखे दाते शेंकडों होतील !

कीं नाम *स्पर्शमणि, स्पश, परि काय करिल खापर मी ।
सदयाहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमीं ॥ ३ ॥ ( किंत्ता )
किंवा पुराणपुरुषा ! संप्रति बहु भागलासि या कामीं ।
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हांका मी ॥ ४ ॥( किंत्ता )
जवं प्रकृतिचें[18] अधिष्ठान । तंव सांडि मांडि हें अज्ञान ।
जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी असे ॥ १ ॥
आणि दुःखयोनि जियों[19] आहाती । तिया निरर्थका तरि नव्हती ।
जरि विषयांवरी विरक्ति । धरीति जीव ॥ २ ॥
जरि विषयीं विषयो सांडिजैल । तरि महादोषिं कें वसिजैल ।
आणि संसारुशब्द नव्हैलें । लटिका जगीं ॥ ३ ॥ ( ज्ञानेश्वर )

---

* परिस.

१८ जोंपर्यंत देहावर त्रिगुणात्मक प्रकृतींचा अंमल आहे, तोंपर्यंत ‘ अमुक सोडतों, अमुक धरतों ’ ही भाषा म्हणजे वेडपणा आहे, कारण मनुष्याचे व्यापार गुणांच्या हातांत असतात. १९ प्राण्यांनीं जर विषयांसंबंधीं वैराग्य धारण केलें तर दुःखयोनि ज्या आहेत त्या निरर्थक होणार नाहींत काय ? २० जगांत संसार शब्द खोटा नाहीं कां होणार ?

# सोळावा पाठ.



## अव्ययें.



२५४. " जे शब्द पदार्थवाची नव्हत ते निपात अथवा अव्यय होत. " ( राजवाडे ). हल्लीं मराठींत रूढ असलेल्या अव्ययांपैकीं संस्कृतमधून जशींच्या तशींच आलेलीं आहेत, तीं ' तत्सम ' अव्ययें होत. कांहीं विकृत होऊन आलीं आहेत, ती तद्भव अव्ययें होत. अव्ययांच्या वाक्यांत होणाऱ्या उपयोगांवरून त्यांचे ' स्थलवाचक, कालवाचक, विरोधबोधक, अनुकरणवाचक ' इत्यादि भेद मानले आहेत.

२५५. संस्कृतप्रमाणें मराठींतही विशेषणांपासून क्रियाविशेषणें बनविण्याचा प्रघात आहे. पण मराठींतलें क्रियाविशेषण बहुधा प्रत्ययावांचूनच होतें व तें अर्थावरून जाणावयाचें असतें. जसें –' वारा गार सुटला. ' संस्कृतमधील बरींच क्रियाविशेषणें मराठींत प्रत्यय गाळून उपयोगांत आणतात. जसें:–'सत्वरम्-सत्वर' ' द्रुतम्-द्रुत, ' ' मन्दम्-मन्द ', इ०. असल्या क्रियाविशेषणांचा संबंध नामें व क्रियापदें यांमधून थोडा फार वांटलेला असतो व अव्ययांचा संबंध नुसत्या क्रियेकडे असतो हा दोन्हींत भेद आहे.

२५६. हल्लीं प्रचारांत असलेल्या तत्सम व तद्भव अव्ययांपैकीं कांहीं बहुधा एकाच अर्थानें नेहमीं उपयोगांत येतात. जसें:–'झटिति' (लवकर), 'वृथा' (फुकट), ' मृषा, मिथ्या ' ( खोटें ), ' सध्यां, ' ' मुधा ' ( उगीचच, खोटें ) इ०. पण कांहींच्या अर्थांत बरेच सूक्ष्म भेद असतात, व त्यांचें वाक्यरचनेंत बरेंच महत्व असतें. असलीं कांहीं हल्लीं प्रचारांत असलेलीं व कांहीं जुन्या मराठींत आढळणारीं अव्ययें त्यांच्या संस्कृत-प्राकृत व्युत्पत्तिपरंपरेसह पुढें दिलीं आहेत.

१ **अगदीं** ( अगतिकं-अगदिअं ) या अव्ययाचे पुढील अर्थ होतात. ( १ ) निखालस, केवळ. जसें:–तूं अगदीं ' ढ ' आहेस. ( २ ) अत्यंत, फार. जसें:– ' त्याला अगदीं चोपून काढ. '

२ **अजुनि** ( अद्यापि-अज्जुइं ) चे दोन अर्थ होतात. ( १ ) हा वेळपर्यंत. जसें:–' तो अजून आला नाहीं. ' ( २ ) एक वेळ. जसें:–' अजून रामा पुरवला, तो कुशासारखा भांडखोर तरी नाहीं. '

३ **अथ** हें संस्कृत अव्यय पुढील अर्थांनीं उपयोगांत येतें. ( १ ) ग्रंथलेखनाला आरंभीचें मंगल. जसें:–' अथ शनिमहात्म्याला प्रारंभ करितों.' ( २ ) 'मग, नंतर. ( ३ ) आणि.

४ **अथवा** हेंहि संस्कृत अव्यय असून पुढील अर्थांनीं उपयोगांत येतें. ( १ ) विकल्प. जसें – ' मी येईन अथवा येणार नाहीं. ' ( २ ) आक्षेप. जसें:–'शेवटीं तूं पुस्तक फाडलेंसच, अथवा मी मूर्खानें तें तेथें ठेवावं कां ? '

५ **आ** हें संस्कृत अव्यय ' पासून ' अशा अर्थीं समासांत येतें. जसें:– ' आजन्म. '

६ **आज** ( अद्य अज्ज ) चे दोन अर्थ होतात. ( १ ) चालू दिवशीं. जसें:– ' आज हवा चांगली आहे. ( २ ) हल्लीं, या घटकेला. जसें: -' आज दिलें उद्यां नाहीं. ' ( रामदास )

७ **आणि** ( अन्यत्-अण्णिअ ) चे पुढील अर्थ होतात. ( १ ) समुच्चय. जसें:-' रामा आणि गोविंदा. ' ( २ ) दोन क्रियांचं समकालीनत्व जसें:–' मी त्याच्या घरांत शिरलों, आणि तो जिन्यावरून खालीं उतरून आला.' ( ३ ) विरोध. जसें: - ' हीन आणि कृत्रिमी । रोगी आणि कुकर्मी ' (रामदास)

८ **आणि, आन्, न् नीं.** ( हन्त-हान ) या अव्ययाचे दोन अर्थ होतात. ( १ ) खरोखर. जसें:-' मग तसाच निघालोंन् काय ? ' ( २ ) विरोध. जसें:– ' ब्राह्मण आणि दारू पितो ! '

९ **आतां** ( अतः-अता ) या अव्ययाचे पुढील अर्थ होतात. ( १ ) चालू वेळीं. जसें:–' आतां कोठें बारा वाजताहेत. ' ( २ ) लवकरच. जसें:–' तूं पुढें हो, मी आतां येतों. ' ( ३ ) पण, यावर. जसें:- ' आतां तुमचें जर असें म्हणणें असेल इ० ' ( ४ ) बाकीं, एरवीं. जसें:–' आतां मोरोपंताच्या कवितेंत संस्कृत शब्द पुष्कळ आहेत हें खरें. '

१० इ हें संस्कृत अव्यय क्वचित् ज्ञानेश्वरींत आढळतें. चालू मराठींत तें नेहमीं दुसऱ्या शब्दांच्या अन्तीं निवळ पादपूरणार्थ मिसळलेलें आढळतें. जसें:- 'घेउनि, करुनि' इ०

११ **इकडे** ( अत्रकटे-अक्कडे ) या अव्ययाचे पुढीलप्रमाणें उपयोग होतात. ( १ ) या स्थळीं. जसें:—'इकडे तांदूळ महाग आहेत.' ( २ ) कथासंदर्भाच्या एका भागांत. जसें:—'इकडे दशरथ राजा जो निघाला तो वनांत शिरला.' ( ३ ) बहुमानदर्शन. जसें:—'मी जेवायला बसले, तों इकडे ( नवरा )यायला झालें.'

१२ **इश्श** ( ह्रीच्छ ) हें अव्यय फक्त स्त्रियांच्या तोंडीं असून त्याचे उपयोग पुढील अर्थी होतात. ( १ ) लाज. जसें:—'इश्श, लोकांदेखत कां इतक्या जवळ बसायचें !' ( २ ) तिरस्कार. जसें:—'इश्श, लग्नाच्या अगोदरच कां मांडीवर बसतात कुणी !' ( शारदा ). ( ३ ) आश्चर्य, अश्रद्धा, आनंद. जसें:—'इश्श, शंभर तोंडांचा कां आणखी कुणी रावण होता !'

१३ **उ** हें संस्कृत अव्यय रूढ मराठींत आढळत नाहीं. जुन्या मराठींत तें पादपूरणार्थ दुसऱ्या शब्दांच्या अंती मिसळून येई. जसें:-'घेऊनु, करूनु.'

१४ **उद्यां** ( उदये-उदयां ) चे अर्थ दोन होतात. ( १ ) पुढच्या दिवशी. जसें:-उद्यांचें काम आजच करावें.' ( २ ) पुढच्या काळीं. 'आज श्रीमंती, उद्यां गरीबी ' असा नशीबाचा खेळ आहे.

१५ **एरवीं** ( इतरथापि-एरवंइ ) या अव्ययाचे दोन अर्थ आहेत. ( १ ) नाहीं तर, अन्यथा. जसें:-'तुझें कांहीं तरी काम असेल, एरवीं तूं कुठला यायला !' ( २ ) उगीच, सहज. जसें:-'मी एरवींच आलों होतों.' जुन्या मराठींत हें अव्यय 'यऱ्हवीं,' असें आढळतें.

१६ **कटा, कटकटा,** हीं प्राकृत अव्ययें उद्गारवाची असून त्यांवरून दुःख, विषाद, इत्यादींचा बोध होतो. जसें:- 'देवा कटकटा । शेवटीं मजवर हा प्रसंग आणलास ना !'

१७ **कदाचित्** या संस्कृत अव्ययाचा पुढील अर्थांनीं उपयोग होतो. ( १ ) चुकून, एखादे वेळीं. जसें:-'तो कदाचित् अंगावर यायचा.' ( २ ) जर. जसें:- 'मी मुंबईस जाणार नाहीं. कदाचित् गेलों तर तुला पेटी घेऊन येईन.'

१८ **क्वचित्** हेंही संस्कृत अव्यय असून त्याचे पुढील अर्थ होतात. ( १ ) कोठें कोठें. जसें:- क्वचित् कावळ्यांचा रंग फिका आढळतो.' ( २ ) कधीं कधीं. जसें:-' तो क्वचित् माळावर फिरावयास जातो, क्वचित् आंबराईकडे जातो.' (३) विरळा, एखादे वेळीं. जसें:-'मोठे कवि क्वचित् निर्माण होतात.'

१९ **कां** ( किम्-किआं ) या अव्ययाचे पुढील अर्थ आहेत. ( १ ) किंवा. जसें:—' कां रायाचें देह चालूं । रंका परौतें गालूं ' ( ज्ञानेश्वर ). ( २ ) किमर्थ, कशाकरितां. जसें:-'शंभुहि म्हणे न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके । कां हो!' ( मोरोपंत ). ( ३ ) पादपूरण. जसें:—' आलीस कां, बैस. ' ' हरी कां असें म्हणतो, ठीक आहे. '

२० **कीं** ( किम्-किं ) चे अर्थ पुढील आहेत. ( १ ) किंवा. जसें:-'मुलगा होवो कीं मुलगी होवो.' ( २ ) कारण. जसें:—' लोकांत कीं सुगुणवंतचि मान्य होती.' ( ३ ) खरोखर. जसें:-'अरे तो गेला कीं,' ( ४ ) तरी, तथापि. जसें:— ' दर्दुर सापें गिळिजत आहे उभा । कीं तो मासियां वेटाळी जिभा, ' (ज्ञानेश्वर). ( ५ ) तत्काळ, त्याच वेळीं. जसें:-' मी गेलों कीं तो यायला कबूल होईल. ' ( ६ ) येणेंप्रमाणें. जसें:-' विनंति कीं आपण एकवार येऊन भेटून जावें. ' शेवटचा अर्थ मुसलमानी ' के ' या अव्ययावरून आलेला दिसतो.

२१ **काय-काज** ( किम् कें ) चे पुढील अर्थ होतात. ( १ ) किती तरी, फार जसें:-' काय पुरुष चळले बाई ' ( शारदा ). ( २ ) खराब, गलिच्छ रीतीनें. जसें:—' काय रुमाल बांधला आहेस ! ' ( ३ ) अशक्यता. जसें:—' तो काय देतो नी मी काय घेतों ! ' ( ४ ) आदर. जसें:—' तो काल काय गाइला म्हणून सांगूं !' ( ५ ) प्रश्नार्थी पादपूरण. 'एकूण काय, तो येत नाहीं हें तुझें म्हणणें.'

२२ **काल** ( कल्ये-कल्ल ) चा अर्थ ' गेल्या दिवशीं ' असा आहे. जसें:— ' काका कालच गांवाहून आले. ' ' काल ' चा उपयोग ' नुकताच ' अशा मोघम अर्थानेंही करतात. जसें:-' काल जन्माला आलास आणि आज गोष्टी सांगूं लागलास '.

२३ **किमपि** या संस्कृत अव्ययाचा उपयोग पुढील अर्थांनीं करितात. ( १ ) मुळींच. जसें:-' तुला यातलें किमपि समजणार नाहीं. ' ( २ ) एवढेसें, थोडें.

जसें:—'श्रीरामचरित करितें मुक्त सकृत् किमपि सेवितां भावें' (मोरोपंत). (३) विलक्षण, अवर्णनीय. जसें:—'हो अभिनय किमपि गीत अथवा हो.' (मोरोपंत)

२४ **किनी-कनी** (किन्नु-किणी) ही अव्ययें बोलण्यांत पादपूरणासाठीं येतात. जसें.—'बाग्रा आज नदीवर किनई एक बाई आंघोळीला आली होती,' (शारदा).

२५ **कीर, किर, किर, कीरु** (किल-किर) हें अव्यय जुन्या मराठींत (१) खरोखर, व (२) निवळ, केवळ; अशा अर्थांनीं उपयोगांत येतें. जसें:—'तिये जाणिवेचे कीरु सरलें.' प्रजा जे जाली। ते वसतीची कीर आली.' (ज्ञानेश्वर).

२६ **केवळ** (केवलम्) या क्रियाविशेषणाचे पुढील अर्थ आहेत (१) खरोखर, जसें.—'असच केवळ म्हणवत नाहीं' (२) फक्त. जसें:—'तों जो केवळ सर्वकाळ सुतपस्येसी सदा रातला,' (मोरोपत). (३) निखालस अगदीं. जसें:—'त्यांची केवळ गाळण झाली.'

२७ **च, चि, ची** (चित्-चिअ) या अव्ययाचे पुढील अर्थ आहेत. (१) एकट्यानें, फक्त. जसें:—'तोच हें काम करूं जाणे.' (२) स्वतः, खुद्द. जसें:—'तूंच, तूंच तिचे कान फुंकून तिला बिघडवलीस,' (शारदा). (३) खरोखर. जसें:-'अरे हा तर गेलाच.'

२८ **जणुं, जणूं, जणों, जाणों** (जाने) हे अव्यय उत्प्रेक्षा अलंकाराचें गमक मानलें असून त्याचा अर्थ 'जसें काय' असा होतो. जसें:—'ती जणूं चांदणी चमकत होती.'

२९ **जधीं, जेव्हां, जेधवां** (यदा, यावद्वार, जेद्दुहवा-जेधवा) या अव्ययाचा 'ज्यावेळीं' असा अर्थ होतो जसें:- 'जधीं कांहीं नेणे म्हणानि वदले पंडित मला,' (वामन). 'जेव्हां तेव्हां' अशा जोड अव्ययाचा 'प्रत्येक वेळीं' असा अर्थ होतो. जसें:—'तुझी जव्हां तेव्हां एकच तक्रार असते.'

३० **जर** (यर्हि-जर्ही) या अव्ययावरून संकेताचा बोध होतो. जसें:—'जर अभ्यास करशील तर पास होशील.'

३१ **जरी** ( यर्हि जर्न्हीं ) या अव्ययाचा विरोधार्थी उपयोग होतो. जसें:– ‘जरी झाला भाग्यवंत, तरी कां भेटेल भगवंत ! ’ ( तुकाराम ). कवितेंत या अव्ययाचा संकेतार्थीही उपयोग करितात. जसें:– ‘संपन्न मित्र असतें तरि येतें संकटांत कामास ’ ( मोरोपंत ).

३२ **जी** ( आर्य-अज्ज-जय-जी ) या अव्ययाचा थोर मनुष्याला उत्तरादाखल संबोधण्याकडे उपयोग करितात. ‘जी, आलों सरकार.’ क्वचित् आदरार्थी संबोधण्याचे कामींही याचा उपयोग करतात. जसें:—‘उठा जी मायबाप, कशी लागली झोंप !’ ( एकनाथ ),

३३ **जे** ( यत्-ज्ज ) या अव्ययाचा ‘ कीं, येणेंप्रमाणें ’ असा अर्थ होतो. जसें:—‘ सरकारचे चरणीं विनंति अर्ज ऐसा जे ’. ‘ शंभु छत्रपति यांनी राजश्री वासुदेव बाळकृष्ण यांसी आज्ञा केली, ऐसा जे ’( श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें ).

३४ **जेथें** ( यत्र ) या अव्ययाचा ‘ ज्या ठिकाणीं ’ असा स्थलवाचक अर्थ होतो; जसें:-‘तेथ प्रकाशु, सूर्य जेथं ’ ( ज्ञानेश्वर ). क्वचित् हें स्थल लक्षणेनेंही सुचविलें जातें. जसें:—‘मी जेथें हात टेकले तेथें तूं काय करणार !’

३५ **जों, जंव, जोंवर** ( यावत् ) या अव्ययाचे १ ‘ जेव्हां ’ २ ‘ जसा ’ व ३ ‘ जोंपर्यंत; ’ असे अर्थ होतात. जसें:—‘जों कां अर्जुनाचे बाण सुटल तों कौरवांची गाळण उडाली, ’ ‘मी जों पाहतों तों तो उभाच,’ ‘ तोंवरि तोंवरी जंबुक करी गर्जना, जोंवरि पंचानना देखिलें नाहीं ’ ( तुकाराम .)

३६ **झनें, झणीं** ( सनात् ) या अव्ययाचे पुढील अर्थ होतात. (१) निश्चित, खास. जसें:—‘ तंव आदिगुरुशु विस्मितु । म्हणे झनें होये अंतु ’ ( ज्ञानेश्वर ) ( २ ) चुकून, न जाणों. जसें:-‘ मंत्रयंत्रविधानें झनें करां ’ ( ज्ञानेश्वर ). ( ३ ) एकाएकीं, अकस्मात्. ‘ तों केलें बिळ मूषकें अवचितां तो आंत गेला झणीं ’ ( वामन ). ( ४ ) लवकर, सत्वर.

३७ **तथापि** या संस्कृत अव्ययाचा ‘ तरी सुद्धां ’ अशा अर्थी उपयोग करितात. जसें:–‘ मी त्यास निमंत्रण दिलें तथापि तो आला नाहीं. ’

३८ **तंव, तों** ( तावत् ) चे अर्थ येणेंप्रमाणें आहेत ( १ ) तोंपर्यंत. जसें:– ‘ मी पोहोंचतां तों सूर्योदय झाला होता. ’ ( २ ) तेव्हां. जसें.–‘ पहावें तों हा

द्वारांत उभा असतो. ' ( ३ ) खरोखर, प्रत्यक्ष, साक्षात्. जसें ' मी तंव अनाथ अपराधी ' ( नामदेव ).

३९ **तर** ( तावत् ) चे पुढील अर्थ आहेत ( १ ) संकेताची पूर्तता. ' तूं येत असलास तर मी चलतों. ( २ ) सारांश, एकंदरींत, जसें:-' तर मनुष्यानें नीती सोडूं नये असें सिद्ध झालें.' ( ३ ) आपल्याकडून, आपल्या पुरतें. जसें:— ' मी तर सांगून मोकळा झालों, आतां वाटेल तें कर. ' ( ४ ) खरोखर, प्रत्यक्ष. जसें:—' तूं तर विश्वंभर म्हणवितोस !'

४० **तरी** ( तर्हि–तर्‍हीं ) हें जरीचें विरोधार्थी पूरक असून त्याचा ' विरोध ' दाखविण्याकडेच उपयोग होतो. जसें:—' पुष्कळ प्रयत्न केले तरी तें साधलें नाहीं.' कवितेंत व क्वचित् बोलण्यांतही त्याचा ' तर ' च्या अर्थानीं उपयोग होतो. जसें:—' मी तरी तेंच म्हणतों आहें !'

४१ **तेथें** ( तत्र–तत्थ ) ह्या स्थलदर्शक अव्ययाचे पुढील अर्थ होतात. ( १ ) त्या ठिकाणी. जसें:—' तेथें कामधेनूंचीं खिलारं ' ( दासबोध ). ( २ ) अशा स्थितींत. जसें:—' परमेश्वरच कोपला तेथें काय करणार ! ' ' येथें ' व ' तेथें ' अशीं अव्ययें जोडून आली म्हणजे त्यांचा अर्थ ' एक जागीं–दुसऱ्या जागीं ' असा मोघम होतो. जसें:—' येथें मोगरीच्या कुंड्या आहेत तर तेथें गुलाबाचे ताटवे आहेत. '

४२ **न, ना, नो** या संस्कृत अव्ययांचा ' निषेध ' हा अर्थ आहे. जसें:— ' तो आपलें नांव सांगे–ना. ' हें अव्यय दुसऱ्या निषेधार्थक क्रियापदाशीं जोडलें किंवा द्विरुक्त झालें म्हणजे त्याचा भावरूपी अर्थ होतो. जसें:—' तो शहाणा नाहीं असें वाटे–ना. '

४३ **ना** ( नाम–नावं ) या अव्ययावरून ' विनंति ' ' निर्वाळा ' ' खात्री ' इत्यादींचा बोध होतो. जसें:—' तूं चलतोस ना. ' ' मी आलोंना. '

४४ **नहून** या मराठी अव्ययाचा उपयोग ' बाकी, एरवीं ' अशा अर्थानें करितात. जसें:—' नहून तुला टोंचून बोलावें असा माझा हेतु नव्हता. ' जुन्या मराठींत ' वांचून ' या अव्ययाचा उपयोग अशा अर्थानें केलेला आढळतो.'

४५ **नाना** ( नान्यथा–ण अण्ण इ ) या अव्ययाचे पुढील अर्थ होतात. ( १ ) किंवा. जसें:—' नाना घर्नाभूत सुवर्ण, जैसें निहालितां साधारण '

( ज्ञानेश्वर ). ( २ ) अनेक तऱ्हांनीं. जसें:—' एकच आकाश नाना भासतें. ' दुसऱ्या अर्थी ' नाना ' हें अस्सल संस्कृत अव्यय आहे.

४६ **नावा नावा** ( नाम्ना नाम्ना ) चे दोन अर्थ आहेत. ( १ ) वारंवार. जसें:—' तुला नावा नावा तेंच काय सांगायचें ? ' ( २ ) अधिकाधिक. जसें:— ' तुझी अक्कल नावा नावा वाढतच चालली ! '

४७ **पण** ( पुनः—पुणु ) व **परन्तु** यांचे अर्थ पुढीलप्रमाणें आहेत. ( १ ) विरोधात्मक निर्देश. जसें:—'मी सांगितलें पण तो ऐकेना.' ( २ ) सुद्धां, देखील. जसें:—'चल गे, मीही पण येते.' ( ३ ) अगोदर आधीं. जसें:—' तूं पण तेथें गेलास कां ?'

४८ **पां, पैं** ( त्वै—प्पइ ) हीं पादपूरणार्थक अव्ययें आहेत, तरी त्यांना पुढील अर्थच्छटा आहेत. ( १ ) आतां, तर. जसें:—' पैं अमानित्व म्हणिजे । तें इहीं गुणीं जाणिजे ' ( ज्ञानेश्वर ). ( २ ) खरोखर. जसें:—' पद्माचा जो तंतु तो वारणाला । वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला,' ( वामन ). ( ३ ) तरी, तर, जसें:— ' मना सांग पां रावणा काय झालें' ( रामदास ).

४९ **बरें** ( वरम् ) या अव्ययाचा उपयोग पुढील अर्थांनीं करितात. ( १ ) एकाहून दुसऱ्यांचें श्रेष्ठत्व. जसें:—'दारिद्र्याहुनि मरण बरें वाटतें '(मृच्छकटिक). ( २ ) ठीक आहे, तें असो. जसें:—' बरें, आतां आपण आपल्या उद्योगाला लागूं या. ' ( ३ ) आश्वासन. जसें:—' येतों, बरें मुलांनो ! ' ( ४ ) पादपूरण. जसें:—' कां बरें ? तूं कां बोलत नाहींस ?'

५० **भलतिकडे** ( भ्हल् निर्धारणे—भलें+तिकडे ) चा उपयोग पुढील अर्थांनीं होतो. ( १ ) योग्य रस्ता सोडून दुसऱ्याच दिशेला. जसें:—' तें सोडुनी गजेंद्रा आज कुठें चाललास भलतिकडे ?' ( २ ) मोठ्या, स्पृहणीय स्थितींत. जसें:— 'राजा एकीकडे आणि तो भलतीकडे.' (३ ) प्रमाणाबाहेर. जसें:—' तुपाचा भाव भलतीकडेच वाढला आहे. '

५१ **मग, मा** ( माङ् ) या अव्ययाचे पुढील अर्थ होतात. ( १ ) नंतर. जसें — ' मग तो नगराच्या वाटेला लागला. ( २ ) तर. जसें:—' तो येतो आहे, मग तुला येण्यास हरकत काय ?' ( ३ ) अशा स्थितींत, ह्यावर. जसें:—'होय, मी तें पुस्तक घेतलें, मग तुझें काय म्हणणें ?'

५२ **म्हणजे** ( भण्यते ) चे उपयोग पुढील अर्थांनीं होतात. ( १ ) आश्चर्य-दर्शन. जसें:—'म्हणजे, तो खरोखरीच गेला कीं काय !' ( २ ) हा, साक्षात्. जसें:—'तात्या म्हणजे एक नंदीबैल आहे.' ( ३ ) अगदीं, निखालस, खरोखरीच. जसें:—'मी म्हणजे तें कबूल करतों असें नाहीं.'

५३ **म्हणून** ( भणित्वा ) चे पुढील अर्थ होतात. ( १ ) नांवाचा. जसें:—'वातापी म्हणून एक राक्षस होता.' ( २ ) याकरितां, यास्तव. जसें:—'म्हणूनि म्हणतों, पायां पडतों' ( शारदा ). ( ३ ) मुळींच, निक्षून. जसें:—'तुला काय हवें तें कर, मी म्हणून येणार नाहीं.' ( ४ ) असें. जसें:—'तो आजारी आहे म्हणून समजतें.' हे अव्यय 'म्हणूनि–म्हणुनि–म्हणवुनि–म्हणवूनि–म्हणवुनी–म्हणवूनी–म्हणौनि–म्हणुनियां' इत्यादि अनेक प्रकारांनीं लिहिलें जातें.

५४ **मात्र** ( मात्र ) या अव्ययाचे अर्थ येणेंप्रमाणें आहेत. ( १ ) केवळ. जसें:—तो अस्थिपंजर मात्र उरला आहे. ( २ ) तेवढें एकट्यानें. जसें:—'मी मात्र राबत असावें.' ( ३ ) या अटीवर. जसें:—'मात्र तूं रोज व्यायाम केला पाहिजेस.' ( ४ ) पाठोपाठ, तत्काळ. जसें:—'तो आला मात्र, लगेच भडका उडाला.' ( ५ ) इतक्या प्रमाणाचा. जसें:—'संन्याशानें रोज ग्रासमात्र जेवावें.' शेवटच्या अर्थीं हें अव्यय समासांत येतें.

५५ **सांप्रत, संप्रति, सांपें** ( सांप्रतम् ) या क्रियाविशेषणांचा 'हल्लीं चालू काळीं' असा अर्थ होतो. क्वचित् 'पुढें' अशा अर्थानेंही त्यांचा उपयोग करितात. जसें:—'तूं सांप्रत काय करायचें योजिलें आहेस ?'

५६ **हान, आन्, आणि–न्** ( हन्त ) या अव्ययांपैकीं 'हान' जुन्या मराठींत आढळतें. त्याचे अर्थ २५६ कलमाखालीं आठव्या पोट कलमांत दिले आहेत, त्यांशिवाय पुढील होतात. ( १ ) आणि. जसें:—'सुहृद हान सोयरे' ( ज्ञानेश्वर ). ( २ ) कदाचित्, एखादे वेळीं, ( ३ ) मग.

५७ **म्हणे** ( भण ) या अव्ययाचा उपयोग पुढील अर्थांनीं होतो. ( १ ) असें कळतें कीं, जसें:—'तूं म्हणे नाटकांत जाणार आहेस !' ( २ ) तिरस्कार दाखविण्याजोगें बोलतात कीं, जसें:– 'काय म्हणे मी संन्यास घ्यावा.' ( ३ ) आश्चर्याची गोष्ट कळते कीं, जसें:—'त्यानें म्हणे दिवाळें काढलें !'

२५७ मराठींत मुसलमानी भाषांतून आलेलीं 'व, बगर, माफक, बराबर, दाखल ( देखील )' इत्यादि अनेक अव्ययें रूढ आहेत. पण त्यांच्यापैकीं बहुतेक एकार्थकच असल्यामुळें त्यांचा विचार करण्याची विशेष आवश्यकता नाहीं. संस्कृतमधील उद्गारवाचक व संबोधनार्थक अव्ययांपैकीं बहुतेक मराठींत आलीं आहेत. 'जय', 'नमो', 'ओं', 'हे', 'अहो', 'रे', 'अरे', 'अये', इत्यादि कांहीं अव्ययें तशींच आलीं आहेत, कांहीं अपभ्रष्ट होऊन आलीं आहेत. जसें:— 'अंग ( अगा, गा, अगाई, अगई इ० ). हं हो ( हां हो ), रे ( रया ), बत ( बा ), वत्स ( बाप ! ) इ०'

२५८ मराठींत कांहीं शब्दसमुच्चय अव्ययांचीं कार्यें करितात. हे बोलण्यांत विशेष येतात, तरी लिहिण्यांतूनही केव्हां केव्हां आढळतात. त्यांतील कांहीं पुढें दिले आहेत.

( १ ) **नातरि, नतरि, नाहीं तर** ( किंवा, एरवीं ). जसें:—'नतरि करणें तें पाहिजेच केलें' ( शारदा ). 'नाहीं तरी काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं' ( तुकाराम ).

( २ ) **झालेंच तर, तेथून मग, तुमचें देव भलें करो** ( आणि ). 'जसें:—देव, दैत्य–झालेंच तर–यक्ष, गंधर्व–तेथून मग–किंनर, चारण–तुमचें देव भलें करो–सिद्ध, गुह्यक ह्यांपैकीं कोणाच्याही हातून रावणाला मृत्यु नव्हता !

( ३ ) **जेव्हो, जेहेत्ते, ज्या कालाचे ठायीं** {कळलें कां ?} जसें:— 'मग जेहेत्ते अर्जुनानें धनुष्यास बाण लावला.'

( ४ ) **इकडून तिकडून, येऊन जाऊन,** {एकंदरींत, पुन्हां मिळून} जसें:—'इकडून तिकडून तुझे पावणेपांच कायमच आहेत.

( ५ ) **बघतां बघतां, हां हां म्हणतां** {त्वरित, झटकन्} जसें:—'तो बघतां बघतां निघून गेला.'

( ६ ) **असतां असतां, म्हणतां म्हणतां** {एकाएकीं} जसें:—'असतां असतां असे कसे वेडेचार करूं लागलास ?'

( ७ ) **तरीच, तरी म्हटलें** {तर्काप्रमाणें, मला वाटलेंच} जसें:—'तरीच तो आज तेथें दिसत कां नाहीं ?'

(८) **बोलून चालून, सांगून सवरून** {उघड उघड} जसें:—'बोलून चालून मूल तें.'

(९) **कळलें कां, समजलें कां, ऐकिलेंस कां, परिस पां, हूं म्हण, होय म्हण इ०** { इकडे लक्ष्य दे } जसें:—बर्फ करण्याची कृति-ऐकलेंस कां-समजतात तितकी अवघड नाहीं.

(१०) **हें पहा, असें पहा, पाहा पां** इ० { तात्पर्य, उदाहरणार्थ इ० } जसें:—' हें पहा, तो सांगून कांहीं ऐकायचा नाहीं.

(११) **उठल्या बसल्या, येतां जातां, उठतां बसतां** इ० {वारंवार} जसें:—येतां जातां मुलांना मारणें चांगलें नाहीं.

———

## १६ पाठावली.

**तरी म्हटलें वल्लरीनें इतकी थट्टा केली, तरी ही रुसली कशी नाहीं !** ( शारदा

**म्हणजे, तूंही श्रीमंतांना जांबुवंत म्हणतेस कीं काय ?** ( किचा )

**म्हणे तें स्थळ असेंच आहे, म्हणे ती बेगडीच श्रीमंती आहे, तिथें म्हणे मला कां देतां. जसें कांहीं कारटीचें स्वयंवरच चाललें आहे !** ( किचा )

**पण उगीच साप म्हणून दोरखंड झोडपण्यांत काय अर्थ ?** ( फाल्गुनराव )

**बायकांचा जन्म म्हणजे तोंड दाबून बुक्यांचा मार म्हणतात तें अक्षरशः खरें आहे.** ( पण लक्ष्या० )

**हा वाऱ्याशीं भांडणारा मूर्ख पट्याचें कौशल्य दाखविण्याकरितांच माझा प्राण घेईल.** ( गुप्त मंजूष )

**पण तूं ओरडेस तें कळेना, कीं रेडकूं ओरडे तें कळेना, कीं रहाट करकर वाजे तें कळेना.** ( तोत० बंड )

हुजऱ्या जर पंधरा वर्षांनीं खरोखरी जिवंत होऊन आला असें ठरलें-होय म्हण-तर मग त्याचे यजमानसुद्धां जिवंत परत आले असतील, असा संभव दृढ होत नाहीं काय ? (किता)

खाते, जेवते, सर्व यथास्थित चाललें आहे, नी तुला कोणी सांगितलें माझी प्रकृति बिघडली म्हणून ! (सौभद्र)

भीष्मांनीं जे आहे ते दहा बाण सोडले, आणि द्रौपदी शोका-कुल होत्साती महा आक्रोश करती झाली बरें काय, त्या कालाचे ठायीं जे आहेत्तर ! हें यांचें काम ! (शारदा)

हां हां म्हणतां येथें एका भूगोलपत्रकाच्या भरती इतक्या नद्या जमून आपल्या महाराष्ट्राला पंजाबी पविंत्र्यांत[1] उभा करितील ! (एकच प्याला)

काय मेला नवरदेव ! इश्श ! त्याचें लगीन झालें पण बाई त्या पोरीचें पाप उभें राहिलें. (शारदा)

येऊन जाऊन काय तो कामाचाच डौल ना ? तूं बैस कशी आतां स्वस्थ ! (किता)

पण कोशकारांची अवस्था काय ? ते नेमकेच पूर्व स्थितीशीं येऊन भिडले ! म्हणजे बाबूके भाई दरवेशी ही अवस्था कांहीं चुकली नाहीं ! (निबंधमाला)

---

नामर्मत्रें हरि निजदासां पावे । पेकोनिया[2] धावे झडकरी ॥
सुदर्शन करीं पावे लवकरी । पांडवा सहाकारी श्रीकृष्ण रायां ॥
निजानंद दावी उघड पैं वैकुंठ । नामेंचि प्रकट आम्हांलागीं ॥
मुक्ताई जीवनमुक्त हा संसार । हरि परावार[3] केला आम्ही ॥ १ ॥
(मुक्ताबाई)

---

१ पंजाब प्रांतांच्या उभें राहण्याच्या डौलांत. २ अगा, बा. ३ मर्यादा, समुद्र.

सदय हृदय याचें भूप हा तापहारी।
म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी[४] ॥
मजहि वध कराया पातकी पातला जो।
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ॥ १ ॥ ( रघु. पं. )

पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें हा।
रात्रीं विकास कुमुदांप्रति चंद्र दे हा।
न प्रार्थितां जलद दे जल या जनाला।
मुक्तार्थ[५] कीं परहितोत्सव सज्जनाला ॥ १ ॥ ( वामन )

बरें तें या लोकीं महिवरि कडेलोट करणें।
महासर्पाच्या कीं वदनिं तरि हा हात धरणें ॥
उडी कीं वन्हींत त्वरित तरि घालूनि मरणें।
जळो तें कीं लोकीं त्यजुनि निज सच्छील फिरणें ॥ १ ॥ ( कित्ता )

अंतरीं धरुनि पूर्ण निरीक्षा[६]। पाहतोसि निज-भृत्य-परीक्षा ॥
अन्यथा स्वजनभावचि नाशी। कां वदे करुण या वचनासी ॥ २ ॥
( कित्ता )

झटिति भटकटंक[८] बहु करि कन्या नेली म्हणोनि बोभाट ॥
जो जो वळांसि[९][१०] सांगे वाटे त्या दस्युंचाचि[११] तो भाट ॥ १ ॥ ( मोरोपंत )
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करां।
तरि वरि तसाचि आंताहि उगाळितां कोळसा प्रयास करां ॥ २ ॥
( कित्ता )

होय पुढेंचि, न मागें, पार्थ शराहतांहि[१२] शतमखसख[१३] सरे ॥
मुनि म्हणाति अर्जुनीं तव शक्ति जशी सागरांत खसखस रे ॥ ३ ॥
( कित्ता )

---

४ विहारी होय म्हणजे क्रीडा करणारा झालों, खेळायला आलों. ५ निःस्वार्थी, निरपेक्ष. ६ जिज्ञासा, पाहण्याची इच्छा. ७ आपल्या भक्ताची श्रद्धा नाहींशी करणारें हें भाषण कां बोलल ? ८ तावडतोब. ९ वीरांचें सैन्य. १० बळरामाला. ११ भामट्याचा ( अर्जुनाचा ). १२ बाणानें ताडिला असूनहि. १३ इंद्राचा इष्ट ( मुलगा ).

झणीं उष्ण लागे सख्या केशवातें । म्हणूनी त्वरें येउनी लेशवातें ॥
मुकुंदावरी मेघ तो छत्र झाला । करी स्वात्म[१४]-देहार्पण श्रीअजाला॥१॥
(वामन)

न जें प्रिय सदोष तें, प्रिय सदोषही चांगलें ।
स्वतोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें ।
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ! ।
जरी मळाविसी रजो-मलि[१५]न-काय तूं अंबरें ॥ १ ॥ (मोरोपंत)

---

नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न, उ[१६]दंड आडनावांचीं ॥
न बुडविति नवा तारिति चित्रें बरवींहि आडनां[१७]वांचीं ॥१॥ (मोरोपंत)

वांचूनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धव[१८]त ।
कर्महीना निश्चित । होइजेना ॥ १ ॥ (ज्ञानेश्वर)

तवं श्रोते म्हणाति देव* ! । कैसी बोलाची हवां[१९]वं ।
काइ नादातें हान वे[२०]रिवं । जीणौनि[२१] आले ॥ २ ॥ (कित्ता)

हां हो ! नवल नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरि ऐसी ।
[२२]वोणें उमटत आहे मां आकाशीं । साहित्या रंगाचें ॥ ३ ॥ (ज्ञानेश्वर)

आणि प्रजा जे जाली । ते वसतीची कीर आली ।
कां गो[२३]रुवें बैसलीं । रुंखातळिं ॥ ४ ॥ (कित्ता)

येऱ्हावि इंद्रियांचिया आं[२४]र्ता । सरिसा विखो वोपितां ।
संतोखु किर चित्ता । आपजैल ॥ ५ ॥

नातरि सकळ धर्माचें माह्येर । सज्जनाचें जिव्हार ।
लावण्य-रत्नभांडार । शारदेचें ॥ ६ ॥

---

१४ आपल्या प्राणाचें व देहाचें दान. १५ धुळीनें मळला आहे देह ज्याचा असा. १६ मुबलक १७ विहीर व नांवा यांचीं. १८ सिद्धाप्रमाणें. 'संशयरहित जें ज्ञान । तेंचि साधूचें लक्षण । सिद्धाअंगीं संशय हीन । लागेल कैचा'–दासबोध. *काय (आमचें भाग्य!) १९ शोभा, सौंदर्य. २० गोडी. तुमच्या भाषेचें सौंदर्य नादाच्या गोडीहून अधिक आहे, असा भाव. २१ जिंकून. २२ साहित्याच्या रंगाचें आकाशांत जणुं घबाच उमटत आहे! २३ पशु. २४ इंद्रियाच्या मागणीबरहुकूम त्यांना विषयाचा पुरवठा केल्यास.

आतां भारत-कमल-परागु । गीताख्यु प्रसंगु ।
जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेंसी ॥ ७ ॥ ( कित्ता )

आतां शांतरसाचें[25] भरितें । सांडित आहे पात्रातें ।
जे बोलणें बोलापरौतें । बोलवलें ॥ ८ ॥ ( कित्ता )

योगादिकें साधनें । साकांक्षें[26] आराधनें ।
मंत्रयंत्रें[27]-विधानें । झनें करा ॥ ९ ॥ ( कित्ता )

बहुत करूनि निःशब्द । दाट न रिगे स्वापद ।
शुक[28] हान षट्पद । तेयांचें नाहीं ॥ १० ॥ ( कित्ता )

कां औषधाचां कडवटपणीं । जैसी अमृताची पुरवणी ।
ते आहाेच[29] न दिसे परिखुणीं । प्रकट होये ॥ ११ ॥ ( कित्ता )

आतां केती नावांनावां मूज । म्हणतां कौनडें[30] हान आवडेल तूज ।
तरि सांघेन ज्ञान सहज । विज्ञानेंसी ॥ १२ ॥ ( कित्ता )

तैसें अनादिपण नोमोडे[31] । माजि आक्रियत्व न खांडे ।
परि करिता भोक्ता आवडे[32] । ते जाण गा भ्रान्त ॥ १३ ॥ ( कित्ता )

---

२५ शांतरसाचा पुर २६ कामनायुक्त. २७ मंत्र, गूढ कोष्टकें वगैरेंची । स्थापना. २८ पोपट अन् भुंगा यांच्याबद्दल आमचें म्हणणें नाहीं, २९ उघड. ३० तुला गूढ वाटेल. ३१ मोडत नाहीं. ३२ वाटे. परमेश्वराचें अनादिपण मोडत नाहीं, आक्रियत्वही भंग पावत नाहीं, अर्थात तो कर्ता, भोक्ता आहेसा वाटतो ती भ्रांति आहे.

# सतरावा पाठ.

## समास.

२५९ वाक्याच्या घटनेस लागणाऱ्या सोयींमध्यें 'समास' ही एक मोठी सोय आहे. 'समास' च्या धात्वर्थाप्रमाणें त्या शब्दाचा अर्थ 'शिस्तीनें ठेवणें' असा होतो. अर्थात् वेगवेगळ्या रूपांनीं स्वतंत्र वावरणाऱ्या दोन किंवा अधिक शब्दांना एकाच रूपांत शिस्तीनें बसविणें म्हणजे समास होय. व्यवहारांत देखील सोयीकरितां आपण समासांचा उपयोग करीत असतों. भाकरी करून झाल्यावर त्यांची चवड लावणें आणि इतस्तता विखुरलेल्या भांड्यांची उतरंड लावणें ही समासाचीच कल्पना आहे. अर्थात् समासामध्यें मुख्यतः संक्षेप हीच सोईची बाब पाहिलेली आहे. क्वचित् समासाचा उपयोग विस्तार व सौंदर्य यांसाठींही होतो.

२६० मराठींत द्वंद्व, तत्पुरुष, बहुव्रीहि व अव्ययीभाव असे चार समास आहेत. इंग्रजी व्याकरणांत समासांविषयीं स्वतंत्र विवरण केलेलें आढळत नाहीं व त्या भाषेंत प्रत्ययादिकांच्या टंचाईमुळें समासघटनेला वावही नाहीं हें खरें, पण समासाच्या सोईकडे धांव घेण्याची त्या भाषेची अनेकदां प्रवृत्ति दिसून येते. 'Fore-head,' 'Further-more,' 'Black-winged' इ० कर्मधारय समासांचीं; 'cow-herd,' 'Pot-boy,' 'Horse-whip' इ० तत्पुरुष समासांचीं; व 'All-day-long,' 'Al-together,' 'Atlast,' 'A-foot' इ० अव्ययीभाव समासांचीं उदाहरणें तर त्या भाषेंत सांपडतातच, पण क्वचित् याच्याही पलीकडे धांव मारून 'A hail-fellow-well-met (appearance) अशा प्रकारचा बहुव्रीहींचाही प्रयत्न तिनें केलेला आढळतो. संस्कृत भाषा प्रत्ययांनी व इतर सर्व साधनांनीं पूर्ण संपन्न असल्यामुळें तिच्यामध्यें समासाला भरपूर वाव आहे व तिजमध्यें नानाप्रकारचे समास केलेले आहेत. मराठीनें हे बहुतेक सर्व प्रकार उचलले आहेत. हे समासांचे प्रकार अनेक असले तरी त्यांचें स्थूल दृष्टीनें वर सांगितल्याप्रमाणें चार जातींत वर्गीकरण होतें. आतां त्यांचा क्रमानें विचार करूं.

२६१ "दोन अथवा अधिक शब्दांमधले अन्वय दाखविणारे शब्द, विराम, इतर खुणा, प्रत्यय वगैरे गाळून त्यांचा एक शब्द बनविणें म्हणजे 'समास करणें' व ते शब्द फोडून पुन्हा होते तसे मांडणें म्हणजे समासाचा 'विग्रह करणें' होय." जसें:—'राम आणि लक्ष्मण' या दोघांमधील 'आणि' हें अव्यय काढून 'रामलक्ष्मण' असा शब्द बनविला म्हणजे समास होतो, व पुन्हा 'राम आणि लक्ष्मण' असें फोडून म्हटलें म्हणजे विग्रह होतो. 'काळें असें मांजर तें' हा विग्रह व 'काळ-मांजर' हा समास. 'लांब आहेत शिंगें जिचीं' हा विग्रह व 'लांबशिंगी' हा समास आहे. समास तयार झाल्यावर तो एकच शब्द समजला जातो व त्यांतील शेवटल्या शब्दाला विभक्त्यादि कार्यें होतात.

२६२ **द्वंद्वसमास.** बरोबरीच्या नात्याचे किंवा दर्जाचे, आणि 'आणि,' 'व,' 'अथवा' यांपैकीं कोणत्याही अव्ययानें जोडलेल्या शब्दांचा समास केला म्हणजे त्यास द्वंद्वसमास म्हणतात. जसें:—'भीम आणि अर्जुन आणि नकुल' ते 'भीमार्जुननकुल,' 'तीन किंवा चार' ते 'तीनचार;' 'खरें किंवा खोटें' तें 'खरेंखोटें' इ०

( क ) द्वंद्वसमासांत शब्दांचा समुच्चय असल्यास सामासिक शब्द बहुवचनी होतो. शेवटच्या शब्दाचें जें लिंग तेंच बहुधा समासाचें होतें, आणि समासाचा क्रियापदाशीं किंवा इतर शब्दांशीं अन्वय करितांना पूर्वी अन्वय प्रकरणांत दिलेले नियम लागतात. जसें:—'रामलक्ष्मण आले.' 'भीमद्रौपदी बोलत बसलीं होतीं. 'जॉनसनचीं आईबापें लहानपणींच निवर्तलीं.

( ख ) द्वंद्वसमासावरून केव्हां केव्हां नुसत्या समासाच्या घटक शब्दांचाच बोध न होतां तदंतर्गत किंवा तत्सदृश इतर पदांचाही बोध होतो, तेव्हां त्या समासास समाहारद्वंद्व म्हणतात. जसें:—'भाजीपाला,' 'शेटसावकार,' 'दगडबिगड,' 'हातपाय.' 'घरदार,' 'पानपत्रावळ,' 'दिवाणदरबार,' 'कोळीमाळी,' 'पोरसोर,' मीठमिरची' इ०.

( ग ) एकाच जातीच्या किंवा धर्माच्या दोन निकटसंबंधी शब्दांचा एकाच शब्दांत समावेश करून समासाला त्यांतील एका शब्दाचें रूप देतात व दुसरा शब्द गाळून तरी टाकतात किंवा त्याचा अतिसूक्ष्म संक्षेप तरी करितात. अशा

समासास 'एकशेष द्वंद्व' म्हणतात. जसें:—'जाया व पती'–दंपती, 'बहिणी व भाऊ'–भावंडें, 'नाती व नातू '–नातवंडें इ०.

( घ ) द्वंद्वसमास बनवितांना पुढील गोष्टी अवश्य ध्यानांत ठेवाव्या. ( १ ) वर्ण, जात, वयाचा अनुक्रम, व्यक्तीचा मोठेपणा वगैरे बाबी क्रमानें लावून समास करावा. ( २ ) स्नेहवाचक शब्दांत विशेष ममतेचा शब्द प्रथम ठेवावा. ( ३ ) भिन्नलिंगी शब्द जोडतांना प्रथम पुल्लिंग, व स्त्रीलिंग व मग नपुसकलिंग असा क्रम ठेवावा. तथापि या शिस्ती नेहमीं पाळतातच असें नाहीं.

**२६३ तत्पुरुषसमास** भिन्न दर्जाच्या दोन शब्दांच्या समासाला ' तत्पुरुष ' असें म्हणतात. तत्पुरुषाच्या घटकांत जेव्हां एक शब्द विशेषण व दुसरा नाम असतो किंवा क्वचित् विशेषण असतो, किंवा एक शब्द दुसऱ्या शब्दास उपमेदाखल आलेला असतो तेव्हां त्या समासास 'कर्मधारय' तत्पुरुष असें म्हणतात. जसें:–'तांबडमाती,' 'चोरघडी,' 'काळ-मांजर,' 'काळसावळा,' 'मुखकमल, ' राजहंस' इ०.

( क ) अशा समासांत केव्हां केव्हां नाम प्रथम व विशेषण मागाहून ठेवतात. जसें 'वंचक' म्हणजे लबाड असा जो छात्र म्हणजे शिष्य, तो 'छात्रवंचक'.

( ख ) नात्याचे वाचक शब्द विशेषणादाखल येऊन मराठींत अनेक कर्मधारय समास होतात. जसें:–'भाचाची बायको म्हणून सून ती '–भाचेसून. 'आजे-सासू,' ' मामेसासरा ' इ०.

( ग ) कर्मधारय समासांत ' अंतर ' हा शब्द केव्हां केव्हां ' दुसरा ' किंव 'भिन्न' अशा अर्थानें घालून समास करतात, त्यावेळीं तो शब्द समासाचे अखेरीस ठेवतात. जसें:—' दुसरी भाषा ' भाषांतर. त्याचप्रमाणें ' देशांतर, वस्त्रांतर, वेषांतर ' इ०.

( घ ) कर्मधारय समासाचें पहिलें पद संख्याविशेषण व एकंदर समास समुच्चयार्थी असला म्हणजे त्यास ' द्विगु ' म्हणतात. जसें:—' तीन भुवनांचा समुदाय तें त्रिभुवन. ' ' पांच पदांचा समुदाय ती पंचपदी.' 'पांच शेरांचा समुदाय ती पासरी. ' त्याचप्रमाणें ' बारभाई, ' पंचपाळें, सप्तपदी ' इ.

**२६४** तत्पुरुषाचे दोन घटक जेव्हां प्रथमेखेरीज व संबोधनाखेरीज दुसऱ्या

विभक्तीनें जोडलेले असतात तेव्हां त्या विभक्तीचा लोप करून बनविलेल्या समासास 'विभक्ति तत्पुरुष' असें म्हणतात. जसें:—

१ द्वितीया तत्पुरुषः—कृष्णाश्रित, मारखाऊ, लाळघोट्या इ॰.

२ तृतीया तत्पुरुषः—कृपावलोकन, तोंडपाठ, गजभोजणी, उपासमार, घोडेमात, वस्त्रगाळ इ०.

३ चतुर्थी तत्पुरुषः—गायरान, पोळपाट, बाजारवाडा, काकबलि, डोईजड.

४ पंचमी तत्पुरुषः—चोरभय, स्वर्गपतन, पापमोचन, भवतारण इ०.

५ षष्ठी तत्पुरुषः—राजवाडा, केळफूल, पिंपळपान, देवपूजा इ०.

६ सप्तमी तत्पुरुषः—रानमांजर, स्वर्गवास, पाणबुड्या, शास्त्रकुशल, घरकोंबडा इ०.

२६५ एखादे वेळीं विभक्तीचें रूप कायम ठेवून समास करितात तेव्हां त्याला 'अलुक् समास' असें म्हणतात. जसें:—युधि म्हणजे युद्धांत जो स्थिर तो युधिष्ठिर.' त्याचप्रमाणें 'खेचर, वाचस्पति, दिवस्पति, पंकेरुह, धनंजय, कर्तरिप्रयोग इ०.

( क ) मराठी अलुक् समासांत विभक्ति प्रत्यय न राहतां नुसतें सामान्यरूप राहतें. जसें:–' पिशाच्चा-हातीं कोलीत, ' ' भित्यापाठीं ब्रह्मराक्षस ' इ०

२६६ तत्पुरुष समासाचें उत्तरपद धातुसाधित असलें म्हणजे त्यास ' उपपद तत्पुरुष ' असें म्हणतात. जसें:--' गृहस्थ, अनुग, भूप, शेषशायी, धरणीधर, आपलाल्या, ऐतखाऊ ' इ०.

( क ) तत्पुरुषाचा मुख्य घटक प्रथम ठेवून विभक्तिदर्शक शब्द केव्हां पुढें येतो. जसें:-हंसांचा राजा तो ' राजहंस. ' रात्रीचें अर्ध तें ' अर्धरात्र. ' कायाचें म्हणजे शरीराचें पूर्व तें 'पूर्वकाय.' 'अहन् म्हणजे दिवस, त्याचें मध्य तें 'मध्यान्ह' इ.

२६७ सर्वनामांच्या विभक्ति गाळून तत्पुरुष समास करावयाचा असतांना त्यांची रूपें अशीं होतातः—

| | | |
|---|---|---|
| अहम् ( मी ) | मत् | मद्द्वार, मत्कर्म, मन्मन, मत्सखा इ०. |
| वयम् ( आम्ही ) | अस्मत् | अस्मदपराध, अस्मत्कार्य, अस्मद्देश, इ. |
| त्वम् ( तूं ) | त्वत् | त्वत्कीर्ति, त्वदाज्ञा, त्वद्धाम इ. |

| | | | |
|---|---|---|---|
| यूयम् ( तुम्ही ) | | युष्मत् | युष्मन्नाम, युष्मदादेश, युष्मल्लीला इ. |
| अयम्<br>एतत् | हा | एतत् | एतद्गृह, एतन्मन, एतद्देशीय, एतत्कर्म–प्रधान इ० |
| अदस्<br>तत् | तो | तत् | तद्ग्राम, तज्जन, तन्मय किंवा तद्मय इ. |
| भवान् (आपण) | | भवत् | भवद्भुवन, भवत्प्रेम, भवद्देह इ० |

( क ) 'आपला' अशा अर्थाचें विशेषण प्रथम घालून समास कर्तव्य असल्यास ' स्व, ' ' निज ' ' आत्म ' इ. शब्दांचा उपयोग करतात. जसें:–' निजसुख, निजरूप, स्वार्पण, आत्मरूप, आत्मज्ञान ' इ.

( ख ) अशा अर्थाच्या मराठी समासांत ' आप ' असें रूप येतें. जसें:— ' आपस्वार्थ, आपमतलब, आपसुख ' इ०.

**२६८** तत्पुरुष समासाचें प्रथम पद नकारदर्शक असलें म्हणजे त्यास ' **नञ्तत्पुरुष** ' असें म्हणतात. असा समास करतांना नकारदर्शक शब्द ' अ ' हें अव्यय घालण्याची चाल आहे. पुढील घटकाच्या आरंभीं जर स्वर, असेल तर ' अ ' बद्दल ' अन् ' येतो. जसें:—' अभाव, अनिष्ट, अधर्म अनपेक्षित ' इ०.

( क ) क्वचित् नकार 'न' नेंही दाखविला जातो. जसें:—'नकारघंटा. '

**२६९** संस्कृत व्याकरणांत नञाचे ' तत्सादृश्यमभावश्च तदन्यत्वं तदल्पता । अप्राशस्त्यं विरोधश्च नञर्थाः षट्प्रकीर्तिताः ' असे सहा अर्थ सांगितले असून त्यांतील समासांत जो अर्थ अपेक्षित असेल त्या मानानें समासाचा विग्रह होतो. जसें:—

| नञ | समास | विग्रह. |
|---|---|---|
| १ तत्सादृश्य (एकाद्या वस्तूशीं सारखेपणा. परंतु प्रत्यक्ष ती वस्तू नसणें. ) | अब्राह्मण (ब्राह्मणासारखा दिसणारा पण ब्राह्मण नव्हे असा) | सदृश, पण प्रत्यक्ष नव्हे असा ब्राह्मण तो ' अब्राह्मण ' |
| २ अभाव ( नसणें ) | अब्राह्मण | अविद्यमान असा ब्राह्मण तो |
| ३ तदन्यत्व ( एकाद्या वस्तूहून वेगळेपणा ) | अब्राह्मण | ब्राह्मणाहून अन्य तो ' अब्राह्मण ' |

| | | |
|---|---|---|
| ४ तद्ल्पता (एकाद्या वस्तूची टंचाई, विरळपणा) | अब्राह्मण | अल्पगुण असा ब्राह्मण तो 'अब्राह्मण' |
| ५ अप्राशस्त्य (एकाद्या वस्तूचा धर्म. पण तो वाईट असणें.) | अब्राह्मण | अप्रशस्त असा ब्राह्मण तो 'अब्राह्मण' |
| ६ विरोध ( उलट धर्म ) | अब्राह्मण | ब्राह्मण विरोधी धर्माचा तो 'अब्राह्मण' श्वपच, चंडाल इ० |

२७० जेव्हां एक अव्यय व एक नाम यांचा समास होऊन एकंदर समासाला अव्ययाचा अर्थ येतो तेव्हां त्यास 'अव्ययीभाव' असें म्हणतात. जसें:— 'दररोज, हरदम, आमरण, अनुरूप, यथाशक्ति, बिनधोक' इ०. असल्या समासांचा विग्रह अर्थाच्या मानानें अव्ययार्थी करावा. जसें:–' शक्तीला झेपेल अशा बेतानें तें ' यथाशक्ति. ' धोका टाळून ' बिनधोक. ' मरणापर्यंत ' तें आमरण. ' दर म्हणजे प्रत्येक दिवशीं ' तें दररोज इ.

२७१ समासांत मुळींच अव्यय नसूनही जर समासाला अव्ययाचा अर्थ येत असेल तर तो अव्ययीभाव समासच होतो. जसें:–'गांवोगांव,' 'दारोदार' इ.

२७२ संख्यावाचक शब्दांचे समास अर्थावरून ठरवावे. जसें:–' बे आणि वीस ' बेवीस किंवा बावीस (द्वंद्व). ' एकानें उणा वीस ' एकोणीस ( कर्मधारय ). ' दुबार आहे पटज्याची तो ' दुप्पट ( बहुव्रीहि ). ' चोहोंची दुप्पट ' ( तत्पुरुष ). पण 'अ' हा 'ब' च्या दुप्पट काम करतो ( बहुव्रीहि ).

---

## १७ पाठावली.

भिऊं नका, मी एक पांथस्थ ब्रह्मचारी आहें. (शारदा १–१)

अनुरूपवरप्राप्तिरस्तु[1] ! शारदे, तूं अगदीं भिऊं नकोस.(किचा१–१)

केवळ कविकल्पनाधार जी देवादिकांची मानवी कृति, तिचा गूढार्थ मनांत न आणतां, ती आधारभूत धरून तदनुसार मनुष्यांनीं वागणें म्हणजे केवढा मूर्खपणा ! ( किचा २–५.

१ योग्य पतीची जोड.

तुझी मूळची आरक्तगौर[2] कांति या निर्जीव चांदण्याप्रमाणें फिकट झालेली आहे. ( प्रेमसंन्यास )

उठा, या अमृतेश्वराची शपथ घेऊन सांगतें कीं यावज्जन्म ही गोष्ट मी कोणाजवळ बोलणार नाहीं. ( कित्ता )

हा मूर्खा भरत-कुलाधमा[3] ! धनंजय वीरास द्यायची असें म्हणायचें सोडून त्या अंधपुत्रांचें[4] नांव घेण्यास तुला शंका कशी रे नाहीं आली ? ( सौभद्र )

दुसरी आपल्या मृत पतीला अहर्निश डोळ्यांपुढें ठेवून त्याच्या स्मृतिसमागमांत सुख मानणारी देवता ! ( तोत० बंड )

मला कपटजाळ्यांत पकडलें ! माझ्या वर्मावर दैवानें बिनचूक घाव घातला ! ( कित्ता )

ही हाकाटी सद्यःप्रसूत[5] अर्भकाच्या[6] प्राथमिक रोदनाप्रमाणें शुभावहच होय ! ( निबंधमाला )

---

तुका म्हणे मुक्ति पर्णिली[7] नोवरी । आतां दिवस चारी खेळी मेळी ॥
( तुकाराम )

कामक्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ ( कित्ता )

तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनी श्री-मुख दावीं देवा ॥
( कित्ता )

तुका म्हणे काय होईल स्वहित । निधान जो थितें टाकूं पाहे ॥
( कित्ता )

जाति-हीन चोखामेळा । त्याला भक्तीचा कळवळा ॥ ( जनाबाई )

जो नित्य नाचवी सुर-नरासी । ज्या भेणें तप सोडिलें तापसी ।
त्या अभय देऊनि कामक्रोधांसी । आपणापासीं राहविलें ॥ १ ॥
( एकनाथ )

---

२ अमळ लाल आणि गोरी. ३ नटांच्या कुलांतील नीचा. ४ दुर्योधनाचें. ५ नुकत्याच जन्मलेल्या. ६ बरिली. ७ असलेलें.

ऐसा गणेश मंगलमूर्ति । तो म्यां स्तविला यथामति ।
वांछा धरूनियां चित्तीं । परमार्थाची ॥ १ ॥ (दासबोध)

निर्मलत्वामुळें पाप-तापांहरी । शांतिमत्त्वामुळें मानसा आवरी ॥
ईशभक्तीविना छंद नेदी दुजा ॥ आवडे सज्जना रामपारा तुझा ॥ १ ॥
(गृहविहार)

करुनि सडा-संमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं ॥
यमुना-जळास जाति मुकुंदा दध्योदन भक्षीं ॥ १ ॥ (होनाजी बाळ)

हे वामनैक-पद भूमि, नसोनी जंघी[11] ॥
एके दिशींच दिनराज नभास लंघी ॥
वारांशि[12] वानर-विलंघित होय तो कीं ॥
लोकीं नसे नलयशस्तुलना विलोकीं ॥ १ ॥ (रघु० पं.)

पणतोंडें[13] भक्षितो पणजा । मूल बापास मारी वोजा[14] ।
चुकाऱ्या[15] गेला राजा । चौघा जणांचा ॥ १ ॥ (दासबोध)

कपटादरें वळो पर[16], पर, परमेश्वर कसा वळेल हरी ।
कृष्ण-कृपामृत-निधिची अकपर्टे[17]-विनतांकडे वळे लहरी ॥ १ ॥
(मोरोपंत)

गाई गृहासि आल्या, मावळला रविहि, कच न आढळला ॥
तेव्हां सोडुनि धृति-नग[19] शुक्र-सुता[20]-बुद्धि-भूमिला ढळला ॥ २ ॥
(मोरोपंत)

करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ[21]-सिंह-देव-दानव-से ।
मानव-से गमले न, स्नेह-कणाहि तन्मनीं तदा न वसे ॥३॥ (कित्ता)

---

८ सूर्योदयापासून तीन प्रहर ९ दहीभात. १० वामनाचें एक पाऊलभर. ११ वेगवान्. १२ समुद्र. १३ पृथ्वी-आप-तेज-वायु-आकाश या वंशावळींत वायु १४ सहज. १५ मन, बुद्धि, अहंकार व चित्त यांचा राजा आत्मा. त्याला कोणी विचारित नाहीं. १६ दुसरा कोणी. १७ कृष्णरूपी कृपामृत समुद्राची. १८ सरळ मनानें शरण आलेल्यांकडे. १९ धैर्यरूपी पर्वत. २० देवयानीच्या बुद्धिरूपी बैठकीला. २१ शरभसिंह (द्वंद्व), देवदानव (द्वंद्व) शरभसिंह किंवा देवदानव (वैकल्पिक द्वंद्व). शरभ हा एक अर्धा गरुडाकावर व अर्ध सिंहाकार अष्टपाद प्राणी आहे.

तुरावि करुनि परं[22]-कवचा अंगप[23] तितउ[24] पलसमय[25] मानिं भानें ॥
भीमानें शर गणिले अंगपतित[26] उपलसम यमनिभानें[27] ॥ १ ॥
( मोरोपंत )

झालीं युद्धें शतशा सर्व-प्रेक्षक-मनोहरें स-रसें ( कित्ता )
होय रणांगण रक्तोत्पलें[28]-वन-चित-पद्मराग-भू-सर-सें ॥ २ ॥
स्वर्वल्लि-सुरभि-सुर[29]-सरिदधिकाश्रित-सर्व-कामदा साची ॥
श्रीरामाची जैसी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥ ३ ॥ ( कित्ता )

सकल-भुवन-ललामायमाना[30] ॥
मानाधिकें[31]-विभव-धनिक-सदन-शत-विराजमाना ॥
कलश-जनितें[32]-मुनि-चकित-जलधि-शरणातिविस्तृत-परिखांतरी-पायमाना ( रघु० पं० )

राजहंसाचें चालणें । भूतलिं जालिया सिहाणें[33] ।
तरि आणिकिं काइ कोणें । चालावें चिना ? ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

जेयाचेनि विवेक-किरण-संगे । उन्मेखें[34]-सूर्यकांत-स्फुलिंगें ।
दीपलें जालीति[35] दांगे ॥ संसाराचीं ॥ २ ॥ ( कित्ता )

नमो विशद-बोधें[36]-विदग्धा । वियारविंद-प्रबोधा[37] ।
परा-परम-प्रमदा[38] । विलासिया ॥ ३ ॥ ( कित्ता )

नमो संसार-तम-सूर्या । अप्रमिता[39] परमवीर्या ।
तरुण-तम[40]-तूर्या-। लालन-लीला ॥ ४ ॥ ( कित्ता )

---

२२ शत्रूच्या कवचाला. २३ अंगाधिपति कर्ण. २४ चाळण. २५ क्षणभर. २६ अंगावर पडलेल्या. २७ यमासारख्यानें. २८ तांबड्या कमलवनांत सांचलेल्या कमळांच्या रंगाला आधारभूत सरोवराप्रमाणें. २९ कल्पवृक्ष, कामधेनु, गंगा, यांहून शरणागतांच्या सर्व इच्छा अधिक पुरविणारी. ३० सगळ्या पृथ्वीला शिरोभूषण होणारी. ३१ अमितधनवान् श्रीमंतांच्या शेंकडों घरांनीं शोभणारी. ३२ घटापासून उत्पन्न झालेल्या अगस्त्यऋषीला भ्यालेल्या समुद्रांचें रक्षण करणाऱ्या खंदकांच्या आंत बेटाप्रमाणें असणारी. ३३ शहाणें, सुंदर ३४ ज्ञानरूपी सूर्यकांत मण्याच्या ठिणग्या. ३५ झांकचा, वनें. ३६ स्पष्ट ज्ञानानें संपन्न भासणाऱ्या. ३७ विद्यारूपी कमळाला उमलविणाऱ्या. ३८ परावाणीरूपी श्रेष्ठ स्त्रीशीं विलास करणाऱ्या. ३९ अनंता. ४० अत्यंत तरुण अशी जी तुरीयावस्था तिचें रंजन करण्यांत रमणाऱ्या.

परि तो रसातितशयो मुकुंलिं[41] । मग ग्रंथार्थु-दीप उजालिं ।
करी साधु-हृदय-राउलीं । मंगल़ उखा ॥ ५ ॥ ( कित्ता )

बहु लाजवीत होतों करि-केसरि[42]-कीर-केकि-हारिणां मी ।
हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥ १ ॥ ( मोरोपंत )

---

४१ आवरून घे, रसाची बहार आवरून घे, व ग्रंथाचा अर्थदीप पाजळ ( अर्थ सांग ) व तेणें करून संतांच्या हृदयमंदिरांत मंगलाची पहाट उत्पन्न कर. ४२ हत्ती, सिंह, पोपट, मोर, व हरिण यांस. सीतेच्या मांड्या हत्तीच्या सोंडेहून, कमर सिंहाच्या कमरेहून, आवाज पोपटाहून, केशकलाप मोराच्या पिसाऱ्याहून व डोळे हरिणाहून श्रेष्ठ म्हणून मी त्या मंडळीस हिणवीत होतों असा रामाचा आशय.

# अठरावा पाठ.

## बहुव्रीहि समास.

२७३ सर्व समासांत संक्षेप, विस्तार, व्यंजकता वगैरे सोयींच्या दृष्टीनें बहुव्रीहि समास अत्यंत महत्त्वाचा आहे. इतर समासांप्रमाणें हा समास विभक्तींनीं जोडलेल्या दोन अथवा अधिक शब्दांचा केवळ समास न करतां संबंध विशेषणात्मक वाक्यच्या वाक्य—मग तें कितीही मोठें असो—एका समासांत आणूं शकतो. अर्थात् संस्कृतसारख्या संपन्न भाषेंतच तो मोठ्या प्रमाणांत बनवितां येतो. इंग्रजींत किंवा मराठींत छोटे समास होतात, पण मोठे बहुव्रीहि बनविण्याइतका लवचीकपणा त्या भाषांत नाहीं. मराठींत मोठा बहुव्रीहि समास करावयाचा असल्यास, याच कारणास्तव निवळ संस्कृत शब्दांचा उपयोग करावा लागतो.

२७४ बहुव्रीहीचें मुख्य लक्षण म्हणजे त्यांतील घटकांच्या संयुक्त अर्थाहून एकंदर समासाचा अर्थ अगदीं वेगळा असतो; तो समास नेहमीं विशेषणात्मक असतो; व त्याचा विग्रह नेहमीं एका संबंधी वाक्यांतच करून त्यांतील 'जो' या सर्वनामाचें रूप अखेरीस ठेवावें लागतें. 'चक्र' आणि 'पाणि', 'चाक' आणि 'हात' यांच्या संयुक्त अर्थाहून एकंदर समासानें निर्दिष्ट होणारा पदार्थ 'विष्णु' हा अगदीं वेगळा आहे. समासाचा विग्रह 'चक्र आहे पाणीमध्यें ज्याच्या' असा असून, अवघ्या समासाचा अर्थ 'चक्रधारण करणारा' असा विशेषणात्मक आहे. त्याचप्रमाणें 'आखूड' आणि 'शिंग' यांच्या संयुक्त अर्थाहून 'आखुडशिंगी' या समासाचा अर्थ वेगळा आहे. तोच प्रकार 'तपोधन', 'नीलकंठ', 'दुतोंड्या' 'माणुसघाण्या' इत्यादि शब्दांचा होय.

२७५ बहुव्रीहि समास, गौण वाक्यांतलें क्रियापद सकर्मक किंवा अकर्मक जसें असेल त्या मानानें मोठा किंवा लहान होतो. अकर्मक क्रियापदाचें वाक्य असल्यास वाक्याच्या अभिप्रेत अर्थानुसार प्रथम कर्ता नंतर क्रियापद व नंतर विधेयपूरक अशा क्रमानें शब्द ठेवून, 'जो' चें विभक्त्यन्त रूप अखेर ठेवावें.

म्हणजे समासाला योग्य अशी वाक्याची भूमिका तयार होते. नंतर क्रियापद व वाक्यांतले प्रत्यय व शब्दयोगी अव्ययें काढून घ्यावीं व शब्द जोडून द्यावे म्हणजे समास तयार होतो.

ही भूमिका तयार करतांना पुढील नियम लक्षांत ठेवावे.

( १ ) गौण वाक्यांत नेहमीं ' अस् ' धातूचेंच पूर्णकालदर्शक रूप असलें पाहिजे.

( २ ) ' अस् ' धातूखेरिज इतर धातूचा उपयोग होऊन वाक्य बनलें असल्यास त्या धातूचें वर्तमानकालवाचक किंवा भूतकालवाचक धातुसाधित घालून 'अस्' धातु कृत्रिम रीतीनें त्यांत आणावा.

( ३ ) ' जो ' चें रूप नेहमीं प्रथमेखेरीज दुसऱ्या विभक्तींतच असलें पाहिजे

( ४ ) कर्त्याला विशेषणें असल्यास तीं त्याचेजवळ व विधेयपूरकास विशेषणें असल्यास तीं त्याचेजवळ, मागें ठेवावीं.

( ५ ) शुद्ध विधेयपूरकच विशेषण असल्यास तें प्रथम, नंतर क्रियापद व नंतर कर्ता असा क्रम ठेवावा.

( क ) उदाहरणार्थ कांहीं वाक्यें घेऊन त्यांचे समास बनवूं. ( १ ) " अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ." ( २ ) "शंख-चक्र शोभे हातीं, पायीं खडावा गर्जती. " ( ३ ) " ब्रीद ज्याचें जगद्दानी. " ( ४ ) " गजासारखें आहे तोंड ज्याचें. " आतां हीं वाक्यें वर सांगितलेल्या नियमानुसार अशीं मांडावीं लागतील.

{ १ निर्मळ आहे अंतर ज्याचें ( वरील पोटकलम ३ व ५ पहा )
{ २ रसाळ आहे वाचा ज्याची ( पोटकलम ३ व ५ पहा )
{ ३ शंखचक्रांनीं शोभणारा आहे हात ज्याचा ( पोट कलम २ )
{ ४ खडावांमुळें गर्जणारे आहेत चरण ज्याचे ( पोटकलम २ )
५ जगद्दानी आहे ब्रीद ज्याचें ( पोटकलम ५ )
६ गजासारखें आहे तोंड ज्याचें ( पोटकलम ५ )

आतां ह्या वाक्यांतील मराठी शब्द काढून संस्कृत शब्द घालून हीं वाक्यें मांडूं, व त्यांतील विभक्ति प्रत्यय, क्रियापद, शब्दयोगी अव्ययें, व ' जो 'चें रूप गाळूं, म्हणजे समास तयार होतील.

१ निर्मल आहे अंतर ज्याचें = निर्मलांतर.
२ रसाल आहे वाच् ज्याची = रसालवाक्
३ शंखचक्रांनीं शोभमान आहेत हस्त ज्याचे = शंखचक्रशोभमानहस्त
४ पादुकांमुळें गर्जत आहे चरण ज्याचा = पादुकागर्जच्चरण
५ जगद्रक्षक आहे बिरुद ज्याचें = जगद्रक्षकबिरुद
६ गजासारखें आहे वदन ज्याचें = गजवदन.

टीपः—भूमिका तयार करतांना संस्कृत शब्द घालावयाचे ते कर्ता व विधेयपूरक यांचे बद्दलच घातले पाहिजेत हें उघड आहे. बाकीचे शब्द समास करतांना गाळावयाचे असल्यामुळें त्यांचेबद्दल संस्कृत शब्द घालण्याचें कारण नाहीं.

( ख ) कर्त्याला व विधेयपूरकाला विशेषणें असलेलें एक वाक्य घेऊं. 'नवीन लग्न करून आणलेली बायको हेंच आहे मोठ्या अभिमानाचें स्थान ज्याचें.' हें वाक्य समासांत घालावयाचें आहे असें समजूं. भूमिकेच्या नियमांप्रमाणें तें बरोबर मांडलेलें असल्यामुळें फक्त महत्वाच्या जागीं संस्कृत शब्द घालीत गेल्यानें काम भागणार आहे. तसें करून वाक्य ' नव परिणीत दार आहे महाभिमानाचें स्थान ज्याचें ' असें होईल व विभक्ति प्रत्यय वगैरे गाळून ' नवपरिणीतदार-महाभिमानस्थान ' असा समास होईल.

( ग ) उपसर्गांच्या व्यंजकत्वाचा उपयोग करून म्हणजे उपसर्गाला विशेषणात्मक शब्द मानून बहुव्रीहि समास करितात. जसें:—' अभिगत आहे मुख ज्याचें तो ' अभिमुख. ' उपगत झाला आहे वर जिला ती ' उपवर.

( घ ) बहुव्रीहीचा पहिला घटक ' न ' किंवा ' अ ' हें अव्यय ठेवून व त्याचा अर्थ विशेषणात्मक मानून ' नञ् बहुव्रीहि समास करितात. जसें:—'नाहीं अक म्हणजे दुःख ज्यांत तो '—न+अक = नाक ( स्वर्ग ). ' अविद्यमान आहे ज्ञान ज्याच्यामध्यें तो '—अज्ञान. ' नाहीं ख ( पोकळी ज्यांत ) तें '–नख' इ०.

( ङ ) बहुव्रीहीचा पहिला घटक ' स ' हा संक्षेप घालून त्याचा ' सहित, ' ' सह, ' ' समान ' वगैरे विशेषणात्मक अर्थ मानून ' सहार्थी बहुव्रीहि ' समास करतात. जसें:—' सहित आहे पुत्र ज्याशीं तो '-सपुत्र. 'परिवारानें सहित तो'–सपरिवार. ' समान आहे उदर ज्याचें तो ' –सोदर. ' समान आहे वर्ण ज्याचा

तो '– सवर्ण, इ०. 'सहार्थी' समासांत 'स' बद्दल क्वचित् 'सह' हें अव्यय ठेवतात. जसें 'सोदर,' किंवा 'सहोदर.'

**टीपः**—( ग ), ( घ ), ( ङ ) या प्रकारांच्या समासांची विग्रहभूमिका कलम २७५, पोटकलम ५ अन्वयें सिद्ध होतें हें उघड आहे.

**२७६** हे बहुव्रीहीचे प्रकार अकर्मक गौण वाक्यांचे असतात व त्यांत 'अस' धातूचें क्रियापदरूप गुप्त असतें. वाक्यांत दुसरा धातु असल्यास त्याचें धातुसाधित घालून 'अस' धातू कृत्रिम रीतीनें आणावा लागतो हें वर सांगितलेंच आहे ( कलम २७५ पोटकलम २ ). ह्या समासांच्या विग्रह–भूमिकेंत 'जो' हें सर्वनाम द्वितीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, व सप्तमी, इतक्या विभक्तींत येऊं शकते. 'जो' हें सर्वनाम तृतीयेंत यावयास सकर्मक वाक्याचा बहुव्रीहि असावा लागतो. या 'जो' च्या विभक्तीवरून समासाला नांव देण्याची चाल आहे. जसेंः—

१ द्वितीया बहुव्रीहि – प्राप्त आहे उदक ज्यास – प्राप्तोदक ( गांव वगैरे )
२ चतुर्थी बहुव्रीहि – निवेदित आहे संदेश ज्याला – निवेदितसंदेश (मनुष्य)
३ पंचमी बहुव्रीहि – गलित आहेत पर्णें ज्यापासून – गलितपर्ण ( वृक्ष )
४ षष्ठी बहुव्रीहि – चक्र आहे पाणीमध्यें ज्याच्या – चक्रपाणि ( विष्णु )
५ सप्तमी बहुव्रीहि – वीर आहेत पुरुष ज्यांत – वीरपुरुष ( देश )
६ तृतीया बहुव्रीहि – कृत आहे कृत्य ज्यानें – कृतकृत्य ( मनुष्य )

( क ) पहिल्या पांच समासांच्या व सहाव्या समासाची विग्रहभूमिका यांची तुलना करून पाहिल्यास असें दिसून येईल कीं पहिल्या पांची प्रकारांत संबंधी गौण वाक्यांतलें क्रियापद मूळचेंच 'अस' धातूचें रूप तरी आहे; किंवा दुसरें क्रियापद असल्यास, त्याचें कलम २७५, पोटकलम २ अन्वयें धातुसाधित रूप बनवून 'अस' धातु कृत्रिम रीतीनें आणला तरी आहे. दुसरी गोष्ट ही कीं, ह्या पहिल्या पांच प्रकारांत गौण वाक्यांतला कर्ता हा, समासानें सूचित होणाऱ्या पदार्थापासून वेगळा आहे. तेंच शेवटच्या सहाव्या प्रकारांत असें दिसून येईल कीं, विग्रहभूमिकेंत 'अस' धातूचें रूप गौण असून तें गाळून टाकलें तरी चालण्याजोगें आहे. 'कृत' याच क्रियापदरूपाला महत्व आहे, व गौण वाक्यांतला जो कर्ता तोच समासानें सूचित होणारा पदार्थ आहे यावरून असें सिद्ध झालें

कीं सकर्मक क्रियापदांचा बहुव्रीहि तृतीयान्त असतो त्या वेळीं गौणवाक्यांतला कर्ता तोच समासाचा वाचक पदार्थ असल्यामुळें गौणवाक्य पाहिजे तितकें मोठें केलें तरी, साऱ्या वाक्याच्या अर्थाचें कर्तृत्व समासवाचक शब्दाकडेच असल्या-मुळें अर्थव्यंजनेस अडचण पडत नाहीं.

१७७. सकर्मक क्रियापदांचा बहुव्रीहि बनवितांना क्रियापद गुप्त न ठेवतां त्याचें वर्तमान कालवाचक किंवा भूतकालवाचक धातुसाधित घालावें लागतें. समास बनवावयाचा तो असा:—प्रथम गौणवाक्याची विग्रहभूमिका मांडून अखेरीस ' जो ' चें तृतीयान्त रूप आणावें. नंतर गौण वाक्यांत क्रियेशीं संबंध असलेला कारक-विभक्त्यन्त शब्द आपल्या विस्तारासह प्रथम ठेवावा. त्यानंतर क्रियापदाचें कर्मणि भूतकालवाचक किंवा वर्तमानकालवाचक धातुसाधित आपल्या विस्तारासह ठेवावें. व नंतर गौणवाक्यांतलें कर्म आपल्या विस्तारासह ठेवावें. शेवटीं विग्रहभूमिकेंतील सर्व विभक्ति प्रत्यय, शब्दयोगी अव्ययें वगैरे काढून टाकून शब्द जोडावे म्हणजे समास तयार होतो. असला समास करितांना पुढील नियम लक्षांत ठेवावे.

१ गौणवाक्यांत शब्दविस्तार मोठा असला तरी क्रिया एकच असली पाहिजे.

२ एकाहून अधिक क्रिया असल्यास निदान त्यांतली एकच मुख्य असली पाहिजे.

३ मुख्य क्रियेशिवाय गौणक्रिया असल्यास तिचें विधान धातुसाधितांत किंवा क्रियापद रूपांत न ठेवतां नाम किंवा विशेषण यांच्या रूपांत आणलें पाहिजे.

४ गौणवाक्यांतील क्रियेचा मुख्य क्रियेशीं कारक–संबंध लागावा असाच वाक्यार्थ असला पाहिजे.

५ तसा लागत नसल्यास तो कृत्रिम रीतीनें लावला पाहिजे.

६ अर्थसंदर्भाला अडचण उत्पन्न होईल अशा जागीं समास तोडावा, किंवा अडचण करणारे शब्द गाळून टाकावे.

( क ) उदाहरणार्थ कांहीं वाक्यें घेऊं व त्यांचे समास बनवूं.

१ ( ज्यानें ) सांकडेलेया धर्माचेनि कैवारें। आपणपेयां धनुष करुनि दुसरें। विजयलक्ष्मी एक मोहरें। केलें त्रेतीं ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वरी १०–२३२ )

२ ज्यानें शक्रहि शिक्षिला जइं महा संपन्मदें मातला ॥ (मोरोपंत)

३ ज्यानें आपल्या जटेंतून राक्षस उत्पन्न केला व यज्ञांत जमलेले ब्राह्मण पळवून लावले असा ( महादेव ).

आतां हीं तीन्ही वाक्यें विग्रह–भूमिकेंत मांडून घेऊं.

१ सांकडलेल्या धर्माच्या कैवारानें आपणा स्वतःस दुसरें धनुष्य बनवून त्रेतायुगांत एक मार्गाला लावली विजयलक्ष्मी ज्यानें ( असा राम ). संस्कृत शब्द घालून ' संकटग्रस्त + धर्माभिमान + अर्थ + कृत+स्वदेह+धनुष्य+एकमार्ग प्रचोदित+विजयलक्ष्मी ' हे शब्द घालतांना ' आपणा स्वतःस दुसरें धनुष्य बनवून ' ह्या मजकुराबद्दल वरील पोटकलम ३ प्रमाणें त्याला ' कृत+स्वदेह+ धनुष्य ' असें नामरूप दिलें आहे, व त्याचा मुख्य क्रियार्थाशीं करणाचा म्हणजे तृतीयेचा संबंध लावला आहे. ( पोटकलम ४ )

२ शिक्षिला संपन्मदें मातलेला शक्र ज्यानें असा. संस्कृत शब्द घालून शिक्षित+संपन्मद+मत्त+शक्र. गौणवाक्यांत पोट गौणवाक्य आल्यामुळें त्याचें धातुसाधित बनवून ' संपन्मदानें मत्त ' असें विशेषण केलें ( पोट कलम ३ ), व अनवश्यक शब्द ' जइं ' व ' हि ' गाळून टाकले ( पोटकलम ६ ).

३ आपल्या जटेंतून उत्पन्न केलेल्या राक्षसाकडून पळवून लावलेले आहेत यज्ञांत जमलेले ब्राह्मण ज्यानें असा. संस्कृत शब्द घालून, ' स्व+जटा+उत्पादित +राक्षस+विद्रावित+यज्ञ+मिलित+ब्राह्मण ' गौण वाक्यांत दोन क्रिया होत्या त्यांतील एकीचा विशेषणांत समावेश केला आहे ( पोटकलम ३ ).

आतां हे समास असे झाले. १ संकटग्रस्तधर्माभिमानार्थकृतस्वदेह धनुष्यैकमार्ग-प्रचोदित-विजयलक्ष्मीक. ( २ ) शिक्षितसंपन्मदमत्तशक्र ( ३ ) स्वजटोत्पादितराक्षसविद्रावितयज्ञमिलित ब्राह्मण. पहिल्या समासांत 'क' प्रत्यक्ष अखेरीस लावण्याचें कारण पुढें देण्यांत येईल.

( ख ) वर्तमान कालांतील सकर्मक क्रियापदांचे देखील मोठे समास होतात. जसें:—' गांवोगांवांतून जमलेल्या अनेक ब्राह्मणांच्या मंत्रपठनाच्या गजरांत आरंभिला आहे अश्वमेध ज्यानें ' हा मजकूर ' ग्रामान्तरमिलितानेकविप्रमंत्र पठनघोषप्रारभ्यमाणाश्वमेध ' असा होईल.

२७८ सकर्मक क्रियापदांच्या संबंधी गौणवाक्यांत वर्तमानकालवाचक क्रियापद असून समासवाचक शब्दाहून इतर कर्ता गौणवाक्यांत असेल तर अशा वाक्याचा बहुव्रीहि होत नाहीं, कारण विभक्तिप्रत्यय गाळल्याबरोबर कर्त्याची विभक्ति उमगेनाशी होऊन तिला कलम २७७ मध्यें सांगितल्याप्रमाणें विग्रहभूमिकेंतल्या दुसऱ्या कोणत्या तरी विभक्त्यन्त शब्दाचें स्वरूप प्राप्त होतें. जसें:— 'ब्राह्मण देतात आशीर्वाद ज्याला असा' हा मजकूर समासांत आणावयाचा झाल्यास 'ब्राह्मणददाशीर्वाद' असें म्हटलें तर ब्राह्मण शब्दाचा अर्थ चतुर्थ्यन्त लागून, 'ब्राह्मणांना जो आशीर्वाद देतो तो' असा अर्थ होईल. सबब अशा वाक्यांस कर्मणि स्वरूप देऊन समास करावा. जसें:— 'ब्राह्मणदीयमानाशीर्वाद'. 'साधु-संसेव्यमान-चरण' इ०.

२७९ बहुव्रीहि समास विशेषणात्मक असल्यामुळें तो ज्याचें विशेषण असेल त्याच्या लिंगानुसार समासाच्या अखेरचा स्वर बदलून समासाचें लिंग बनवावें लागतें. जसें:—'बहु आहेत भार्या ज्यास' – बहुभार्य. 'कमलाप्रमाणें आहेत नेत्र जिचे ती'– कमलनेत्रा. 'स्मित आहे मुखावर जिच्या ती'–स्मितमुखी इ०.

( क ) अखेरचा स्वर जर अवघड येऊं लागला तर 'स्वार्थी क' प्रत्यय जोडतात. जसें:—'बहु आहेत पत्न्या ज्याला' – बहुपत्नीक. 'जित आहे श्री ज्यानें' तो–जितश्रीक इ०

( ख ) 'अक्षि,' 'सखि' वगैरे कांहीं इकारान्त शब्दांना समासान्तीं 'अ' हा स्वर येतो. जसें:—'गोपसख,' 'पुंडरीकाक्ष,' 'पद्मनाभ' इ०.

( ग ) 'अप् ( पाणी )' हा शब्द समासांत केव्हां केव्हां 'ईप' होतो. जसें:— 'द्वीप,' 'अंतरीप' इ०.

( घ ) 'महत्' हा शब्द समासांत बहुधा 'महा' असा येतो. जसें:—'महाबल,' 'महेश' इ०.

( ङ ) शब्दांच्या अखेरचा पायमोडका 'न्' समासांत बहुधा गाळला जातो. जसें:—'पक्षिनाथ,' उदराशि ( उदन् + राशि ) इ०.

( च ) 'जाया' ( बायको ) हा शब्द समासांत 'जानि' होऊन व 'दंत' शब्द 'दत्' होऊन येतो. जसें:—'सीता जाया ज्याची तो'–सीताजानि. 'सु ( चांगले ) दंत जिचे' ती–सुदती.

२८० 'केशाकेशी,' 'मुसलामुसली' वगैरे संस्कृत समासांच्या धर्तीवर मराठींत कांहीं बहुव्रीहि समास होतात. जसें:—'मार मार असें जिच्यांत चालतें' ती–मारामारी. त्याचप्रमाणें 'गुद्दागुद्दी,' 'लठ्ठालठ्ठी' इ०.

२८१ बहुव्रीहि व कर्मधारय हे दोन्ही समास विशेषणात्मक खरे, पण त्यांत मोठा फरक असा आहे कीं, कर्मधारय समासाच्या घटकांचा जो संयुक्त अर्थ तोच समासाचा अर्थ असतो, पण बहुव्रीहीच्या समास-घटकांच्या संयुक्त अर्थाहून समासाचा अर्थ अगदीं वेगळा असतो. त्याचप्रमाणें कर्मधारयाच्या घटकांत विशेष्य आणि विशेषणें एवढेच परस्परसंबद्ध शब्द असतात, पण बहुव्रीहीच्या घटकांत संबंध गौणवाक्य अभिप्रेत असतें व त्यांचा परस्परांशीं निकट संबंध असत नाहीं.

टीपः— सकर्मक क्रियापदांचा बहुव्रीहि फार अवजड होऊं लागल्यास त्याच्या विग्रहभूमिकेंतील कारक-विभक्त्यन्त शब्दाचा विभक्तिप्रत्यय शिल्लक राखून बाकीचा मजकूर समासांत घालतात. जसें:—'निशितशर-मथित-राक्षस' किंवा निशित-शरांनीं मथित-राक्षस असा. 'जघन-निहित-पाणि' किंवा 'जघनाचे ठिकाणीं निहितपाणि' इ०.

२८२ समासांत पुष्कळ वेळां बाह्यतः साम्य असतें, अशा वेळीं समास अर्थावरून सोडवावा. जसें:—'सत्य आणि व्रत'–सत्यव्रत ( द्वंद्व ), 'सत्याचें व्रत'–सत्यव्रत ( षष्ठी तत्पुरुष ), 'सत्य हेंच व्रत ज्याचें' तो—सत्यव्रत ( बहुव्रीहि ).

२८३. संस्कृतांत समास ही मोठी सोय असली, तरी मराठींत मोठे समास केल्यास त्यांत संस्कृत शब्द घालून उलट गैरसोयच करून घ्यावी लागण्याचा संभव असतो. या कारणाकरितां शक्य तों मोठे समास मराठींत करूं नयेत, आणि केलेच तर प्रौढ लेखनांत बेताबातानें उपयोगांत आणावे.

२८४ समास करितांना नेहमीं एकाच भाषेंतील शब्दांचे करावेत, निदान सवर्ण भाषांतील शब्दांचे करावेत. पण अगदींच परक्या भाषांतील शब्दांचे करूं नयेत. 'हस्ति–स्वकू,' 'अस्मानवडंबर', 'इलाखाधिराज', 'बुकपर्ण (पुस्तकाचें पान)' असले समास अधम होत. ज्ञानेश्वरादि कविश्रेष्ठांनीं 'प्रबंधहोडा', 'प्रमेयपिक' असले सवर्ण शब्दांचे उत्कृष्ट समास केलेले आढळतात, आणि तितपत सवलत घेतली तर चालण्याजोगी आहे. तसेंच समासाच्या घटकांचा संधि केला पाहिजे.

क्वचित् वामन मोरोपंतांनीं सुद्धां हा नियम मोडलेला आढळतो, पण एकंदरीत तो प्रकार गौणच होय. ' आगचोट ' हें विवर्ण समासाचें एक रूढ उदाहरण आहे.

१८६ अर्थावरून समास ओळखण्याच्या निदर्शनासाठीं कांहीं उदाहरणें घेऊं. ( १ ) नीलकंठ पार्वतीस म्हणतो. ( २ ) या वनांत अनेक नीळकंठ दिसतात. ( ३ ) मजजवळ सव्वा दोन रुपये आहेत. ( ४ ) पावणेचार वाजले. यांपैकीं पहिल्या वाक्यांत ' नीळकंठ ' म्हणजे ' शंकर ' असा उघड अर्थ असल्यामुळें तो बहुव्रीहि समास होय. दुसऱ्या वाक्यांत त्या शब्दाचा अर्थ ' मोर ' असा आहे. म्हणून तो बहुव्रीहि समास होय. तिसऱ्या वाक्यांत ' सव्वा ' ( सपाद ) हें दोनचें विशेषण असल्यानें तो सहबहु० समास होय. चवथ्या वाक्यांत ' पावणे ' (पावानें उणें ) हेंही ' चारी 'चें विशेषण असल्यामुळें तो कर्मधारय समास होय.

---

## १८ पाठावली.

आणि ती कामवासना एखादी अल्पवयस्क सुंदर कुमारी विकत घेऊन तिच्याशीं तूं पूर्ण करणार ! ( शारदा )

या नीच भद्रेश्वराचे आणि त्या निर्लज्ज भुजंगनाथाचे गुप्त बेत ऐकल्यापासून असें वाटतें, कीं, आज तीन वर्षे जी निरपेक्ष लोकसेवा केली तिची सांगता तो त्यांचा बेत निष्फळ केल्यावांचून होणार नाहीं. ( कित्ता )

कसा, कसा असावा म्हटलंस ! कुलीन, हंसतमुख, सुंदर, सद्गुणी. पसंत ! पसंत ! ! अगदीं पसंत ! ! ( कित्ता )

भुजंगनाथ चतुर्भुज म्हणजे सहकुटुंब झाला तर दोघांचेंही साधेल, आणि आम्ही चतुर्भुज झालों तर दोघांनाही बाधेल. (कित्ता)

इतक्या मंगळसूत्रांचीं उदकें सुटलीं कीं, तीं एकापुढें एक लावलीं तर काबूलकंदाहारपासून पुण्यापर्यंत अखंड माळ होईल. लुगडीं तर इतकीं वाटलीं कीं पुणें शहरला लुगड्यांचा एक चौफेर कोटच झाला असता ! ( तोत० बंड )

मुलाला वक्रतुंड नांव कसें अगदीं छान शोभतें ! ( सौभद्र )

हें पहा, तूं जो संन्यास घेणार तो त्रिदंडी घे; म्हणजे प्रारब्ध योगानें तुझें इच्छित कार्य सिद्ध होण्याचा समय आला तर तुला पुन्हां गृहस्थाश्रमी होतां येईल. ( किता )

तुझी करुण मूर्ति पुढें असतां, तो निर्दय विधाता मेला असावा असें माझ्या मनाला कसें वाटेल ! ( प्रेमसंन्यास )

लीलाः—मग कालावधीनें परमेश्वराजवळ या, म्हणजे आपण अक्षय सुख भोगीत बसूं. जयंतः—लीले, या जडवृत्ति निर्जीव प्रेताच्या हातून हें काम कसें होणार ? ( किता )

---

संतांचा हा संग तोचि स्वर्गवास । नरक तो उदास अनर्गळा[1] ॥
( तुकाराम

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळा माळ असो नसो ॥
( किता

ब्रह्म निर्मळ निश्चळ । शाश्वत सार अमळ विमळ ।
अवकाश घन पोकळ । गगना ऐसें ॥ १ ॥

अमृतें सेवावें अमृत । अनंतें पहावा अनंत ।
भगवंतें लक्षावा भगवंत । कोण्या प्रकारें ॥ २ ॥ ( दासबोध )

हरि म्हणे मजला इतुकें पुरें ॥ त्रिभुवनात्मक[2] होउनिया उरे ॥
त्रिपद्-मात्रचि[3] कार्य असे बरें ॥ अधिक इच्छिति लोक न ते बरे॥१॥
( वामन

देहार्पणा करुनि तूं पति म्यां वरीला ।
जाया[4] करी हरि तुं नेउनि शीघ्र माला ॥
सिंहांगनेसि मज नेइल अंबुजाक्षा[5] ॥
जंबूक[6] वैद्य जरि तूं करिसी उपेक्षा ॥ २ ॥ ( वामन

---

१ अमर्याद वागणाराला. २ तिन्ही भुवनांना व्यापणारा. ३ तीन पावलांच्या प्रमाणाचें ४ बायको. ५ कमलनेत्रा. ६ शिशुपाल हा कोल्हा.

ऐसा अवंचक[7] वदोनि नृपाळ आला ॥
इंद्रादिकांसहि निवेदित[8]-वृत्त झाला ॥
पाचारिले मग महींद्र विदर्भ-भूपें ।
आले समस्तहि सभेस सहर्षरूपें ॥ १ ॥ (रघु० पं.)

स्वर्णदी-रूप कीं भांग केशांतुनी । ही नभोदेवता आपल्या काढुनी ॥
लंब-गोलाकृती[9] ही फणी त्यावरी । खोवुनी पाहते भूकडे हांसरी ॥१॥
(गृहविहार)

क्षमस्व श्रीजाने[10] ! म्हण शरण जा त्याच हरिला ॥
उदंडांचा तेणें प्रणति करितां ताप हरिला ॥
दया-पीयूषाब्धि[11] प्रभुवर जगद्भावन[12], मनीं ॥
न ठेवी दोषातें क्षमि-तिलक[13] सद्भाव[14]-नमनीं ॥ १ ॥ (मोरोपंत)
तुझ्या गुण-कथा महासुरभि[15], त्यांत ही रासभी[16] ।
शिरे विषयवासना; जशि शुका अहीरांस[17] भी ॥
तशी न इतरांस भी; इस सदंडही[18] हाकिती ।
तथापि बहु लाथळी; मग अदंड मी हा किती ? ॥ २ ॥ (केकावली)

---

जो पाप-नगीं[19] तृण-समीं अनळसमान[20], सदार[21] ।
प्रभु संतांचें सेवितो अनळस-मानस[22] दार ॥ १ ॥ (मोरोपंत)
हांसोनि म्हणे हरिसख[23], हो गाढासन[24], विकंपधी[25] धीट ।
न धरी बा ! दर[26], हा दर[27] सादर दे वाजवूं पुन्हा नीट ॥ २ ॥ (किस्ता)
अतुल प्रताप लोकीं ज्या खल-बल[28]-जलधि-वाडवाऽभाचा ॥
तो कृष्णा आज तुझा मज आला कां न आडवा भाचा[29] ॥३॥ (किस्ता)

---

७ लबाडी किंवा फसवणूक न करणारा. ८ हकीकत सांगता झाला। लांबट आणि गोल आकाराची. १० लक्ष्मीपते. ११ दयामृताचा समुद्र. १२ जगांचा उत्पादक. १३ क्षमाशील लोकांचें भूषण ( टिळा ). १४ भक्तिपूर्वक नमस्कारानें. १५ मोठ्या कामधेनु. १६ गाढवी. १७ शुकरूपी गवळ्यास. १८ काठी घेतलेले. १९ पापरूपी पर्वतावर. २० अग्नीसारखा. २१ बायको ( लक्ष्मी ) तिच्यासह. २२ ज्याचें मन आळशी नाहीं असा, दक्षचित्त. २३ कृष्णाचा मित्र ( अर्जुन ). २४ स्थिर बसलेला. २५ ज्याच्या बुद्धीला चंचलपणा नाहीं असा. २६ भीति. २७ शंख. २८ दुर्जनांचें सैन्य हाच समुद्र, त्यांत वडवाग्नीसारखा भासणाराचा. २९ अभिमन्यु.

ऐसें बोले प्रबद्धांजलि[३०] नरपतिला क्षोभ त्या तापसाचा ।
सांगावा काय ? भासे निज-मणि-हरणें कोपला साप साचा ॥
दुर्वासा वज्रि-ताप-प्रद परि अनिळें वृक्षसा कांपवीला ।
जेणें तो कोप लज्जा जड-भयदं[३१]-बळा दे न त्या कां पवीला? ॥४॥
( कित्ता )

प्रस्फुरदधरदल[३२], प्रभु बलभद्र म्हणे खरेंचि सांगा रे ।
कोठें तो कपट-पट्टू गाठितसे जो पटांत आंगारे ॥ ५ ॥

तदा स्मित-लसन्मुख[३३]-द्विज-समूह-शुभ्र-द्युति ।
च्छटा-धवलितांबर-क्षिति कथी कुश स्वस्थिती ॥ ( मोरोपंत )

वर-विक्रम[३४]-मंडित-भुज-दंड-निहित-चंड-चाप-दंडाचा ।
मी दूत राघवाचा त्वद्विध-दुष्टैक[३५]-काल-दंडाचा ॥ १ ॥ ( कित्ता )

तो मच्छ-प्रसव[३६] सृंगीं[३७] । भग्नावयव[३८] चौरंगी ।
भेटला तो सर्वांगीं । संपूर्ण झाला ॥ १ ॥ ( ज्ञानेश्वर )

मग समाधि अव्यया ईया[३९] । भोगाची वासना यया ।
ते मुद्रा श्री गोरखराया । दिधली मीनीं ॥ २ ॥ ( कित्ता )

आतां विश्वात्मकें देवें । एणें वाग्यज्ञें[४०] तोषावें ।
तोखोनि[४१] मज देयावें । पसायदान[४२] हें ॥ ३ ॥ ( कित्ता )

भानुभूषिता[४३] प्राचिया । येरी सतेजा दिशा आघविया ।
तैसी शास्त्रेश्वरा गीता येया । सनाथें शास्त्रें ॥ ४ ॥ ( कित्ता )

---

३० हात जोडलेला. ३१ पर्वतांना भयप्रद आहे सामर्थ्य ज्याचें अशा ( वज्राला ). ज्या रागानें,इंद्राला ताप देणारा एवढा दुर्वास,पण त्याला सुद्धां वायूनें वृक्षाला कांपवावें त्याप्रमाणें कांपविलें तो कोप जड पर्वतांनाच भयप्रद होणाऱ्या वज्राला कां लाजविणार नाहीं. जडाला कोणीही कांपवील, पण दुर्वासासारख्या महर्षीला कांपाविण्यांत विशेष पुरुषार्थ असा भाव. ३२ स्फुरण पावतो आहे खालचा ओंठ ज्याचा असा. ३३ हास्यानें शोभणाऱ्या मुखांतलि दंतपंक्तीच्या पांढऱ्या प्रभेच्या छटांनीं उज्वल केलीं आहेत आकाश व पृथ्वी ज्यानें असा. ३४ श्रेष्ठ पराक्रमानें शोभिवंत असणाऱ्या हातांत धारण केलें आहे प्रचंड धनुष्य ज्यानें अशाचा. ३५ तुझ्यासारख्या दुष्टांच्या एकच एक यमदंडाचा. ३६ मत्स्यापासून उत्पन्न झालेले मत्स्येंद्रनाथ. ३७ पर्वतशिखरावर. ३८ हातपाय तुटलेल्या चौरंगी नाथाला. ३९ मग अविनाश अशी ही समाधी भोगण्याची इच्छा याला ( गोरक्षनाथाला ) आहे हें पाहून मीन म्हणजे मत्स्येंद्रांनीं ती मुद्रा गोरखनाथांना देऊन टाकली. ४० वाङ्मयरूपी यज्ञानें. ४१ संतुष्ट होऊन. ४२ प्रसाददान. ४३ सूर्यानें पूर्वदिशा उजळली असतां.

# एकोणिसावा पाठ.

## गौण वाक्यें.

२८७ येथपर्यंत वाक्यरचनेच्या दृष्टीनें, नामें, क्रियापदें, अव्ययें, समास इत्यादि वाक्याच्या घटकांचा विचार झाला. त्यावरून वाक्यांत या घटकांचें कार्य व संबंध दिसून येण्यासारखे आहेत. पण वाक्यघटकांचे धर्म एवढ्यावरच थांबत नाहींत. वाक्य लहान आहे तोंपर्यंत त्यांतल्या अर्थाच्या संबंधाचे धागे पूर्वोक्त घटकांनी दाखविले जातात हें खरें, पण वाक्य वाढून मोठें झालें म्हणजे त्यांतील अर्थाच्या छटा पुरतेपणीं दाखविण्यास हे घटक पुरे पडत नाहींत. अशा वेळीं या घटकांचीं कामें मोठ्या वाक्यांतलीं छोटीं ऊर्फ गौणवाक्यें करीत असतात. उदाहरणार्थ 'सर्वांस सुख होईल अशा तऱ्हेनें वाग' हें वाक्य घेऊं. यांत 'सर्वांस सुख होईल' हें गौणवाक्य वागण्याच्या रीतीचा धर्म दाखवितें. म्हणजे विशेषणाचें कार्य करितें हें उघड आहे. हें काम एकट्या दुकट्या शब्दानें होणार नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं गौणवाक्यें नामाचें काम करितात. अशा प्रकारच्या गौणवाक्यांचे धर्म व ते ओळखण्याचे आडाखे यांचा क्रमानें विचार करूं.

२८८ मिश्र वाक्यांतलें गौणवाक्य जर मुख्य वाक्याचा कर्ता असेल तर त्याच्यापुढें 'हें' किंवा 'असें' हें सर्वनाम येतें, आणि कर्म असेल तर गौणवाक्याच्या मागें 'कीं' किंवा 'जे' हें अव्यय येतें. जसें:—'नागपुराहून तार आली हें कांहीं ठीक चिन्ह नाहीं.' "श्रीमंत बोलले जे, 'नाना व महादजी माझे दोन हात आहेत.'" ह्या दोन्ही प्रकारच्या उदाहरणांत गौणवाक्य हें नामवाक्य असतें. क्वचित् 'हें' किंवा 'असें' हे शब्द गुप्त असतात.

२८९ गौणवाक्य अव्ययार्थी असलें म्हणजे पांच प्रकारांनीं आलेलें आढळतें.

(१) 'जर–तर' नें जोडलेलें. जसें:—'तो जर तेथें दिसता, तर मी त्याच्या तोंडांत भडकावली असती.' (२) 'जेथें–तेथें' नें जोडलेलें. जसें:—'जेथें फुलें वेचलीं तेथें गोवऱ्या वेचूं नयेत.' (३) 'जेव्हां–तेव्हां' नें जोड-

लेलें. जसें:—'जेव्हां पहावें तेव्हां तूं उद्योगांत चूर दिसतोस.' (४) 'जेंवि–तेंवि' नें जोडलेलें. जसें:—'रुचे तुला जेंवि करून तेंवि घे.' (५) 'ज्या-अर्थी–त्या अर्थी' नें जोडलेलें. जसें:–'ज्या अर्थी येथें धूर आहे त्या अर्थी जवळच कोठें तरी विस्तव असला पाहिजे.'

(क) वर सांगितलेल्या जोड अव्ययांशिवाय त्याच अर्थाच्या दुसऱ्या जोड्या घालून सुद्धां तेंच कार्य होतें.' जसें:—'ज्या वेळीं भीम पुढें आला त्या वेळीं कौरव भिऊन गेले.' 'ज्यापेक्षां तुला समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं, त्यापेक्षां तूंच अपराध केला आहेस.'

(ख) क्वचित् परस्परावलंबी दोन शब्दांच्या ऐवजी, 'म्हणून,' 'यासाठीं,' 'एवढ्याकरितां, 'असें कीं,' 'कारण,' कारण कां,' 'कां कीं' इत्यादि एक किंवा दोन एकतंत्री शब्द योजूनही अव्ययवाक्य होतें. जसें:– 'तो पाहावा हे डोहाळे । म्हणौनि अचक्षूसि मज डोळे ॥' (ज्ञानेश्वर). 'तूं तावडतोब यावास यासाठीं तर एवढा खटाटोप.'

२९० गौणवाक्य संकेतार्थी असून भूतकाळीं किंवा भविष्यकाळीं योजलें असेल तर त्याच्या अर्थाबद्दल बोलणाराची खात्री नाहीं असें सूचित होतें. जसें:– 'जर तूं आलास (किंवा येशील) तर मोठी मौज होईल.'

(क) एखादे वेळीं संकेतार्थी गौणवाक्यांतील दोन्ही क्रिया भूतकाळीं घातलेल्या असतात, त्यावेळीं त्या परस्परावलंबी असून झाल्या नाहींत असा अर्थ निघतो. 'त्यावेळीं मी तेथें असतों, तर फार बरें झालें असतें' (शारदा).

(ख) परंतु जेव्हां दोन्ही वाक्यें स्वार्थी व वर्तमानकाळीं असतात, तेव्हां पूर्व वाक्यांतला संकेत खरा ठरण्याचा संभव आहे किंवा तो सिद्धांतासारखा गृहीत आहे असा अर्थबोध होतो. जसें:–'चल, तूं नाटकाला निघतोस तर मी ही निघतों.' 'तूं जर दंगा करीत नाहींस तर तूं तो काय!'

२९१ पूर्व वाक्यांतील मजकुराशीं पुढील वाक्यांतील मजकुराचा विरोध असल्यास, 'जरी–तरी,' 'यद्यपि–तथापि', 'कितीं–तरीं' वगैरे जोड्यांनीं मिश्रवाक्य तयार होतें. जसें:–'जरी तो शिकलेला आहे तरी त्याला व्यवहारज्ञान नाहीं.' 'किती शिकविलें तरी व्यर्थ.' 'यद्यपि बलवान् तथापि शुनकानें हरिचें काय करावें!' (मोरोपंत)

२९२ मिश्रवाक्यांत असलेल्या गौण वाक्यांतील क्रियापद रूपास कृदंताचें रूप देऊन व त्या रूपास विभक्ति प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय जोडून शुद्ध वाक्य करतात. त्याचे प्रकार येणेंप्रमाणें:—

( क ) कालदर्शक अव्यय वाक्य जोड अव्ययांनीं न सांधल्यास त्यात्यापुढें 'पर्यंत, तों, पावेतों' इ० शब्दयोगी अव्यय येतें व क्रियापद जुन्या वर्तमान-काळाच्या रूपांत राहतें. द्वितीय पुरुषीं एकवचनीं व तृतीय पुरुषीं अनेकवचनीं मात्र शेवटल्या 'ई' चा लोप होऊन क्रियापदाच्या रूपाला शब्दयोगी अव्यय लागतें. जसें:-'मी येईपर्यंत तो थांबला.' 'तूं जासपर्यंत तो चकारशब्द बोलला नाहीं.'

( ख ) असल्या वाक्यांवरून अर्थानुरोधानें तीन्ही काळांचा बोध होतो. जसें:- 'आम्ही जाऊं तों सर्व तयारी असेल.' 'तो येई पावेतों मी वाट पाहतों.'

२९३ गौण वाक्यांत जर 'ला–ली–लें' प्रत्ययान्त क्रियापदाचें भूतकाळाचें रूप असेल तर त्या क्रियापदरूपाला तृतीयेपासून पुढच्या विभक्ति व शब्दयोगी अव्ययें लावून, तें पुढच्या वाक्याशीं जोडून देतात. जसें:-'तुम्ही आल्यास बरें.' 'श्रवण केलियानें प्राप्त काय होय' ( दासबोध ).

२९४ असल्या भूतकालवाचक नामवाक्यांस तृतीयेचा किंवा चतुर्थीचा प्रत्यय लागून संकेतार्थाचा बोध होतो. जसें:-'केल्यानें देशाटन... मनुजा चातुर्य येतसे फार.' 'त्याला थोडी चिरीमिरी दिल्यास तो आपलें काम साधून देईल.'

( क ) असल्याच वाक्यांस 'वर,' 'नंतर' हीं शब्दयोगी अव्ययें लावल्यानें 'जेव्हां–तेव्हां' नीं जोडलेल्या वाक्यांसारखा अर्थ होतो. जसें:-'तुम्ही आल्या-नंतर विचार करूं.'

( ख ) अशाच वाक्यांना 'प्रमाणें,' 'सारखें' हीं अव्ययें लावून 'जसें–तसें' या जोडीचा अर्थ होतो. जसें:-'तो बोलल्याप्रमाणें वागेल.' क्वचित् 'ज्या अर्थीं–त्या अर्थीं' याचा अर्थबोध होतो. जसें:-'आम्ही तेथें गेल्या-सारखें काम झालेंच पाहिजे.'

( ग ) असल्याच वाक्यांना 'स, ला, तें' प्रत्यय लागून 'ऊन' प्रत्ययाचें काम होतें. जसें:-'तो पुण्यास गेल्यास चार दिवस झाले.'

१९५. कित्येक वेळां गौण वाक्यांतल्या भूतकाळीं क्रियापदास षष्ठीचा प्रत्यय लावून किंवा 'लेलें' प्रत्ययान्त रूप करून, त्याचें क्रियावाचक नाम किंवा विशेषण करतात. जसें:—'मला वचन दिल्याचा पश्चात्ताप झाला,' 'त्याला खोटें बोललेलें पतकरत नाहीं.'

---

## १९ पाठावली.

ती गोष्ट कशाला आतां? पदरीं पडलें पवित्र झालें. त्यांतून मनांत असेल तर दुसरें लगीन करून घ्यायला हात कां धरला आहे कुणी! (शारदा)

बचावलें, नाहीं तर आजच उलट्या अंबारीच्या राज्याचा उपभोग घ्यावा लागला असता! (रंगराव)

पण पहा तो कसें चिमणीसारखें तोंड करून बसला आहे! (गुप्तमंजूष)

आम्ही एवढे अरेराव असून बाजीरावाच्या कैदेंत सांपडलों कसे, हें रडगाणें जो तो गात बसला. (बाजीराव)

धोंडू, पायपोस गेला ही नाहीं तुझी बायको झाली तर !...... काय मेली सुभद्रा लागून गेली आहे! (पण लक्ष्यांत०)

जो तो या लोकमताच्या बागुलबोवाला भिऊन दडून बसेल तर कोणत्याही समाजाला उन्नतावस्था येणार नाहीं. (आगरकर)

माझे मित्र मला साह्य करण्यास तयार आहेत, सर्व सुखदायक वस्तु माझ्या अर्ध्या वचनांत आहेत. तरी दुःख नाहीं असे निव्वळ सुखाचे दिवस सगळे चौदा भरतील! (ओक)

पण एकीच्या सौभाग्याची निराशा करण्याचें भाग पडतांना त्याच्याच योगानें जर दुसरीचें सौभाग्य मला दृढ करितां आलें तरी मी समाधान मानीन (तोत० बंड)

वितंडवादांत शिरणें, किंबहुना 'शेषं कोपेन पूरयेत्' ही युक्ति लढविणें, यांतही तो वेळेनुसार मागें घेत नसे. (निबंधमाला)

वेदमूर्ती दिवाकर भट गोसावी तेथे आलियावरी तुम्ही माझा समाचार घेयासी ये प्रांतीस आले पाहिजे. (समर्थांचें पत्र)

---

तुजवीण वाणीं आणिकांची थोरी। तरि माझी हरी जिव्हा झडो ॥
नेत्र आणिकासी पाहती आवडी। जावोत तेच घडी चांडाळ ते ॥
कथामृतपान न करिती श्रवण। काय प्रयोजन त्यांचें मग ॥
हातपाय तुझे पथीं न चालतां। जावोत अनंता गळोनीया ॥
तुका म्हणे तुज विसंबितां क्षण। वांचोनी कारण काय मग ॥ १ ॥
(तुकाराम)

तुझा दास ऐसें म्हणती सकळ। म्हणोनि सांभाळ करीं माझा ॥
अनाथांचा नाथ पतित-पावन। हें आतां जतन करीं नांव ॥
नेणों तुझी कैसी करावी ते सेवा। जाणसी केधवां अंतरींचें ॥
तुका म्हणे तूं गा करूणेचा सिंधु। तोडीं भवबंधू माझा देवा ॥ २ ॥
(किंवा)

एक म्हणती पाऊस असावा। मग सकळ योग बरवा।
कारण दुष्काळ न पडावा। म्हणजे बरें ॥ १ ॥ (दासबोध)

सदा चक्रवाकासि मार्तंड[2] जैसा। उडी घालितो संकटीं स्वामि तैसा॥
हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं। नुपेक्षी कदा रामदासाभिमानी॥१॥
(रामदास)

पाप गेलियाची खूण। नाहीं पालटिले अवगुण ॥ (तुकाराम)

राजा आला म्हणोनि नगरी। शृंगारिली नानापरी।
अनेक वहनें[3] वळघोनि पुरी। बाहेर थवे दाटले ॥ १ ॥

---

१ राहिलेल्या मजकुरावर उत्तर सुचेनासें झालें म्हणजे त्याची उणीव रागाऊन भरून काढावी. २ सूर्य. ३ वाहनांत बसून.

राजा प्रवेशला मंदिरीं । तों विश्वामित्र बैसला द्वारीं ।
दंड पडताळूनी करीं । तारामती लक्षिली ॥ २ ॥ (मुक्तेश्वर)

आकाश-अंत न कळूनिहि अंतरिक्षीं ।
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥
नामप्रतापहि यथामति त्याच रीती ।
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ १ ॥ (वामन)

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना ।
रचुनि बसावि ऐसी भोंवती बाळसेना ॥
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ।
म्हणुनि बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ २ ॥ (किंत्ता)

---

नल तिस म्हणे कुलजे ! त्वां जरि देवांसमक्ष मज वरिलें ।
जों सावळुं तों तुझा मी होतांहि प्रेम ऊर्न मजवरिलें ॥ १ ॥ (मोरोपंत)

जरि तूल-राशि-मध्य-स्थ-बिलीं नेईल आखु बातीतें ।
तरि वासि आखुलें वा, सहसा भक्षील आखु बा तीतें ॥ २ ॥ (किंत्ता)

पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रिरेज निसरे ।
त्या दीनबंधुची ती चिंता न सरे, परंतु रजनि सरे ॥ ३ ॥ (किंत्ता)

कीं पावावें समयीं सदय मनांतुनि योजिलें जरि तें ।
तरि जेंवि रुक्मिणीचें चिंता माझें अधीर मन करितें ॥ ४ ॥ (किंत्ता)

तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें, यास्तव ।
प्रजापतिसुतत्व ये, करिति साधु ज्याचा स्तव ॥
[illegible] मागिलें, बहु दया अशी नारदा ।
स्मरे [illegible]घडि, अशो भवपयोधिच्या पारदा ! ॥ १ ॥ (केकावली ११५)

---

४ सांवरून. ५ जिवंत (स + असु). ६ कमी. ७ कापसाच्या ढिगामध्यें असलेल्या आपल्या बिळांत. ८ उंदीर. ९ ज्यांची पायधूळ. १० योग्य वेळेला. ११ ब्रह्मदेवाचें पुत्रत्व. १२ भवसमुद्रांतुन पार नेणाऱ्या !

मधुफलें मम पाहुनि पाहुणा । प्रथम येउनि याचिल आपणा ॥
धरुनि गर्व असा स्वफलाननीं । करि जणुं स्मित दाडिमें[13] काननीं ॥१॥
(वनविहार)

जैसें भ्रमर परागु नेति । परि कमलदलें नेणति ।
तैसी [14]परि आहे सेविती । ग्रंथीं इये ॥ १ ॥ (ज्ञानेश्वर)

आइका आकाश गिंवसावें[15] । तरि आणिक तैसेंचि होआवें ।
म्हणौनि अर्पांडु[16] हें आघवें । निर्धारितां ॥ २ ॥ (कित्ता)

आवडी म्हणौनि नें[17] लाजवी । व्यसन जैसें न सिणवी ।
पीसें आणि न भुलवी । तरि तेंचि काइसें ॥ ३ ॥ (कित्ता)

मेलेयां भले तेउता[18] । उदकपणें पांडुसुता ।
तरंगाची कां निश्चलता । न मोडेचि जेवि ॥ ४ ॥ (कित्ता)

ऐसें प्रेमरसें सुरफुरें[19] । बोलिलें जवं यादवेश्वरें ।
तवं अवधान अर्जुनाकारें । मूर्त झालें ॥ ५ ॥ (कित्ता)

---

१३ डाळिंब. १४ प्रकार. १५ धरावें, कोंडावें. १६ अवघड, बिकट. १७ आवड लावतें आणि लाज उत्पन्न करीत नाहीं, व्यसन म्हणजे छंद लावतें आणि शाणि देत नाहीं, वेड लावतें आणि भूल पाडीत नाहीं, असें कसें होईल. १८ वाटेल तिकडे. १९ सूचक. जेव्हां यादवाधिश कृष्ण असे सूचक विवरण प्रेमभरानें करूं लागला तेव्हां लक्ष्यच अर्जुनाच्या रूपानें साक्षात् उभें राहिलें. अर्जुनाचें तिकडे चांगलें लक्ष लागलें असा भाव.

# विसावा पाठ.

## विरामचिन्हें.



२९६. वाक्य उच्चारतांना त्यांतील वेगवेगळ्या भागांचे संदर्भ तुटून स्पष्टपणें कळावे म्हणून अशा विभागांच्या अंतीं कमी अधिक वेळ थांबावें लागतें. ह्या थांबण्याच्या म्हणजे विरामाच्या प्रमाणास अनुरूप अशीं कांहीं चिन्हें पाश्चात्यांनीं बसविलीं आहेत व तीं सोईचीं असल्यामुळें इंग्रजी भाषेवरून मराठींत घेतलीं आहेत. संस्कृतमध्यें प्रत्ययांच्या गर्दीमुळें, अर्थ-संदर्भ तुटण्याचें भय नसल्यानें त्या भाषेस विराम चिन्हांची गरज भासली नाहीं. यामुळें वाक्य-पूर्णतादर्शक चरण-चिन्ह, व 'अ'चा लोपदर्शक द्विमात्रक द्विखंड चिन्ह एवढीच काय तीं विराम चिन्हें त्या भाषेंत होतीं. प्राकृत भाषांच्या अमदानींत पद्याला चरण चिन्ह व गद्याला विसर्ग चिन्ह अशी बहुधा विराम व्यवस्था होती. प्राचीन मराठी पत्र-व्यवहारांत व बखरींत कसल्याच विरामचिन्हांचा उपयोग केलेला प्रायः आढळत नाहीं. तथापि अशा रीतीनें विरामचिन्हांवांचून जरी अर्थनिर्वाह होत असला तरी त्यांची उपयुक्तता बिनतोड असल्यामुळें इंग्रजी विरामचिन्हें मराठीनें तावडतोब उचललीं व आतां तीं पुरतेपणीं रूढ झालीं आहेत.

२९७. हीं विरामचिन्हें येणेंप्रमाणें आहेत. १ स्वल्पविराम [ , ]. २ अर्धविराम [ ; ]. ३ अपूर्णविराम [ : ]. ४ पूर्णविराम [ . ]. ५ प्रश्नचिन्ह [ ? ]. ६ उद्गारचिन्ह [ ! ]. ७ अपसारण चिन्ह [ – ]. ८ कौंस ( ), [ ], { }. ९ विग्रहचिन्ह [ - ]. १० अवतरण चिन्हें [ ' ' किंवा " " ].

२९८. स्वल्पविरामाचा उपयोग पुढील ठिकाणीं करितात. ( १ ) एकाच जातीचे दोहोंपेक्षां अधिक शब्द जोडावयाचे असतां प्रत्येक शब्दाचे अखेरीस ( २ ) भिन्न जातींचे शब्द निराळे करावयाचे असतां. ( ३ ) लांब वाक्याचे तुकडे पाडण्याकरितां. ( ४ ) निरनिराळ्या पोटवाक्यांचे अखेरीस. ( ५ ) संबोधनावर विशेष जोर नसतांना, त्याचेपुढें इ०. जसें:— रामा, गोविंदा, कृष्णा व

मथुरा हीं त्याचीं भावंडें आहेत.' 'जमिनीवर, घरांवर आणि दारांवर धुकें पसरलें होतें.' 'तो अशा त्वरेनें चालला असतां, त्याचा मित्र त्यास वाटेंत भेटला.'

( क ) नामवाक्याचे आरंभीं असणाऱ्या 'कीं'ला जोडून स्वल्पविराम घालतात. क्वचित् 'कीं' गुप्त असलें तर त्याचे जागीं घालतात. जसें:— 'तो म्हणाला ( कीं ), मी येईन.'

२९९ अर्ध विरामाचा उपयोग पुढील ठिकाणीं करितात. १ स्वल्प विरामानें जोडावयाचीं वाक्यें मोठीं असलीं किंवा एक दोनदां स्वल्पविराम येऊन गेला असला तर. जसें:—' तूं आपल्या बापापासून, नाहीं तर दुसरा कोण पालक असेल त्याजपासून, आजारी होतास अशा बद्दल चिटी आण; मग दंड माफ करण्याचें पाहूं.'

( क ) निरनिराळ्या वाक्यार्थांवर जोर देण्याकरितां, किंवा पुढील वाक्यार्थाच्या कारणादाखल, जसें:— ' मी गांवीं जातांच अगोदर रावसाहेबांना भेटलों; नाहीं तर त्यांची तब्येत गरम व्हायची एखादी !'

३०० अपूर्ण विरामाचा उपयोग पुढीलप्रमाणें करितात. ( १ ) पहिल्या विधानाच्या पूर्ततेकरितां, दुसरें विधान करितांना. जसें:—' आतां पुरे करा: ललित होईल.' ( २ ) अवतरण किंवा उदाहरण द्यावयाचें असतां, अपूर्णविराम व विग्रहचिन्ह जोडून घालतात. जसें:–' तुकोबा म्हणतात:–देव भावाचा भुकेला.'

३०१ पूर्ण विरामाचा उपयोग, वाक्य संपलें असें दाखविण्याकडे करितात. जसें:—'सूर्य उगवला. पक्षी घरट्यांतून चिंवचिंव करूं लागले. ते उन्हाळ्याचे दिवस होते.' इ०.

३०२ प्रश्नचिन्हाचा उपयोग प्रश्नार्थक वाक्याचे अखेरीस करतात. जसें:— ' हें काय ? तें काय ? भोग काय ? योग काय ? ' ( रामदास )

३०३ उद्गारचिन्हाचा उपयोग हर्ष, आनंद, भीति, चमत्कार इत्यादि मनोविकारांचे दर्शक शब्दांपुढें किंवा वाक्यांचे अखेरीस होतो. जसें:—' वाहवा ! शाबास ! अरे पण हो !'

( क ) संबोधनापुढें उद्गारचिन्हाचा उपयोग करतात. जसें:–' सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा !' ( मोरोपंत ).

( ख ) गर्भित तिरस्कार किंवा अविश्वास दाखविण्याकरितां उद्गारचिन्ह घालतात. जसें:– 'सभेस पांच सात माणूस लोटलें होतें ! '

३०४ अपसारणचिन्हाचा उपयोग पुढील प्रसंगीं करितात. ( १ ) पूर्वी सांगितलेली गोष्ट अधिक स्पष्ट करितांना. जसें:– ' वडगांवच्या कारखान्यांत मोठा दंगा झाला—त्या कारखान्यांत भिन्न जातींचे पुष्कळच मजूर कामावर जात असत हें वाचकांस ठाऊक असेलच. ' ( २ ) एक विधान चालूं असून मध्येंच दुसरें आणल्यास. जसें:—' रात्र निरभ्र असल्यामुळें–ते शरदृतूचे दिवस होते–उत्कृष्ट चांदणें पडलें होतें. '

३०५ कौंसाचा उपयोग, एखाद्या वाक्यांत स्पष्टीकरणाकरितां आणलेला, पण जो गाळला तरी चालेल असा मजकूर घालण्याकडे करितात. ' शिवाजीच्या वेळीं तुका करमार ( देहूच्या तुकारामबोवाहून हे भिन्न होत ) नांवाचे एक कवि होऊन गेले. '

३०६ विग्रहचिन्हाचा उपयोग पुढें दिल्याप्रमाणें करितात. ( १ ) समासाचे अवयव जोडण्याकडे. जसें:— ' जाय हळूंच विनय-नत-काय सकळ–वृष्णि-राय देव हरि ' ( मोरोपंत ). ( २ ) ओळीचे अखेरीस एखादा शब्द संपला नसून त्याचा एखादा अवयव तोडावयाचा प्रसंग आल्यास, त्या अवयवापुढें.

३०७ अवतरणचिन्हांचा उपयोग दुसऱ्याच्या ग्रंथांतला, लेखांतला, किंवा भाषणांतला उतारा घेण्याकरितां किंवा विशिष्ट शब्दाकडे लक्ष्य वेधण्याकरितां करितात. जसें:—भवभूतीनें म्हटलें आहे " व्यतिषजति पदार्थानांतरः कोऽपि हेतुः ", रामा म्हणाला:—' मी तुझ्याबरोबर येत नाहीं, ' ' नाम ' म्हणजे पदार्थाचें नांव.

३०८ मराठींतील जुन्या चिन्हांपैकीं चरणांचा उपयोग हल्लीं पद्याचे चरणाचे अखेरीस करतात. प्रत्येक चरणाचे अखेरीस दोन चरण चिन्हें किंवा एक चरण चिन्ह; किंवा विषम ओळीचे अखेरीस एक व सम ओळीचे अखेरीस दोन, अशा रीतीनें चरणांचा उपयोग करतात. क्वचित् पहिल्या व तिसऱ्या ओळीचे अखेरीस स्वल्पविराम घालतात. लेखाच्या मथळ्यावरील मंगलसूचक शब्दांचे मागें पुढें चरणचिन्हें घालण्याची वहिवाट आहे. जसें:—

॥ श्रीराम समर्थ ॥

गणाधीश जो ईश सर्वा गुणांचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ॥
नमूं शारदा मूळ चत्वार वाचा ।
गमूं पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥

---

# २० पाठावली.

## १ अभ्यासपाठ.

पुढील वाक्यांत विरामचिन्हें घालावयाचीं आहेत असें समजूं.

"पूर्वीपासून श्रीची निस्पृह स्थीत आहे ते प्रसीधच आहे महाराजाचे भक्तीस्तव वैभव पूजा अधिकार करून कितेक भगतव्यानसार लीला वर्तले पुन्हा पूर्वस्थिती जैसी होती तैसीच आहे" ( श्रीसंप्रदा० काग० लेखांक १४ )

यांतील भाषा जुनी आहे, पण अर्थ उघडच आहे. रामदास स्वामी निस्पृह, केवळ शिवाजीचे भक्तीखातर त्यानें अर्पण केलेलें वैभव पूजाद्रव्य वगैरे स्वीकारून भक्तप्रेमामुळें लीला करून राहिले; पण हल्लीं पुन्हां निस्पृहपणानें वागतात, इत्यादि लिहिणाराचा आशय आहे. 'प्रसिद्धच आहे' येथें पहिलें वाक्य पूर्ण होत असल्यामुळें तेथें पूर्णविराम पाहिजे ( कलम ३०१ ). 'स्थीत आहे' येथें गौणवाक्य संपत असल्यामुळें तेथें स्वल्पविराम पाहिजे ( कलम २९८, ४ ). 'वैभव, पूजा, व अधिकार' यांचे दरम्यान उभयान्वयी अव्यय नाहीं यावरून तेथें समास पाहिजे हें उघड आहे. म्हणून त्या शब्दांपैकीं पहिल्या दोन्हींत विग्रह चिन्ह घालून पुढच्या शब्दाचा त्यांच्याशीं संधी केला पाहिजे ( कलम ३०६, १ ). हें वाक्य अमळ मोठें होत असल्यामुळें व 'अधिकार करून' येथें क्रियेचें 'ऊन' प्रत्ययान्त रूप असल्यामुळें तेथें स्वल्पविरामाला योग्य जागा आहे ( कलम ३९८, ३ ). 'लीला वर्तले' येथें वाक्य पूर्ण होतें पण तेथें पहिल्या दोन वाक्यांत केलेल्या विधानाची पूर्ति पुढच्या वाक्यांत करावयाची असल्यामुळें अपूर्ण विराम दिला पाहिजे. ( कलम ३००, १ ). 'तैसीच आहे' येथें पूर्णविराम उघडच पाहिजे ( कलम ३०१ ). आतां हा मजकूर असा होईल.

" पूर्वीपासून श्रीची निस्पृह स्थीत आहे, ते प्रसिधच आहे. महाराजाचे भक्तीस्तव वैभव–पूजाधिकार करून कितेक भगतव्यानसार लीला वर्तलेः पुन्हा पूर्वस्थिती जैसी होती तैसीच आहे."

## २ अभ्यासपाठ.

" ते प्रसंगीं श्रीचे इछेस काय आले ते बोलिले कीं तुम्ही निस्पृह हे प्रयोजन तुम्हासी बोलिले नाहीं हा श्रीचे स्थलचा सर्व पारपत्याधिकार दिवाकर गोसावी यास श्रीचे कृपेने प्राप्त जाला आहे तो श्रीचे कार्येभाग येथायोग्य संपादितो. ( श्रीसंप्र० काग० लेखांक ५० )

कल्याण स्वामींनीं आपल्या अधिकाराबाहेरची कांहीं गोष्ट केल्यामुळें समर्थ त्यांचेवर रागावून त्यांना म्हणाले कीं 'तुम्ही निस्पृह असल्यानें तुम्हांस या उठाठेवींची गरज नव्हती. येथली व्यवस्था दिवाकर गोसावी याजकडे सोपविली आहे, तो ती बरोबर चालवितो' असा वरील मजकुराचा इत्यर्थ आहे.

'बोलिले कीं' येथें स्वल्पविराम पाहिजे (कलम २९८ क). येथून पुढचा मजकूर समर्थांच्या तोंडचा असल्यामुळें येथें व मजकुराच्या शेवटीं अवतरण चिन्हें पाहिजेत ( कलम ३०७ ). 'निस्पृह' येथें गौणवाक्य संपत असल्यामुळें तेथें स्वल्पविराम पाहिजे ( कलम २९८, ४ ) व 'बोलिलें नाहीं' येथें पूर्ण विराम पाहिजे ( कलम ३०१ ). 'प्राप्त झाला आहे' येथें वाक्य संपत असल्यामुळें तेथें व 'संपादितो' येथें ही पूर्ण विराम पाहिजे ( कलम ३०१ ). मग हा मजकूर असा होईल.

" ते प्रसंगीं श्रीचे इच्छेस काय आलें ते बोलिले कीं, 'तुम्ही निस्पृह, हे प्रयोजन तुम्हासी बोलिले नाहीं. हा श्रीचे स्थलचा सर्व पारपत्याधिकार दिवाकर गोसावी यास श्रीचे कृपेनें प्राप्त जाला आहे. तो श्रीचे कार्येभाग येथायोग्य संपादितो. "

## ३ अभ्यासपाठ.

पुढील कवितेंत विराम चिन्हें घालावयाचीं आहेत असें समजूं.

**तंव एकिं मतिवंतीं । या बोलाचिया खंती ।**
**म्हणितलें एया चांथी । अर्वाचीना ॥ १ ॥**

**हां हो परतत्वा आंतु । केउती प्रकृतीची मातु ।**
**हा क्षेत्रवृत्तांतु । उगेया आईका ॥ २ ॥** ( ज्ञानेश्वरी १३-४१,४२ )

अर्थः—इतक्यांत एक बुद्धिवंत या भाषणाचा राग मानून म्हणाले—ही बडबड अलीकडची आहे. अहो परतत्वाच्या आंत प्रकृतीची गोष्ट कुठली आणतां! हा क्षेत्राचा ( देहाचा ) वृत्तांत मुकाट्यानें ऐका.

'म्हणितलें' येथें वाक्य संपत असल्यामुळें तेथें विराम पाहिजे पण तो स्वल्प विराम पाहिजे, कारण पुढचा मजकूर त्या क्रियापदाचें कर्म आहे ( कलम २९८, ४ ). शिवाय तेथें व कवितेच्या अखेरीस अवतरण-चिन्हें पाहिजेत ( कलम ३०७ ). ' अर्वाचीना ' येथें वाक्य संपत असून भाषा तिरस्काराची असल्यामुळें तेथें उद्गार चिन्ह पाहिजे ( कलम ३०३ ख ). ' हां हो ' येथें संबोधन-दर्शक उद्गार चिन्ह पाहिजे ( कलम ३०३ ). ' व ' मातु ' येथें प्रश्न असल्यामुळें प्रश्न चिन्ह पाहिजे ( कलम ३०२ ). ' आइका ' येथें पूर्णविराम पाहिजे ( कलम ३०१ ). आतां या कविता अशा लिहिल्या जातील.

**तवं एकिं मतिवंतीं । या बोलाचिया खंती ।**
**म्हणितलें, " एयां चांथी । अर्वाचीना ॥ १ ॥**
**हां हो ! परतत्वा आंतु । केउती प्रकृतीची मातु ? ।**
**हा क्षेत्रवृत्तांतु । उगेयां आईका " ॥ २ ॥**

## ४ अभ्यासपाठ.

पुढील मजकुरांत विराम चिन्हें घालावयाचीं आहेत असें समजूं.

" एकदां आगगाडीच्या एका लहान फांट्याचा प्रवास त्यांना एकाच तिकिटावर रात्रींतून दोन तीन वेळां घडला. एकदां ते मुंबईहून पुण्यास जाणाऱ्या गाडीची कल्याण स्टेशनावर वाट पहात बसले असतां नव्हे निजले असतां त्यांच्या लागोपाठ तीन गाड्या चुकल्या " ( सुदाम्याचे पोहे—मुष्टि २९ )

'घडला' येथें गर्भित उपहास असल्यामुळें उद्गार चिन्ह पाहिजे (कलम ३०३ख.) ' बसले असतां ' याच्या पुढील ' नव्हे निजले असतां ' हा मजकूर मध्येंच खुलाशादाखल आल्यामुळें त्याच्या मागें पुढें अपसारण चिन्ह पाहिजे ( कलम ३०४, १ ), ' नव्हे ' येथें स्वल्प विराम पाहिजे ( कलम २९८-४ ). 'चुकल्या' येथें पूर्णविराम पाहिजे ( कलम ३०१ ). आतां हा मजकूर असा लिहिला जाईल.

" एकदां आगगाडीच्या एका लहान फांट्याचा प्रवास त्यांना एकाच तिकिटावर रात्रीतून दोन तीन वेळां घडला। एकदां ते मुंबईहून पुण्यास जाणाऱ्या गाडीची कल्याण स्टेशनावर वाट पहात बसले असतां–नव्हे, निजले असतां–त्यांच्या लागोपाठ तीन गाड्या चुकल्या. "

## ५ अभ्यास पाठ.

पुढील पद्यांत विरामचिन्हें घाला:—

**कच न दिसतां रडे सुरयानी तीतें पिता म्हणे कांगे।**
**वत्से रडसी ऐसें पुसतां तैसेंच ती पुन्हां सांगे॥ १॥**(मोरोपंत महाभारत)
**शुक्र म्हणे वत्से मी वांचवितों परि पुनः पुन्हां मरतो।**
**आग्रह धरूनि म्हणसी प्रेतगतिंगतहि कच पुन्हा परतो॥ २॥** (कित्ता)

## ६ अभ्यास पाठ.

पुढील मजकुरांत विराम चिन्हें घाला:—

" एक तर महाभारताचें सार जी भगवद्गीता जिचें माहात्म्य या देशांत तर प्राचीन काळापासून अतिशयित आहे व जिच्या योग्यतेचें प्रमाण दुसरें नको।बिचाऱ्या व्यासावर युरोपीय पंडितांनीं अलीकडे जो चोरीचा चार्ज आणला आहे तोच बस आहे त्या भगवद्गीतेवर प्रस्तुत ग्रंथांत मनोरम व्याख्यान आहे" ( निबंधमाला ).

## ७ अभ्यास पाठ.

पुढील पद्यांतील विरामचिन्हें दुरुस्त करा:—

**" विशालनेत्रा कमनीयविग्रहा ? वधू कुठें. राम कुठें वराक तो, ।**
**अहो तयांचा ! मज योग पद्मिनीकृशानुयोगापरि, वाम भासतो ॥१॥**
(वनविहार ६–६९ )

## ८ अभ्यास पाठ.

पुढील संवादांतील विरामचिन्हें दुरुस्त करा:—

दीक्षित. तें मी ओळखलेंच ? पण बायको विघ्न आणण्यासारखी नाहींना। एरवीं पोरीवर, उंची जडावाचे दागिने पडावयाचे आहेत. तेव्हां तसं करायची नाहीं। पण न जाणो:

शास्त्री, आणि विघ्न आणायलाच लागली. तर तिलाही एखादा डसठशीतसा दागिना केला, द्यायचा म्हणजे पडते समजूत, ( शारदा २–२ ).

# एकविसावा पाठ.

## मराठी शब्दांची व्युत्पत्ति, घटना व योजना.

३०९ मराठीच्या सजावटीला तिच्या शब्दांची व्युत्पत्ति, नव्या व जुन्या शब्दांची घटना, आणि त्यांची योजना यां संबंधी कांहीं माहिती असणें अवश्य आहे. कारण भाषेच्या स्वरूपांत आणि परंपरेनें तिच्या शब्दांच्या अर्थांतही कालमानानें फरक पडत जातो; अर्थात् तिच्या शब्दांच्या योजनेचें सर्व काळीं व सर्व प्रसंगीं एकच धोरण राहूं शकत नाहीं. क्वचित् एक कल्पना प्रदर्शित करणारे अनेक सूचक शब्द असतात व त्यांची व्युत्पत्ति भिन्न असते; अशा वेळीं व्युत्पत्ति-दृष्ट्या योग्य त्या शब्दांची निवड करावयाची असते. क्वचित् एखादी परभाषीय कल्पना आपल्या भाषेंत व्यक्त करावयाची असतां उचित शब्दाच्या अभावीं नवा प्रतिशब्द बनवावा लागतो. क्वचित् एकाच अर्थाचे अनेक शब्द असतां त्यांतील योग्य शब्दाची निवड केवळ प्रसंगानुरूप करावयाची असते. चांगले लेखक या तीन्ही कलांतही प्रवीण असतात, यामुळें त्यांची शब्दयोजना नेहमीं शुद्ध, सुंदर व समर्पक असते. या तीन्ही बाबींचा थोडा विचार करूं.

३१० मराठीच्या व्युत्पत्तीसंबंधानें प्रथम ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, मराठी भाषेंत आलेल्या शब्दांपैकीं फार मोठा भाग संस्कृतमधून तसाच, किंवा प्राकृत भाषांच्या द्वारानें आला आहे. तसाच आलेला भाग 'तत्सम' शब्द, व प्राकृताच्या द्वारानें आलेला भाग 'तद्भव' शब्द म्हणून प्रसिद्ध आहे. कांहीं मराठी शब्दांची व्युत्पत्ति अद्याप सांपडली नाहीं, त्या शब्दांस 'देशज' असें नांव आहे. इतर शब्द पार्शियन, अरबी, इंग्रजी वगैरे परभाषांतून आलेले आहेत. पैकीं संस्कृत किंवा अन्य भाषांतून आलेले 'तत्सम' शब्द मराठीनें बहुधा तसेच घेतले आहेत. क्वचित् उच्चार-सौकर्याकरितां थोडा फरक केलेला आढळतो. जसें:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| भानु | ( सं. ) | भानु-नू | रॉबिन्सन् | ( इं० ) | राबीसन. |
| गुण | ,, | गुण | पीरी | ( फ्रें. ) | पायरी ( आंबा ) |
| कल्लोल | ,, | कल्लोळ | कल्म्दान् | ( पार्शी. ) | कलमदान |
| रीति | ,, | रीत-ति-ती | आदब् | ( अरबी ) | अदब-बी |
| पोटॅटो | ( स्पॅनिश ) | बटाटा | तबीयत् | ( ,, ) | तब्बेत |

३११ प्राकृत भाषांच्या द्वारां आलेल्या शब्दांविषयीं पुढील नियम लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहेत.

( क ) संस्कृतमधील विसर्गाचा प्राकृतांत ' ओ ' होतो व मराठींत येतांना त्याचा लोप तरी होतो किंवा ' आ ' तरी होतो. जसें:–घोटकः—घोडओ–घोडा. घर्मः—घम्मो–घाम.

( ख ) संस्कृत शब्दांतील जोडाक्षरांचें प्राकृतांत सवर्ण द्वित्व होतें व मराठींत येतांना त्यांतील एकच वर्ण शिल्लक राहून मागील स्वर दीर्घ होतो. जसें:–निद्रा–निद्दा–नीद् ( ज ). कोष्ट–कोट्ठ–कोठा. पक्ष–पख्ख–पाख.

( ग ) कित्येक वेळां संस्कृत जोडाक्षराचें पृथक्करण होऊन त्यांत मराठी 'अ,' ' इ, ' किंवा ' उ ' मिसळला जातो. जसें:—भक्त–भगत. वर्ष–वरीस.

( घ ) संस्कृतमधील उपसर्गाचा आद्य स्वर लुप्त होऊन मराठी अपभ्रंश सिद्ध होतो. जसें:—अरण्य–अरण्ण–रान. अवस्थान—अवट्ठाण–वठाण. अभ्यंजन—भिजणें. अरघट्ट—रहट्ट–रहाट. उपानह्—वहाण.

( ङ ) अपभ्रष्ट प्राकृतांत दोन स्वर शेजारीं आल्यास मराठींत एकच स्वर संधि होऊन तरी येतो, किंवा दुसरें व्यंजन तरी घेऊन येतो. जसें:—खादण–खाअण–खाणें. हृदय—हिअअ–हिय्या. द्विगुण—दुउणो–दूण.

( च ) ' श, ष, स, ' आणि ' ह ' हे वर्ण संस्कृत शब्दाचे अखेरीस किंवा जोडाक्षराचे आरंभी आल्यास बहुधा आरंभींच्या स्वरांस विकृति उत्पन्न करतात जसें:—महिषी–ह्मस. पुष्प—फूल.

३१२ उच्चारसौकर्य हें प्राकृतत्वाचें मुख्य लक्षण असल्यामुळें केव्हां केव्हां संस्कृत समासांच्या, परभाषीय समासांच्या, व क्वचित् मराठी समासांच्याही उच्चारांत अवघडपणा येत असल्यास, एखाद् दुसऱ्या स्वराचा किंवा व्यंजनाचा लोप होऊन किंवा वर्णांतर होऊन त्याचें उच्चारण रूढ होतें. जसें:—

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सप्त + पर्णी | ( सं. ) | सातवीण | द्वि + प्रहर | ( सं. ) | दुपार |
| सीमा + उल्लंघन | ( ,, ) | शिलंगण | चर्म + कार | ( ,, ) | चांभार |
| भिल्ल + वटी | ( ,, ) | भिलवडी | अ + मंगल | ( ,, ) | ओंवळें |
| उष्ण + काल | ( ,, ) | उन्हाळा | आदित्य+ वाट | ( ,, ) | ऐतवडें |
| दीप + आवली | ( ,, ) | दिवाळी, दिपवाळी | सूत्र + कार | ( ,, ) | सुतार |
| | | | पद्म + आलय | ( ,, ) | पद्माळें |
| चंद्र + रात्रि | ( ,, ) | चांदरात | गुच्छ + आलय | ( ,, ) | घोसाळें |
| हिम + काल | ( ,, ) | हिंवाळा | अन्न + शुद्धि | ( ,, ) | अनशूद |
| यज्ञ + उपवीत | ( ,, ) | जानवें | गर्भ + अगार | ( ,, ) | गाभारा |
| गंगा + आलय | ( ,, ) | घंगाळ | चुल्ली + पिता | ( ,, ) | चुलता |
| स्कंध + कार | ( सं. ) | कहार | Elphin + stone | ( इं. ) | अलपिष्टण |
| आ + स्तरण | ,, | आथरूण | Captain + Stuart | ,, | इष्टुर फाकडा |
| प्र + आघुणिक | ,, | पाहुणा | | | |
| एक+ऊन+विंशति | ,, | एकोणिस | Rock + oil | ,, | राकेल |
| धूप + तेल | ,, | धुपेल | Who+comes + there | | हुकमडर |
| वरती + वळा | ( मरा. ) | वर्तवळा | | | |
| पाय + ठाय | ,, | पायठा | | | |
| गुरें + राख्या | ,, | गुराख्या | | | |
| आंबट + घाण | ,, | आंबटाण | | | |
| चिंच + पाणी | ,, | चिंचवणी | | | |

**२१३** उच्चारसौकर्याकरितां होणाऱ्या फेरफेरासंबंधीं पुढील आडाखे ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत.

( क ) संस्कृत क्ष बद्दल व ष बद्दल मराठींत ख होतो. जसें:—क्षीर-खीर. विष-विख.

( ख ) संस्कृत च्छ बद्दल च होतो. जसें:—गो + च्छिद्-गोचीड, गोचडी.

( ग ) संस्कृत स्त किंवा स्थ पदारंभीं आल्यास त्याबद्दल थ, आणि मध्यें आल्यास त्याबद्दल अनुक्रमें त्थ आणि ठ होतात. जसें:—स्तन-थान. प्रस्तर—पाथर. स्थविर-थेर. अस्थि--आठी.

( घ ) संस्कृत जोडाक्षराचें दुसरें व्यंजन व असल्यास त्याचा लोप होतो जसें:—ज्वलन–जळणें. उद्वाहन–वोह ( प ) णें.

( ङ ) संस्कृत स्क व ष्क बद्दल क किंवा ख येतो. जसें:—स्कंध—खांदा. शुष्क—सुका.

( च ) संस्कृत स्प, स्फ व ष्प बद्दल फ येतो. जसें:–स्पंद–फंद. बाष्प-वाफ.

( छ ) श्न, ष्ण, स्न आणि क्ष्ण यांबद्दल न्ह किंवा न येतो. जसें:—उष्ण–ऊन्ह. तृष्णा–तहान.

( ज ) पूर्ण अनुनासिकापुढें आलेल्या ' त ' चा स होतो. जसें:—कोमलता–कोंवसा. धीमत्ता–धिंवसा.

३१४ शब्दांच्या अर्थांत ज्या अनेक कारणांनी फरक पडत जातो त्यांत 'लक्षणा ' हें प्रधान कारण आहे. " मुख्यार्थास बाध आल्यानें त्याशीं संबद्ध अशा दुसऱ्या अर्थाचा बोध ज्या प्रक्रियेनें होतो तीस ' लक्षणा ' म्हणतात. " जसें:— रावण ( ओरडणारा ) =लंकेचा राजा. दुहिता ( पिळून काढणारी )=मुलगी, इ०. अशा शब्दांत इतिहास साठविलेला असतो. रावणाचा आवाज दहा माणसांच्या आवाजाइतका मोठा असावा, प्राचीन आर्य लोकांत मुलींकडे धार काढण्याचें काम असावें, इत्यादि ऐतिहासिक अनुमानें तर वरील शब्दांतून काढतां येतातच, पण प्रसंगीं व्युत्पत्तिदृष्ट्या त्यांची योजनाही करितां येते. जसें:—' दशवदन,–दशानन–लंकानाथ बोलतांच सीता भ्याली ' या शब्दप्रयोगापेक्षां ' रावण बोलतांच सीता भ्याली ' ही शब्दयोजना अधिक समर्पक आहे.

३१५ लक्षणेचें स्वरूप ( १ ) अर्थसंकोच, ( २ ) अर्थभ्रष्टता, ( ३ ) रूपभेद ( ४ ) एकाच शब्दाचे भिन्नार्थी दोन शब्द होणें, ( ५ ) भिन्नार्थी दोन शब्दांपासून एकच एकार्थी शब्द होणें, ( ६ ) अर्थांतर, इत्यादि प्रकारांनीं भाषेंत प्रकट होतें. मासल्याकरितां कांहीं उदाहरणें देतों.

| शब्द | मूळचा अर्थ | रूढ अर्थ किंवा रूप |
| --- | --- | --- |
| धर्म | स्वभाव | ईश्वरासंबंधीं कर्तव्य |
| ग्रहण | घेणें | चंद्रादिकांचा ग्रास |
| शाला | जागा | शिक्षणाची जागा |
| व्यसन | संकट | वाईट छंद |

| | | |
|---|---|---|
| प्रपंच | विस्तार | कंजूषपणा |
| अरिष्ट | निर्भय जागा | भयप्रद संकट |
| गवेष् ( गवसणें ) | गाई शोधणें | सांपडणें |
| त्रास | भीति | उपद्रव |
| आर्जव | सरळपणा | खुषामत |
| नासिका | नाक | नाकें ( नाकाप्रमाणें महत्त्वाची जागा ) |
| यात्रा | यात्रा ( धार्मिक ) | जत्रा ( बाजार ) |
| क्षत, शठ | खट | खट ( लुच्चा ) |
| क्वाथ, कृत्ति | कात | कात-थ |
| मौंजीबंधन | मुंजा गवताची दोरी बांधणें | मुंज |
| तत्वमसि | तें ब्रह्म तूं आहेस | पैसारूपी ब्रह्म, धन. |
| शुद्धि | शुद्ध करणें | आठवण, हुडकणें |
| छल | कपट | छळ |
| भूयसी | मोठी ( विशेषण ) | दक्षिणा |
| ताराचल | ताऱ्यांचें बळ | धांदल |
| सूतक | सुयेर ( जनमाशौच ) | मरणाशौच |
| पीतांबर | पिंवळें वस्त्र | रेशमी वस्त्र |
| आचार्य | दर्दी, वाकबगार | आचारी, सैपाक्या |
| रजक | रंगारी | परीट |
| व्याज | कपट | भांडवलावरील भाडें |
| मल्लिनाथी | मल्लिनाथाची टीका | सारवासारव |
| मधुकरी | भुंग्याची वृत्ति | माधुकरी, भिक्षा |
| वैश्वदेव-विसदेओ विस्तव | नित्ययज्ञांतील अग्नि | अग्नि, निखारा |
| हांजी हांजी | हो हो म्हणणें | खुषामत |
| हांबेलंडी | अरे भितऱ्या ! | गाळण |
| बारभाई | बारा असामींची जूट | बजबपुरी |

३१६ प्रसंगानुसार मराठीत नवीन शब्दांची घटना करण्याचा प्रसंग येतो. विशेषतः परभाषीय लेखांचें भाषांतर करितांना व शास्त्रीय शब्दांची परिभाषा लिहितांना नवे मराठी प्रतिशब्द बनविण्याची फार जरुरी उत्पन्न होते. अशा वेळीं मराठीचा मूळ झरा जी संस्कृत भाषा तिजमधील धातु, उपसर्ग, प्रत्यय इत्यादिकांचें साह्य घेऊन हवे तितके नवे शब्द बनविण्याची सोय आहे. एका 'हृ' धातूला वेगवेगळे उपसर्ग लावून 'आहार, प्रहार, अपहार, संहार, अभ्यवहार, अध्याहार, विहार, प्रतिहार, परिहार, उपहार' इत्यादि अनेक वेगवेगळ्या अर्थांचे शब्द बनले आहेत. त्याचप्रमाणें 'वाच्' या प्रयोजक धातूला भिन्न तद्धित प्रत्यय लागून 'वाचाल' ( बडबड्या ), 'वाग्मिन्' इत्यादि शब्द झाले आहेत. उपसर्गादिकांच्या या घटनाशक्तीचा उपयोग नवे शब्द बनवितांना फार होतो.

३१७ क्वचित् पर्शियन, अरबी इत्यादि परभाषांतल्या प्रत्ययादिकांच्या साह्यानेंही असे शब्द बनवितात. जसें:—Accountant हिशेबतपासनीस; Democracy लोकशाही; इ०. नवीन शब्दांच्या घटनेंत पुढील नियम लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहेत.

( क ) परभाषीय शब्द जर लॅटिन, ग्रीक इत्यादि संस्कृततुल्य भाषांपासून व्युत्पादितां येण्याजोगा असेल तर त्याच्या व्युत्पत्तीला अनुरूप अशा संस्कृत शब्दांपासूनच प्रतिशब्द बनवावा. नंतर शक्य असल्यास त्याची व्युत्पत्ति संभाळून त्याचें मराठी रूप करावें. हा प्रतिशब्द सर्वांत प्रशस्त होय. जसें:—Automobile हा शब्द Autos आणि Movere या दोन लॅटिन शब्दांपासून झाला आहे व ते शब्द आणि संस्कृतमधील 'आत्मन्' व 'मिव्' ( जाणें ) या शब्दांचें साधर्म्य आहे. पण 'मिव्' धातु प्रचारांतील नसल्यामुळें त्याजबद्दल दुसरा धातु घालून 'आत्मचलनी' 'आत्मगामिनी' इत्यादि शब्द बनवितां येण्याजोगे आहेत; व त्यांचें मराठीकरण करून 'आपचाली' 'आपजाई' इत्यादि शब्द होण्याजोगे आहेत.

( ख ) परभाषीय शब्दाचें संस्कृतशीं व्युत्पत्तिसादृश्य मिळण्याजोगें नसल्यास नुसत्या शब्दार्थावरूनच प्रतिशब्द बनवावा. जसें:—Article अग्रलेख. Torpedo पाणबुडी. इ.

( ग ) शब्दार्थास अनुसरून बनविलेला संस्कृत शब्द जर फार बोजड होऊं लागला आणि मराठी शब्द चांगलासा सिद्ध होत नसला तर प्रचलित पर्शियन

वगैरे भाषांतल्या शब्दादिकांच्या साह्यानें प्रतिशब्द बनवावा. जसें:—Dreadnot या शब्दाला संस्कृत किंवा मराठी शब्द बोजड होईलसा वाटल्यामुळें केसरी वर्तमानपत्रांत ' बे–डर ' असा मुसलमानी शब्द बनवून योजण्यांत आला.

( घ ) क्वचित् एखादी परकीय कल्पना कुठल्याच प्रतिशब्दानें मराठींत प्रदर्शित होत नसल्यास मूळचा परकीय शब्द तसाच घ्यावा लागतो. भलता प्रतिशब्द घातल्यानें मूळ शब्दाची कल्पना येऊं शकतच नाहीं, अशा वेळीं ही आपत्ति बिनतोड पतकरावी लागते. जसें:—Coat शब्दाचा अर्थ दुसऱ्या प्रतिशब्दानें येणें शक्य नसल्यामुळें ' कोट ' असाच शब्द मराठींत रूढ झाला. तसेंच ' स्टेशन मास्तर, शर्ट इ०.

( ङ ) पण परभाषीय शब्दांतील कल्पना जर मराठींत एका शब्दानें व्यक्त होण्याजोगी असली तर तिचें व्युत्पत्तिसाधर्म्य जमत नाहीं एवढ्याचकरितां परभाषीय शब्दाचा उपयोग करूं नये. तर त्याजबद्दल निदान अनुकरणात्मक मराठी शब्द तरी बनवावा. जसें:—Necktie गळोटी, Sweater घामोरी, Battery विजेरी इ०. सारांश, अर्थव्यंजना संभाळून क्रमानें मराठी–संस्कृत–पर्शियन–असा उतरत्या महत्त्वानें प्रतिशब्द बनविण्याचा उपाय समजावा व त्यांपैकीं कोणताच उपयोगी पडत नसल्यास परभाषीय शब्दांचा स्वीकार करावा.

३१८ शब्दांच्या योजनेंत देखील हेंच धोरण ठेवावें. सामान्यतः मराठी शब्दाला सर्वांत अधिक प्राधान्य, त्यानंतर संस्कृत शब्दाला, त्यानंतर मुसलमानी शब्दांना व त्यानंतर अन्यभाषीय शब्दांना प्राधान्य देऊन शब्दयोजना करावी. त्यांतूनही विवेचक दृष्टीनें पाहिल्यास पुराण कालाला, शास्त्रादि गंभीर विषयाला व पूर्वीच्या आदरणीय व्यक्तींना उद्देशून बोलतांना प्रौढ व तत्सम शब्दांची योजना विशेष इष्ट होईल; तर ऐतिहासिक कालाला, ऐतिहासिक व्यक्तींना व तत्कालीन वर्णनाला मुसलमानी वळणाचे शब्द अधिक अनुरूप होतील. ग्राम्य, खेडवळ संस्थांच्या वर्णनाला साधी तद्भव शब्दयोजना खुलून दिसेल, तर पाश्चात्य वळणाच्या कल्पना व्यक्त करण्यास पाश्चात्य वळणाचे अलीकडील शब्दप्रयोग योग्य होतील. हीच दृष्टि रसादिकांना लागू आहे. शृंगाराला गोड मराठी व मुसलमानी शब्द, वीराला जोरकस संस्कृत व पर्शियन शब्द, करुणाला साधे प्राकृत शब्द, भयानकाला भारदस्त संस्कृत शब्द व शांताला प्रेमळ तत्सम किंवा तद्भव शब्द विशेष समर्पक होतील.

## अभ्यासपाठ १ ला.

'दसरा,' 'शामदान,' वं 'पावसलॅकॅ' शब्दांची व्युत्पत्ति द्या. दसरा शब्दांत 'दस' आणि 'रा' अशीं दोन पदें पडण्याजोगीं असून दस हें दशचें रूप उघडच आहे. 'रा' हें 'हर'चें अवशिष्ट रूप पोहरा (अपो+हर) इत्यादि शब्दांतून सांपडतें. अर्थात् दश+हरा ही दसरा शब्दाची व्युत्पत्ति होय. 'शामदान' हा शब्द अरबी शमा (दिवा), दान (ठावकें) यांपासून झाला आहे. 'पावसलक' हा शब्द 'पाद+स्खलक' (पायानें ठेचकळत जाणारा) म्हणजे पर्यायानें 'पायदळ' असा व्युत्पादितां येईल.

## अभ्यासपाठ २ रा.

'दसरा' हा शब्द दशरात्रि या शब्दापासून व्युत्पादितां येईल काय ? नाहीं. कारण 'रात्रि' शब्दांतील 'रा' नुसताच शिल्लक राहून 'त्रि' चा लोप होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. 'चांद्रात,' 'दिनरात,' प्रमाणें 'दसरात' शब्द होईल.

## अभ्यासपाठ ३ रा.

एका जुन्या नाण्यावर 'देवलकुरस' अशीं अक्षरें आहेत; तर त्यावर तुम्हीं व्युत्पत्तिदृष्ट्या काय अनुमान काढाल ? एका पाणिनीय सूत्राप्रमाणें 'देवलदत्त, विलिवायुदत्त' इत्यादि शब्दांतील 'दत्त' चा लोप होऊन 'देवल', 'विलिवायु' इत्यादि संक्षेप शिल्लक राहतात. 'देवलकुरस' शब्दांतील अखेरचा स हा षष्ठीच्या स्य प्रत्ययाचा अवशेष दिसतो. यावरून देवल शब्दाला स्वार्थी 'क' प्रत्यय लावून व त्याला 'वर' शब्दाची षष्ठी जोडून झालेल्या 'देवलक वरस्य' या रूपाचा 'देवल कुरस' हा प्राकृत अपभ्रंश असावा. अर्थात् उपरोक्त नाणें 'देवलदत्त' नांवाच्या राजानें पाडलेलें असावें.

## अभ्यासपाठ ४ था

पुढील इंग्रेजी शब्दांना प्रतिशब्द बनवा. (१) Foot-board, (२) Sonnet आणि (३) Homo-genous, पद्-फलक (सं.); पायफळी (मराठी). स्वनित आणि समजातीय असे शब्द होतील.

## अभ्यासपाठ ५ वा.

(१) तारुण्यजन्य उद्दामपणा (२) रागानें केलेलें कृत्य, व (३) स्त्रीजा-

त्रीला उचित असा पराधीनपणा, या तीन परिस्थितींचें दर्शक असे कोणते 'स्त्री' वाचक शब्द उपयोगांत आणावे? १ प्रमदा, २ चंडी व ३ अबला हे तीन शब्द उपयोगांत आणावे.

## अभ्यासपाठ ६ वा.

( १ ) मेघ पाणी देतो, ( २ ) घोडा पाणी पितो, आणि ( ३ ) हा वृक्ष पार्वतीनें पाणी पाजून पोसला आहे; या तीन वाक्यांत अनुक्रमें पाण्याला कोणते शब्द घालावे? ( १ ) जीवन, ( २ ) पाणी व ( ३ ) पय.

## अभ्यासपाठ ७ वा.

'Inertia' व Supine या शब्दांना कोणते मराठी प्रतिशब्द सुचवाल? Serpent आणि Servant या शब्दांना कोणते सुचवाल?

## अभ्यासपाठ ८ वा.

'सासिन्नणें,' 'भरंवसा,' 'आराणूक,' 'चवरें,' 'ठी,' 'वोल' ( गहाण ), 'चोखालणें,' 'पवाडा' ह्या ज्ञानेश्वरकालीन शब्दांची व्युत्पत्ति द्या. सस्य–सस्यायते–सासिन्नणें. भरवत्ता-भरवस्सा–भरवसा. आराम (प्र. क्रि.) + णूक ( प्रत्यय )–आराणूक. चत्वरम्—चव्वर–चवरें. स्थिति–ठिइ–ठी. उद्वल–उव्वल·वोल ( वळवून घेण्याजोगी वस्तु ). चोष्यायते—चोखालणें. अप ( र ) वृत्त–अपवट्ठ पवाड ( पोवाडा ).

## अभ्यासपाठ ९ वा.

'पडोसा, व पडताळा' या शब्दांची व्युत्पत्ति द्या. पटवत्ता—पडवस्सा—पडोसा. पटताल—पडताळा. सराफ लोक मोत्यांची किंमत ठरवितांना हातावर वस्त्र टाकून तळहातावर लिहितात त्यावरून हे शब्द व्युत्पादिलेले दिसतात.

# बाविसावा पाठ.

## वाक्यपरिच्छेद व वाक्यविस्तार.

३१९ वाक्यपरिच्छेद म्हणजे एखादें वाक्य घेऊन त्याचे निरनिराळे अवयव व त्या अवयवांचा परस्पर संबंध यांची व्यवस्थित फोड करणें, व वाक्यविस्तार म्हणजे मूळच्या वाक्यांत वेगवेगळ्या अवयवांची भर घालून वाक्याचा अर्थ व व्याप्ति वाढविणें. अर्थात् दोनींचाही उपयोग भाषेच्या सजावटीला असल्यामुळें त्यांचा क्रमानें विचार करूं.

३२० वाक्याचे तीन प्रकार आहेतः—( १ ) शुद्ध, ( २ ) मिश्र आणि ( ३ ) संयुक्त.

### १ शुद्धवाक्य.

शुद्ध वाक्याचे ' उद्देश्य ' व ' विधेय ' हे दोनच मुख्य घटक असतात, परंतु प्रसंगीं अनेक उद्देश्यें व एकच विधेय किंवा अनेक विधेयें व एकच उद्देश्य अशीही त्याची रचना होते. जसें:— ' पक्षी उडतात. ' ' तो आला व लगेच गेला. ' ' हरी व गोविंदा येतील '

ज्याच्याबद्दल कांहीं सांगितलें असतें तें ' उद्देश्य ' व जें काय सांगितलें असतें तें ' विधेय ' होय.

### (क) उद्देश्य.

वाक्यांतील उद्देश्य हें ( १ ) नाम, ( २ ) सर्वनाम, ( ३ ) विशेषण किंवा कृदन्त, ( ४ ) शब्दसमुच्चय किंवा ( ५ ) नामवाक्य असूं शकतें. जसें:— ' अरुणोदय झाला. ' ' तो मला म्हणाला. ' ' शहाणा ही गोष्ट तेव्हांच उमगेल. ' ' करणारा भरील. ' ' दुबळ्यांचा नाश होणें निसर्गसिद्ध आहे. ' ' दुःखी मनुष्यास छळावें हें इष्ट नाहीं. '

**टीपः**— वाक्यांतील उद्देश्य हें सामान्यतः प्रथमेत असतें त्यावेळीं त्यास ' कर्ता म्हणतात. केव्हां केव्हां तें तृतीयेंत किंवा चतुर्थींत असतें तेव्हां त्यास

'कर्तृपद' म्हणतात. जसें:—'राम रावणास मारिता झाला' (कर्ता). 'रामानें रावण मारिला' (कर्तृपद). 'मला चालवतें' (कर्तृपद).

## उद्देश्यविस्तार.

उद्देश्याला (१) विशेषण किंवा कृदन्त, (२) षष्ठ्यन्त शब्द, (३) समान-विभक्त्यन्त पद, (४) शब्दसमुदाय किंवा (५) नामवाक्य जोडून त्याचा विस्तार करितां येतो. जसें:— 'मुलगा आला.' 'शहाणा मुलगा आला.' 'रानड्यांचा शहाणा मुलगा आला.' 'विठू, रानड्यांचा शहाणा मुलगा आला.' 'आपलें नशीब उघडणें हें आपल्याच हातीं असतें.' 'नीतीनें वागावें हें रास्त आहे.'

## (ख) विधेय.

वाक्यांतलें 'विधेय' हें एखादें एकेरी क्रियापदरूप, किंवा कृदन्तासह जोड क्रियापदरूप असूं शकतें. जसें:—'मी बसलों.' 'तो चालूं लागला.' 'तिनें तें काम करून टाकलें.'

विधेयावरून उद्देश्याची 'स्थिति,' उद्देश्याची 'कृति' किंवा उद्देश्याचा 'अनुभव' याचा बोध होतो. विधेयाचा विस्तार तीन प्रकारांनीं करितां येतो. (१) शक्य तर क्रियापदास कर्म घालून, (२) जरूर तेथें क्रियापदास पूरक घालून, व (३) क्रियाविशेषणार्थी शब्द घालून.

## कर्म.

वाक्यांतील कर्म हें 'प्रत्यक्ष' व 'अप्रत्यक्ष' किंवा 'गौण' असें दोन प्रकारचें असूं शकतें. प्रत्यक्ष कर्मावर क्रियेचा प्रत्यक्ष परिणाम होतो व तें द्वितीया विभक्तींत असतें. अप्रत्यक्ष कर्म क्रियेचें पूरक असतें व तेंही द्वितीयेंतच असतें; मात्र ही द्वितीया अप्रत्यय असते. 'करणें, समजणें, मानणें, बोलणें, म्हणणें, नेमणें, सोडणें' इ० क्रियापदें असलें पूरक कर्म घेतात. जसें:—'राजा देवदत्तास कारभारी नेमतो.' 'मी तुला मोकळा सोडणार नाहीं.'

प्रत्यक्ष कर्म हें (१) नाम, (२) सर्वनाम, (३) विशेषण किंवा कृदन्त (४) शब्दसमुदाय किंवा (५) नामवाक्य असूं शकतें. जसें:—'तो तोंड धुतो' 'भाग्यवंत म्हणूं तया,' (तुकाराम). 'जातों मी त्याकडे हित वदाया' (मोरोपंत)

" तो नदीत पोहणें शिकला ". " की जरि म्हणाल ' असतां जन्मशुचि स्वपद-नीरजा मिळतो' " ( मोरोपंत ).

संस्कृतांत जीं ' दुहादि ' विकल्पानें दोन कर्मे घेणारीं क्रियापदें सांगितलीं आहेत त्यांपैकीं ' जि ' या क्रियापदाची समानार्थक ' लुबाडणें, बुचाडणें, नागवणें ' एवढींच क्रियापदें दोन कर्मे घेतात व त्यांची दोघांचीही मराठींत सप्रत्यय द्वितीया असते. जसें:—" त्यानें मला हजाराला बुडविलें—नागविलें—बुचाडलें. " बाकीच्या क्रियापदांपैकी ' याच् ' ( मागणें ), ' प्रच्छ् ' ( विचारणें, पुसणें ), आणि ' नी, हृ, वह् ' ( नेणें, धाडणें, पाठविणें, पोंचविणें ) या क्रियायदांचें गौण कर्म मराठीत अव्ययार्थी चतुर्थीत असतें. जसें:—" तो मला प्रश्न विचारितो. '

' देणें, शिकविणें, सांगणें, पाठविणें ' इ० इंग्रेजींत द्विकर्मक मानलेल्या क्रियापदांचे गौण कर्मही मराठींत अव्ययार्था चतुर्थीत असतें. जसें:—" मी तुला एक नामी युक्ति सांगतों. "

कांहीं कर्मे क्रियार्थकवाचक शब्दांचीं बनलेली असतात, त्यांना सजातीय कर्मे म्हणतात. जसें:—' तो रडगाणें गातो. ' ' आम्ही साधें जेवण जेवतों. '

## कर्माचा विस्तार.

कर्माचा विस्तार उद्देश्याच्या विस्ताराप्रमाणेंच ( १ ) विशेषण किंवा कृदन्त ( २ ) षष्ठ्यन्त शब्द, ( ३ ) समान विभक्त्यन्त शब्द, ( ४ ) शब्दसमुदाय किंवा ( ५ ) नामवाक्य अथवा विशेषणवाक्य घालून करितां येतो. जसें:— ' तो अवघड काम करितो. ' ' मी माधवाच्या मुलास—तात्यास बोलावीन. ' ' तूं आज ऐनवेळीं हजर राहणें साधलेंस. ' ' मारुति ब्रह्मांडाचा भार वाटावा असा पर्वत उचलता झाला. ' ' गुरुजी, नीतीनें वागावें हें ठीकच सांगतात. '

## विधेयाचा विस्तार.

विधेयाचा विस्तार ( १ ) क्रियाविशेषण ( २ ) क्रियाविशेषणार्थी कृदन्त किंवा ( ३ ) इतर—विभक्त्यन्त शब्द घालून करितां येतो:—'ती हळू चालते.' ' तो हसत बोलतो. ' ' ते वेगानें पळाले. ' ' सुतार झाडावर चढला. '

अशा रीतीनें विधेयाच्या होणाऱ्या विस्ताराचें वर्गीकरण पुढील नऊ प्रकारांत येतें:—( १ ) कालदर्शक ( २ ) स्थलदर्शक ( ३ ) रीतीदर्शक ( ४ ) कार-

णदर्शक ( ५ ) हेतुदर्शक ( ६ ) परिणामदर्शक ( ७ ) संकेतदर्शक ( ८ ) विरोधदर्शक, व ( ९ ) तुलनादर्शक. जसें:--( १ ) तो फार दिवस आजारी आहे. ( २ ) मी त्याला बागेजवळ भेटलों.' ( ३ ) 'रम्य उषा हसत हसत आली' ( रेंदाळकर ). ( ४ ) 'तो आल्यामुळें काम झालें.' ( ५ ) 'विद्या-वृद्धीसाठीं सरकारनें शाळा स्थापन केल्या आहेत.' ( ६ ) 'तो लोकांनीं हसण्या-जोगें वागतो.' ( ७ ) 'असें केल्यावांचून सुटका नाहीं.' ( ८ ) 'तुला सांगून तरी काय उपयोग !' ( ९ ) 'गोविंदापेक्षां जनू पुरवला.'

## २ मिश्रवाक्य.

ज्या वाक्यांत एक प्रधान वाक्य किंवा वाक्यांश असून एक किंवा अधिक गौणवाक्यें असतात त्यास 'मिश्रवाक्य' असें म्हणतात. प्रधान उद्देश्य व विधेय ज्या भागांत असेल त्यास 'प्रधान वाक्य' असें म्हणतात व त्यावर अवलंबून असणाऱ्या वाक्यास 'गौण वाक्य' असें म्हणतात. जसें:—'ज्या मनुष्याविषयीं मी बोलत होतों ( गौण ), तो हा' ( प्रधान ). गौणवाक्याला एकंदर मिश्र वाक्यांत जें काम करावें लागतें त्यावरून त्याचे ( १ ) नामवाक्य, ( २ ) विशेषणवाक्य, व ( ३ ) अव्ययवाक्य असे तीन प्रकार होतात, व ते वाक्यांतील अर्थसंदर्भावरून ओळखावयाचे असतात.

**नामवाक्य** हें नामाचें कार्य करितें व तें क्रियापदाचा कर्ता किंवा कर्म असतें. तें जेव्हां कर्तृस्थानीं असतें तेव्हां त्याच्यापुढें 'हें' किंवा 'असें' इत्यादि सर्वनाम येतें; व जेव्हां तें कर्मस्थानीं असतें तेव्हां त्याच्यापूर्वी 'कीं' किंवा 'जे' हें अव्यय तरी येतें, किंवा त्याच्यापुढें 'असें' हें सर्वनाम तरी येतें. नामवाक्य क्वचित् 'असणें, भासणें, दिसणें, गमणें, वाटणें, आवडणें' इत्यादि क्रियापदांचें विधेयपूरक होऊन येतें. जसें:—'तं आतां घरीं जावेंस हें बरें दिसतें' ( कर्ता ) 'स्त्रीस म्हणे ( कीं ) सुभगे ! त्वां मृदु मांडा मांडिली' ( कर्म ). 'त्याचें मत असें आहे कीं मला यश मिळावें ( विधेयपूरक, 'असें' याशीं समान प्रथमा ).

**विशेषणवाक्याचा** विशेषणासारखा उपयोग होतो. त्याचे आरंभीं बहुधा संबंधी सर्वनाम प्रकट किंवा गुप्त असतें. जसें:—'ज्याला कर नाहीं तो डर धरीत नाहीं.' 'चढेल तो पडेल.'

**अव्ययवाक्य** हें वाक्यांत अव्ययाचें काम करितें. त्यावरून 'काल, स्थल, रीति, कारण, हेतु, परिणाम, संकेत, विरोध आणि तुलना यांचा बोध होतो.

जसें:—' जेव्हां तो आला तेव्हां काम झालें ' ' जर तूं येशील तर तो ऐकेल ' ' ज्या अर्थी तात्यांनीं मनावर घेतलें आहे त्या अर्थी लग्न जमणार, ' इ०

## ३ संयुक्तवाक्य.

दोन अथवा अधिक प्रधान वाक्यें ' आणि, किंवा, परन्तु, म्हणजे ' इत्यादि उभयान्वयी अव्ययानें जोडून त्यांचें एकच वाक्य बनविलें असलें म्हणजे त्या एकंदर वाक्याला ' संयुक्तवाक्य ' असें म्हणतात. संयुक्त वाक्याचे घटक पुढील-प्रमाणें असूं शकतातः—

( १ ) दोन किंवा अधिक शुद्ध वाक्यें.

( २ ) दोन किंवा अधिक मिश्रवाक्यें, व

( ३ ) एक अथवा अधिक शुद्ध वाक्यें आणि एक अथवा अधिक मिश्र-वाक्यें. जसें:—' तो आला आणि लगेच प्रळय उडाला. ' ' तो म्हणाला कीं मी घरीं जाईन, पण मला तें पसंत पडावें असें नव्हतें. ' ' मला वाटतें कीं जर तो चांगला अभ्यास करील तर यंदांच परीक्षेंत पास होईल, पण तसा संभव दिसत नाहीं. ' ' तो असें म्हणाला आणि पांडू गांवास निघाला; कारण कीं त्याचे घरीं पाहुणे यावयाचे होते व त्यांना घेऊन त्यास लग्नास जावयाचें होतें. '

मिश्रवाक्य व संयुक्तवाक्य यांमधील फरक असा आहे कीं पहिल्यांत फक्त एकच मुख्य वाक्य असतें व बाकीचीं गौण वाक्यें त्यावर अवलंबून असतात; आणि संयुक्तवाक्यांत दोन अथवा अधिक स्वतंत्र वाक्यें शुद्ध किंवा मिश्र स्वरूपांत असतात.

## परिच्छेदाविषयीं सामान्य सूचना.

( १ ) ज्या वाक्याचा परिच्छेद करावयाचा तें शुद्ध आहे, मिश्र आहे कीं संयुक्त आहे हें प्रथम पहावें. वाक्य जर मिश्र असेल तर प्रधान वाक्य निवडून काढावें, व तशींच गौण वाक्येंही काढावीं. जर वाक्य संयुक्त असेल तर त्यांतील निरनिराळीं समान वाक्यें काढावीं. नंतर निरनिराळीं वाक्यें प्रथम क्रमानें मांडून त्यांस क्रमांक द्यावे व त्यांचा खुलासा सांगावा.

( २ ) कधीं कधीं वाक्य पूर्ण होण्यास लागणारे सर्वच शब्द वाक्यांत असत नाहींत. अशा वेळीं जरूर ते शब्द वाक्यांत अध्याहृत घ्यावे व तें " संक्षिप्त वाक्य पूर्ण करावें. "

( ३ ) शुद्ध वाक्यांत पहिल्यानें क्रियापद पहावें, मग त्याचा विस्तार, मग उद्देश्य व त्याचा विस्तार, मग असल्यास कर्म व त्याचा विस्तार, व शेवटीं विधेय-पूरक शोधून काढावें.

( ४ ) वाक्य अवलंबी किंवा गौण असल्यास वरीलप्रमाणेंच करावें. तसेंच तें वाक्य कोणत्या प्रधान वाक्यावर अवलंबून आहे व त्याचा त्याच्याशीं काय संबंध पोचतो हेंही पहावें.

( ५ ) प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें यांच्या योगानें झालेलीं शब्दांचीं सविभक्तिक रूपें नेहमींच विधेय-विस्तारांत जातात असें नाहीं. ज्या शब्दांकडे किंवा वाक्यांकडे त्यांचा संबंध लागत असेल त्यांच्याबरोबर तीं सांगावीं.

( ६ ) 'असणें, होणें' इ० अकर्मक क्रियापदांना पूरक होणारे प्रथमान्त शब्द व 'करणें, नेमणें' इ० क्रियापदांनीं पूरक होणारे द्वितीयान्त शब्द विधेयपूरकांत घालावे.

( ७ ) 'कर्ता' व 'कर्तृपद' यांतील भेद चांगला लक्ष्यांत ठेवावा. प्रथमेंत असलेलें उद्देश्यच 'कर्ता' या सदरांत येऊं शकतें. तृतीया किंवा चतुर्थींत असलेल्या उद्देश्याला 'कर्तृपदा'च्या सदरांत घालावें. 'वाटणें, सांपडणें, आवडणें' इ० कांहीं अकर्मक क्रियापदांच्या बनलेल्यीं वाक्यांत कर्तृत्व एखाद्या पदार्थाकडे जाऊन व्यक्तिवाचक नाम क्रियाविशेषणाच्या सदरांत जातें इकडे लक्ष्य ठेवावें.

( ८ ) कर्मणि व भावे प्रयोगांतील उद्देश्य तृतीया विभक्तींत असल्यानें तें कर्तृपद होतें. शक्यार्थी, व मनाचे अनुभव दाखविणारी वाक्यरचना असतांना उद्देश्य चतुर्थींत राहून कर्तृपद होतें. कर्तरि प्रयोगांतील उद्देश्य प्रथमेंत असून कर्ता असतें.

( ९ ) परिच्छेदाचें कोष्टक पुढीलप्रमाणें तयार करावें. प्रथम 'उद्देश्य' व 'विधेय' असे दोन मथळे वर मांडून, उद्देश्याखालीं 'कर्ता व कर्तृपद' असे दोन पोटमथळे करावे, व विधेयाखालीं 'कर्म, विधेयपूरक, विधेयविस्तार व क्रियापद' असे चार पोटमथळे करावे. अगदीं प्रारंभाला उभयान्वयी अव्ययाला एक लहानसें सदर राखावें. नंतर परिच्छेद करावयाच्या वाक्यांतील शब्द संदर्भानुरूप त्या त्या मथळ्याखालीं भरावे.

आतां निरनिराळ्या जातींच्या कांहीं वाक्यांचें पृथक्करण करून दाखवूं.

## १ शुद्ध वाक्यें.

( १ ) गामानें कालिकोट येथील राजा झामोरिन ह्यास आपल्या राजाचीं पत्रें दिलीं.

( २ ) हा कुत्रा व हें मांजर जिवलग मित्र बनले आहेत.

( ३ ) अवरंगजेब प्रबळ बादशहा झाला.

( ४ ) हरीला हें काम केलें पाहिजे.

( ५ ) तो निघून गेल्याचें ऐकून मला वाईट वाटलें.

| | उभया अन्वय | उद्देश्य | | | विधेय | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | कर्ता | कर्तृपद | कर्म | विधेयपूरक | क्रियाविशेषण | क्रियापद |
| (१) | | | गामानें | आपल्या राजाचीं पत्रें | | कालिकोट येथील राजा झामोरिन ह्यास | दिलीं |
| (२) | | हा कुत्रा व हें मांजर | | | जिवलग मित्र | | बनले आहेत. |
| (३) | | अवरंगजेब | | | प्रबल बादशहा | | झाला |
| (४) | | | हरिला | हें काम | | | केलें पाहिजे |
| (५) | | वाईट | | | | मला, तो निघून गेल्याचें ऐकून | वाटलें |

## २ मिश्रवाक्यें.

| वाक्य | त्याची फोड |
|---|---|
| ( १ ) त्यावेळीं समुद्रपर्यटण निषिद्ध मानीत नसत | १ नामवाक्य, ‘ असें ’ याशीं समान प्रथमा. |
| ( २ ) असें दिसतें. | २ मुख्य वाक्य |

| | |
|---|---|
| ( १ ) गुरुपत्नीनें एकदां सहज म्हटलें | १ मुख्य वाक्यांश |
| ( २ ) कीं, घरांतील सरपण अगदीं सपलें, | २ नामवाक्य, 'म्हटलें' याचें कर्म |
| ( ३ ) आतां कसें करावें ? | ३ ,, ,, ,, |

| | |
|---|---|
| ( १ ) जिच्या प्राप्तीसाठीं अल्लाउद्दिनानें इतका खटाटोप केला, | १ विशेषणवाक्य 'पद्मिनी' शब्दास |
| ( २ ) ती पद्मिनी मात्र त्याच्या हातीं मुळींच लागली नाहीं. | २ मुख्य वाक्य |

| | उभ० अव्यय | उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | कर्ता | कर्तृपद | कर्म | विधेयपूरक | क्रियाविशेषण | क्रियापद |
| (१) | | असें | | | | | दिसतें |
| (२) | | ( लोक ) | | समुद्रपर्यटन | निषिद्ध | त्यावेळीं | मानीत नसत. |
| १ | | | गुरुपत्नीनें | | | एकदा, सहज | म्हटलें |
| २ | कीं | घरांतील सरपण | | | | अगदीं | संपलें |
| ३ | | ( मी ) | | कसें | | आतां | करावें |

| | उभ० अव्यय | उद्देश | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | कर्ता | कर्तृपद | कर्म | विधेयपूरक | क्रियाविशेषण | क्रिया. |
| १ | | ती पद्मिनी | | | | मात्र त्याच्या हातीं मुळींच | लागली नाहीं. |
| २ | | | अल्लाउद्दिनानें | इतका खटाटोप | | जिच्या प्राप्तीसाठीं | केला. |

## ३ संयुक्त वाक्यें.

| | |
|---|---|
| ( १ ) श्रीमंत चतुर्भुज झाले | १ प्रधान वाक्य |
| ( २ ) म्हणजे त्यांचें लग्न झालें. | २ प्रधान वाक्य |
| ( १ ) हे जे बुडबुडे आले | १ विशेषण वाक्य 'ते' या सर्वनामास |
| ( २ ) ते पंचपात्रींतील हवा बाहेर पडल्यामुळें आले | २ प्रधान वाक्य |
| ( ३ ) व पाण्याला भांड्यांत शिरण्याला वाव सांपडली. | ३ प्रधान वाक्य |

| उभ० अव्यय | उद्देश्य | | विधेय | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | कर्ता | कर्तृपद | कर्म | विधेयपूरक | क्रियाविशेषण | क्रियापद. |
| १ | श्रीमंत | | | चतुर्भुज | | झाले |
| २ म्हणजे | त्यांचें लग्न | | | | | झालें |
| १ | हे जे बुडबुडे | | | | | आले |
| २ | ते | | | | पंचपात्रींतील हवा बाहेर पडल्यामुळें | आले |
| ३ व | वाव | | | | पाण्यालाभांड्यांत शिरण्याला | सांपडली. |

## अभ्यासपाठ १ ला.

" ज्याची प्राप्ती केवळ रोज एक रुपया असून ज्याच्या पदरीं चार माणसें आहेत, अशा मनुष्यानें सुंदर दिसतें म्हणून एक साठ रुपयांचें तावदानी झडपांचें कपाट विकत घेणें व मग तें रिकामें राहिलें तर विशोभित दिसेल, म्हणून त्यांत ठेवण्याकरितां गोकाकच्चीं सुंदर रंगीत फळें वगैरे सामान आणविणें, हें पहिल्या प्रकारच्या उधळेपणाचें उदाहरण होय. " या वाक्याचा परिच्छेद करा. पोटवाक्यें अशीं होतील:—

| | |
|---|---|
| ( १ ) अशा मनुष्यानें एक साठ रुपयांचें तावदानी झडपांचें कपाट घेणें व मग त्यांत ठेवण्याकरितां गोकाकची सुंदर रंगीत फळें वगैरे सामान आणविणें हें पहिल्या प्रकारच्या उधळेपणाचें उदाहरण होय. | मुख्य वाक्य |
| ( २ ) ज्याची प्राप्ती केवळ रोज एक रुपया असून ज्याच्या पदरीं चार माणसें आहेत. | विशेषण वाक्य, 'अशा मनुष्यानें' कडे संबंध. |
| ( ३ ) सुंदर दिसतें म्हणून. | अव्यय वाक्य 'विकत घेणें' याकडे संबंध |
| ( ४ ) (जर) तें रिकामें राहिलें. | अव्यय वाक्य 'विशोभित दिसेल' याकडे संबंध. |
| ( ५ ) तर तें विशोभित दिसेल म्हणून. | अव्यय वाक्य 'आणविणें' कडे संबंध. |

| उभ० अव्यय | उद्देश्य. | | विधेय. | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | कर्ता | कर्तृपद | कर्म | विधेय पूरक | क्रिया-विशेषण. | क्रियापद |
| १ | अशा-आणविणें. | | | पहिल्या प्रकारच्या उधळेपणाचें उदाहरण. | | होय |
| २ | चार माणसें | | | | ज्याची-पदरीं | आहेत |
| ३ म्हणून | ( कपाट ) | | | सुंदर | | दिसतें |
| ४ ( जर ) | तें | | | रिकामें | | राहिलें |
| ५ तर, म्हणून | तें | | | विशोभित | | दिसेल |

## अभ्यासपाठ २ रा.

" त्याला मुंबईस जावयाचें होतें " ह्या वाक्याचा परिच्छेद सांगा. त्याला-कर्तृपद, मुंबईस-क्रियाविशेषण, जावयाचें होतें—क्रियापद.

## अभ्यासपाठ ३ रा.

( १ ) त्याचें घर बांधावयाचें आहे, ( २ ) त्यानें घर बांधावयाचें आहे, व ( ३ ) त्याला घर बांधावयाचें आहे, या तीन वाक्यांचा परिच्छेद कसा कराल ?

पहिल्या वाक्यांत त्याचें घर–कर्ता, बांधावयाचें–विधेयपूरक व आहे–क्रियापद. दुसऱ्या वाक्यांत त्यानें–कर्तृपद, घर–कर्म, बांधावयाचें आहे–क्रियापद. तिसऱ्या वाक्यांत त्याला–कर्तृपद, घर–कर्म, बांधावयाचें आहे–क्रियापद.

## अभ्यासपाठ ४ था.

'**वसंत**' या शब्दावरून वाक्य बनविणें.

( १ ) वसंत शोभा देतो.

( २ ) ऋतूंत श्रेष्ठ म्हटलेला वसंत शोभा देतो.

( ३ ) ऋतूंत श्रेष्ठ म्हटलेला वसंत वनांना आणि उपवनांना शोभा देतो.

( ४ ) ऋतूंत श्रेष्ठ म्हटलेला वसंत आपल्या आगमनानें चोहोंकडे पल्लवांकुरांची व फुलांची गर्दी करून, वनांना आणि उपवनांना शोभा देतो.

## अभ्यासपाठ ५ वा.

'चंद्र' हें नाम आणि 'फावणें' (सांपडणें) हें क्रियापद यांचा उपयोग करून वाक्य बनवा.

हें वाक्य अनेक प्रकारांनीं करितां येईल. जसें:—

( १ ) चंद्राचें चांदणें लुटावयास पाहिजे त्याला फावतें.

( २ ) सूर्यास्त झाल्यावर चंद्राला प्रकाश पाडावयास फावतें.

( ३ ) चंद्राचें चांदणें मनोहर पडतें पण त्याची मौज भोगावयास सर्वांसच फावत नाहीं.

( ४ ) "**चंद्रातें आंगवणें । भोगुनि चकोर सिहाणे ।**
**तऱ्हीं फावे जैसें चांदिणें । भलतेया ॥ १ ॥**" (ज्ञानेश्वर).

## अभ्यासपाठ ६ वा.

'जितकी' आणि 'त्यापेक्षां' या शब्दांचा उपयोग करून वाक्य बनवा.

( १ ) तुला या पुस्तकाची गरज जितकी आहे, त्यापेक्षां मला अधिक आहे.

( २ ) आतांपर्यंत परीक्षेची काळजी जितकी केलीस त्यापेक्षां अधिक करावयास नको.

( ३ ) जितकी आशा वाढवावी तितकी निराशा होते, त्यापेक्षां आशाच सोडलेली काय वाईट ?

( ४ ) सर्कसवाल्याला आपल्या ताब्यांतील जनावरें कह्यांत ठेवण्याला जितकी यातायात पडते त्यापेक्षां किती तरी पट फोटोवाल्यांला आपल्या यजमानांना शिस्तीनें बसवितांना पडते. ( सुदाम्याचे पोहे ).

## अभ्यासपाठ ७ वा.

४. पुढील शब्दांत बाहेरचा शब्द न घालतां वाक्य बनवा.

"नांवाचा, गांवांत, रहात, आमच्या, असे, या, हसनभाई, गरीब, एक, मुसलमान"

असल्या प्रश्नांत प्रथम कर्ता व क्रियापद हुडकून काढावींत. या वाक्यांत क्रियापदासारखीं दिसणारीं रूपें 'असे' व 'या' हीं दोनच आहेत. त्यांतील 'या' हें क्रियापद मानल्यास वाक्य आज्ञार्थी होऊन बाकीच्या शब्दांना अर्थ लागेनासा होईल, सबब त्यास सर्वनामाचें रूपच मानलें पाहिजे. अर्थात् 'रहात असे' हें क्रियापद ठरलें. 'एक मुसलमान' हें उद्देश्य असून 'हसन भाई या नांवाचा' हा त्याचा विस्तार आहे. 'गरीब' हाही विशेषणात्मक उद्देश्यविस्तारच आहे. 'आमच्या गावांत' हें स्थलार्थी विधेयपूरक बाकी राहिलें. आतां हें वाक्य असें झालें:—

"आमच्या गांवांत हसनभाई या नांवाचा एक गरीब मुसलमान रहात असे." ( सुदा. पोहे ).

## अभ्यासपाठ ८ वा.

पुढील अर्धवट वाक्यें पुरीं करा.

( १ ) तेलंगभट याचनेला ... ते बहुधा दोघांचौघांच्या जमावानें ...

( २ ) कांहीं ... एखाद्या धर्मसंस्थेच्या नांवाखालीं ... उकळीत असतात.

( ३ ) लंकापती उठुनि ... हळूच ... ॥
जातां निरोप जनकासहि तो न मागे ॥ ( गृहविहार )

यांपैकीं पहिल्या वाक्यांत दोन्ही ठिकाणीं विधेय गुप्त आहे, व संदर्भावरून तें 'निघतात, जातात, येतात' असें कांहीं तरी पाहिजे.

दुसऱ्या वाक्यांत 'उद्देश्य' गुप्त आहे व 'विधेयपूरक' म्हणजे 'कर्मही' गुप्त आहे. पैकीं अर्थावरून व उकळणें या क्रियापदावरून 'पैसा' हेंच कर्म

असलें पाहिजे. अर्थात् संदर्भावरून 'याचक' 'संस्थासेवक' 'फंडवाले' असें कांहीं तरी उद्देश्य असणार.

तिसऱ्या वाक्यांत 'विधेय' व 'विधेयविस्तारां'तील एक अंश गुप्त आहे. पण दुसऱ्या ओळींतील 'जातां' या शब्दावरून विधेय हें 'जा' धातूचें रूप असलें पाहिजे असें झालें. त्याचप्रमाणें दुसऱ्या ओळीच्या अखेरच्या 'मागे' ला यमक जुळण्याजोगा विधेयविस्तार म्हणजे 'मागें' हाच असला पाहिजे. अर्थात् गाळलेले शब्द 'जाय' व 'मागें'' हे होत.

## अभ्यासपाठ ९ वा.

'मनी' व 'होत' या शब्दांचें वाक्य बनवा.

ह्यांत 'मनी' हें स्त्रीलिंगी उद्देश्य असून तें एकवचनीं आहे व 'होत' हें विधेय अनेकवचनी आहे. अर्थात् उद्देश्याच्या भरीला आणखी एक उद्देश्य दिलें पाहिजे व तीं दोन्ही उद्देश्यें जोड कर्तें झालीं पाहिजेत. म्हणून हें वाक्य 'मनी व नाना हीं भावंडें होत' असें केलें पाहिजे.

## अभ्यासपाठ १० वा.

पुढील वाक्यांचें जोडून एक वाक्य करा.

( १ ) मुंबईला दीपोत्सव होतो. ( २ ) त्यासंबंधानें माझी एकदां खरपूस निराशा झाली. ( ३ ) ती कशी झाली हें वाचकांना ठाऊक झालें आहे.

ह्या तिन्ही वाक्यांत शेवटचें वाक्य प्रधान असल्यामुळें पहिलीं दोन वाक्यें जोडून त्यांचें एक गौण वाक्य बनवून त्यास नामवाक्याचें रूप अशा बेतानें दिलें पाहिजे कीं तें तिसऱ्या वाक्याला कर्तृपदीं येईल. पहिल्या वाक्यांतील विधेय काढून टाकून तें दुसऱ्याशीं असें जोडतां येईलः—'मुंबईच्या दीपोत्सवासंबंधानें माझी एकदां खरपूस निराशा झाली.' आतां हें वाक्य, गौण वाक्य करण्याकरितां त्याला संबंधी वाक्याचें रूप दिलें पाहिजे, व तें तसें देण्याकरितां 'कशी' हा शब्द घातला पाहिजे. आतां हें वाक्य असें झालेः—

'मुंबईच्या दीपोत्सवासंबंधानें माझी एकदां कशी खरपूस निराशा झाली हें वाचकांना ठाऊक झालें आहे.' ( सुदाम्याचे पोहे )

———

# तेविसावा पाठ.

## मराठी वाक्यांची सजावट.

३२१ मराठी वाक्यरचनेचें सामान्य धोरण पहिल्या प्रकरणांत सांगितलें आहे, त्यास अनुसरून, म्हणजे प्रथम कर्ता, नंतर कर्म, व नंतर क्रियापद अशा सामान्य धोरणावर मराठी वाक्य सिद्ध होतें. अन्यविभक्त्यन्त शब्द ज्या जागीं घालावे म्हणून पहिल्या प्रकरणांत सांगितलें आहे त्याच शब्दांच्या जागीं बहुधा त्या शब्दांच्या अर्थाचीं गौणवाक्यें येतात. जसें:—' आज पहाटेस ( सप्तम्यर्थी चतुर्थी ) मला एक स्वप्न पडलें,' हें वाक्य 'आज अजून सूर्योदय व्हावयाचा होता इतक्यांत मला एक स्वप्न पडलें ' असें होईल. ' बुडत्यास हात द्यावा, घाबरल्या धरि, ताल गीताला ॥ ' ( मोरोपंत ), हें वाक्य ' जो बुडतो आहे अशास हात, जो घाबरला आहे अशास धीर, व गीताला तांल द्यावा ' असें होईल. हाच प्रकार क्रियाविशेषणें व अन्य शब्द यांविषयीं समजावा.

३२२ वाक्यरचनेचें मुख्य तत्व म्हणजे ' बोलणाराचा आशय सहज व स्पष्ट कळावा अशी शब्दयोजना करणें ' हें होय. अर्थात् अन्य शब्दांवर अवलंबून राहणारे शब्द मराठी भाषेच्या स्वभावास अनुसरून त्यांच्या आश्रयभूत शब्दांच्या आधीं ठेवावे लागतात. त्याचप्रमाणें शब्दयोगी अव्ययांनीं होणाऱ्या विभक्तींपेक्षां कारक विभक्तींना अधिक महत्त्व, षष्ठ्यन्त विशेषणापेक्षां अस्सल विशेषणाला अग्रमान, उच्चारसौकर्याकडे असलेला कल, सहजपणाकडे प्रवृत्ति, परभाषेंतील व्यंजनान्त शब्दांना स्वरान्त करून आपल्यांत घेण्याची तत्परता, इत्यादि मराठी-च्या कांहीं विशेष लकबा आहेत त्याही वाक्यरचना करितांना लक्ष्यांत घ्याव्या लागतात.

३२३ मराठीच्या वाक्यांच्या सजावटीला व्याकरणदृष्ट्या आवश्यक अशी बहुतेक माहिती आतांपर्यंत देण्यांत आली आहे, तिजवरून शुद्ध मराठी वाक्यरचनेविषयीं बरीचशी कल्पना येण्यासारखी आहे. परंतु इंग्रजी व

संस्कृत या दोन भाषांशीं मराठीचा भाषांतराच्या निमित्तानें विशेष संबंध येत असल्यामुळें त्यांच्या तुलनात्मक वाक्यसजावटीच्या दृष्टीनेंही होतकरू विद्यार्थ्यांस कांहीं सूचना देणें इष्ट आहे. मराठीचें वळण बहुतांशीं संस्कृतसारखेंच असल्या-मुळें संस्कृत वाक्यरचनेशीं सुटून अशी वाक्यरचना मराठीची बहुधा होत नाहीं. पण इंग्रजी भाषेचा स्वभाव मात्र मराठीहून बराच भिन्न असल्यामुळें त्या भाषेच्या आणि मराठीच्या वाक्यसजावटींत पुष्कळ वेळां तफावत पडते. अशा प्रकारच्या कांहीं महत्वाच्या बाबींचा विचार करूं.

३२४ मराठींतलें वचन हें अन्य भाषांप्रमाणें सामान्यतः प्रातिपदिकाचें एकत्व किंवा अनेकत्व दाखवितें हें खरें, पण पुष्कळ वेळां भाषेच्या संप्रदायानुरूप त्यांतील संख्यार्थास महत्व असत नाहीं; अशा वेळीं त्याचें भाषांतर आपल्या भाषेला साजेशा वचनांतच करावें लागतें. जसें:—" Particulars " ( अने०वचन )=' तपशील ' ( ए०वचन ). " Morals "=' नीतिमत्ता. ' "Scissors=कातरी. " " सिकताः=वाळू. " " वर्षाः=पावसाळा. " इ.

३२५ इंग्रजीप्रमाणें मराठींत लिंगाची शिस्त नाहीं. त्यामुळें भाषांतर करितांना मराठींतील विशिष्ट लिंगाकडे अवधान ठेवून भाषांतर करावें लागतें. जसें:— ' I neither know the incident nor its particulars; ' " मला ती हकीकतही ठाऊक नाहीं व तिचा तपशीलही ठाऊक नाहीं. " "The ship and her crew " ' नाव आणि तिजवरील नावाडी. ' ' The conductor of the elephant sits on its head; ' ' हत्तीचा महात त्याच्या गंडस्थळा-वर बसतो. ' कांहीं संस्कृत शब्दांचीं लिंगेंही मराठींत बदलून आलीं आहेत. जसें:— ' तन्मम मित्रम्, ' ' तो माझा मित्र '. ' दशरथस्य धर्मदाराः ' ' दशरथाची कुलस्त्री. '

३२६ परभाषीय वाक्यरचना जर तिच्या विशिष्ट संप्रदायास अनुसरून असेल तर तिचें शब्दशः भाषांतर बहुधा होऊं शकत नाहीं. तें मराठीच्या संप्रदायास अनुसरून कराव लागतें. जसें:— " What ails you ? तुला काय होतें? " " I am at present short of funds " " मला सध्यां पैशाची टंचाई आहे. " " There's a dear boy " " गुणाचें बाळ तें ! ". " यज्ञदत्तस्य पुत्रो जातः " " यज्ञदत्ताला मुलगा झाला. "

३२७ संस्कृतप्रमाणें मराठींतही प्रातिपदिकांचा म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण व विशेषणात्मक कृदन्त यांचा दर्जा साधारण सारखाच मनाला आहे. पण इंग्रजींतलें विशेषण नामाहून कमी दर्जाचें आहे. भाषांतर करितांना मराठी प्रातिपदिकांचा हा विशेष लक्ष्यांत ठेवावा लागतो. जसें:—"Errors of predecessors are land-marks to posterity," 'पुढच्यास ठेंच मागचा शहाणा' "The wise keep their own counsel," 'शहाणा बोलून दाखवीत नाहीं.'

३२८ सर्वनामें, जीवनास अत्यावश्यक पदार्थांचे वाचक शब्द, आणि नात्यांचे वाचक शब्द हे बहुधा सर्व भाषांतून सारख्याच रीतीनें उपयोगांत येतात, पण मराठींतल्या 'आपण' या सर्वनामाचा विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. त्या शब्दाचे 'मी,' 'आम्ही,' 'तूं', 'तुम्ही', 'तुम्ही व आम्ही' आणि 'तुम्ही आम्ही व इतर लोक' इतके अर्थ होतात, व प्रसंगानुरोधानें त्यांचा उपयोग होतो. जसें:—"I positively had no hand in the matter!" 'आपल्या कानीं सात बाळ्या!' "You seem to be a wise-acre"; 'आपण दीड शहाणे दिसतां'. 'आपण'च्या षष्ठीसंबंधानें पूर्वीं खुलासा केला आहे.

३२९ इंग्रेजींत 'one' हें सर्वनाम नामाची पुनरुक्ति टाळण्याकरितां घालतात, तेथें मराठी विशेषणच काम करून जातें. जसें:-"My pugree is yellow, I don't like a black one"; 'माझी पगडी पिवळी आहे, मला काळी आवडत नाहीं'.

३३० कित्येक वेळां इंग्रजींतील करणरूपीं असलेलें वाक्य मराठींत अकरणरूपानेंच विशेष खुलून होतें. अशा वेळीं दोन नञांनीं वाक्याचा आशय प्रकट केला जातो. जसें:-"Your arrangements are complete;" "तुमच्या व्यवस्थेंत व्यंग असें राहिलेंच नाहीं." कित्येक वेळां याच्या उलट प्रकारही करावा लागतो. जसें:- "You cannot be too careful" 'घ्याल तेवढी खबरदारी थोडीच आहे.'

३३१ संस्कृत, इंग्रेजी व मराठी या तीन्ही भाषांतही विभक्तींची कल्पना सामान्यतः सारखीच आहे, पण एका भाषेच्या विशेष संप्रदायानुरूप असलेल्या विभक्तीचे दुसऱ्या भाषेंत विभक्त्यंतर करावें लागतें. जसें:—'The death of

his wife affected George deeply; ' ' बायकोच्या मरणानें जॉर्ज यास अत्यंत दुःख झालें.' 'The increasing Power of Pratapsinh excited the envy of his brother; ' 'प्रतापसिंहाची चढती कमान पाहून त्याच्या भावाच्या मनांत हेवा उत्पन्न झाला.' ' यज्ञदत्तो देवदत्ताय कुप्यति; ' ' यज्ञदत्त देवदत्तावर रागावतो.' ' पुस्तकं विना ' ' पुस्तकाशिवाय '. " भोगेभ्यः स्पृहयालवः " " भोगांची इच्छा करणारे. "

३३२ उपपदविभक्ती म्हणजे शब्दयोगी अव्ययांनीं होणाऱ्या विभक्तींच्या बाबतींतहि वरचाच प्रकार दिसून येतो. जसेंः— " Testimony to one's character" " चांगुलपणाबद्दल साक्ष ". " Interference with one's affairs; " " कामांत ढवळाढवळ. " " तापावर रामबाण; " " Specific against fever. " " त्वां च मांचांतरा; " " तुझ्या व माझ्या दरम्यान. "

३३३ मराठींतील 'फार, पुष्कळ, योग्य, चांगलें, वाईट' इत्यादि मोघम अर्थाचीं क्रियाविशेषणें फार व्यापक आहेत; यामुळें त्यांचा इंग्रेजींतील वेगवेगळ्या विशिष्ट अव्ययांच्या जागीं उपयोग होतो. जसेंः—" He richly deserved the punishment " " त्याला मिळालेली शिक्षा योग्य होती. " " I was sorely disappointed " " माझी फार निराशा झाली. " " Govind was severely reproved by his father " " गोविंदाचा बाप त्याला फार रागें भरला. "

३३४ मराठींत कर्मणि प्रयोगाचा प्रचार बराच मर्यादित आहे. त्यामुळें इंग्रेजींतील पुष्कळ वाक्यें कर्मणि प्रयोगांत असलीं तरी मराठींत कर्तरि प्रयोगानेंच चांगलीं होतात. इंग्रेजींतील कर्मणि प्रयोगांत कर्ता गुप्त ठेवण्याची जी विशेष वहिवाट आहे तशी ती मराठी कर्तरींत आहे. जसेंः—" I was addressed by him; " " तो मला म्हणाला. " " It is rightly said; " " ( लोक ) म्हणतात तें खरंच आहे. " " The ninth National Congress was held at Lahore; " " नववी राष्ट्रीय सभा लाहोर येथें भरली. "

३३५ मराठींतील काळ, अर्थ व कृदन्तें यांचे उपयोग पूर्वी सांगितलेच आहेत. त्यांच्या अर्थाच्या धोरणानें त्यांचें इंग्रेजींत भाषांतर करावें लागतें. जसेंः— " गुरुजी, आम्हांस क्षमा करा " " Sir, please forgive us. " " तुम्ही उद्यां या; " " You should better come to-morrow. "

" रामभाऊ आज यावा; " " Very likely, Rambhau will be here to-day. " इंग्रेजीचें मराठी करितांनाही ही खबरदारी घ्यावी लागते जसें:---" I went to your house yesterday; " " मी काल तुमच्या घरीं गेलों होतों. ' " His words cost him dear; " त्यानें असें बोलून आपलें नुकसान करून घेतलें. "

३३६ इंग्रेजात अप्रत्यक्ष व प्रत्यक्ष " Indirect आणि Direct " वाक्य-रचनेचे जे दोन प्रकार आहेत ते संस्कृतप्रमाणें मराठींतही एकट्या प्रत्यक्ष रचने-नेंच होतात. जसें:—" He said that he would come the next day; " " तो म्हणाला—मी उद्यां येईन. " असल्या वाक्यांत बोलणाराबद्दल ' आपण ' या सर्वनामाचा उपयोग करतात, तरी देखील वाक्यरचना प्रत्यक्षच असते. जसें:—" आपण उद्यां येऊं असें तो म्हणाला. "

३३७ थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'एका भाषेंतील वाक्याचा आशय दुसऱ्या भाषेच्या संप्रदायास अनुरूप अशा शब्दांनीं त्या भाषेंत प्रकट करणें ' म्हणजे भाषांतर करणें होय. अर्थात् या धोरणामुळें प्रसंगोपात्त एका भाषेंतील वाक्य दुसऱ्या भाषेंत अगदीं वेगळ्या धर्तीवर करावें लागतें. जसें:— " The sorrow of the parents at the loss of their only son their sole hope, is indescribable; " " ज्याच्यावर आईबापांची सारी भिस्त असा एकुलता एक मुलगा मेल्यावर त्यांचें दुःख काय सांगावें ! " "I have no money wherewith to buy books" " पुस्तक विकत घेईन म्हटलें तर पैसा नाहीं. " " I have no time to spare " ' मला फुरसत नाहीं. ' " The snake was unusually long; " ' तो साप फारच लांब होता; तसा क्वचित् पाहण्यांत येतो. ' " My father who was burdened with a numerous family could not support me at college; " ' आमचें कुटुंब फार मोठें होतें यामुळें बाबांस माझ्या कॉलेजांतील शिक्षणाचा खर्च रेटेना. ' तस्य देशांतरंगतस्य द्वादश वर्षाणि व्यतीतानि; " ' त्याला परागंदा होऊन बारा वर्षें झालीं. '

३३८ प्रत्येक भाषेच्या वाक्यरचनेंत संक्षेप, विस्तार, अलंकारिक रचना इत्यादि सोयींचा उपयोग तिच्या स्वभावानुसार केलेला असतो. अशा वेळीं एका भाषेंतील आशय दुसरींत व्यक्त करितांना तिच्या संप्रदायानुसार वरील सोयींची अदलाबदल

किंवा त्यांचें रूपांतर करावें लागतें. जसें:—" One eveniag, " 'एके दिवशीं संध्याकाळी.' " He is a solnmon; " ' तो बृहस्पति आहे. '

## अभ्यासपाठ १ ला.

पुढील उताऱ्याचें मराठी भाषांतर करा:—" The Taj stands on the western bank of the Jumna, about three miles from Agra. A more beautiful, graceful and magnificent structure is not to be found in the whole world. The whole building is constructed of white marble tinged with black, which heightens the beauty of the stone. "

## अभ्यासपाठ २ रा.

पुढील वाक्यांना मराठी प्रतिवाक्यें द्या: — ( १ ) A nod for the wise, a rod for the fool. ( 2 ) Half a loaf is better than no bread. ( 3 ) Ill gotten ill spent. ( 4 ) Spare the rod and spoil the child, ( 5 ) The sooner the better.

## अभ्यासपाठ ३ रा.

पुढील संप्रदायाचें स्पष्टीकरण करा:—( १ ) आंथरूण धरणें. ( २ ) आग पाखडणें. ( ३ ) कान उपटणें. ( ४ ) उरावर बसणें. ( ५ ) गळा कापणें.

## अभ्यासपाठ ४ था.

पुढील वाक्यांत मराठीच्या संप्रदायाविरुद्ध रचना कोठें झाली आहे तें सांगा, व दुरुस्त करा:—( १ ) त्यानें दुःखासह दिवस काढले. ( २ ) मी इतका चाललोसें दिसत नाहीं. ( ३ ) तूं गोविंदाचे मुलास भरविलास कां ? ( ४ ) तिनें मुलाकडून पत्र लिहिलें. ( ३ ) त्या रानांत पारधीकरितां जनावरें पुष्कळ आहेत.

## अभ्यासपाठ ५ वा.

पुढील संस्कृत वाक्यांचें भाषांतर करा:—( १ ) उद्यमः कल्याणाय भवति ( २ ) स नृपः तस्याः रुचये न बभूव. ( ३ ) विक्रीते करिणि किमंकुशे विवादः ( ४ ) आकृति-विशेषेष्वादरः पदं करोति. ( ५ ] तस्याचरणं वचसा न विसंवदति.

### अभ्यासपाठ ६ वा.

पुढील संप्रदायांचा उपयोग करून मराठी वाक्यें बनवा:—( १ ) लष्करच्या भाकरी. ( २ ) पाण्याचे पितर. ( ३ ) गोडबंगाल. ( ४ ) बारावा बृहस्पति, आणि ( ५ ) द्राविडी प्राणायाम.

### अभ्यासपाठ ७ वा.

"तो व्यापारांत बुडाला" हा मजकूर मराठींत शक्य तितक्या वेगळ्या वाक्यांत मांडून दाखवा.

### अभ्यासपाठ ८ वा.

पुढील वाक्यांतील चुका दाखवा:—" भिकारी एका श्रीमानाकडे जातांना म्हणाला, मित्रा, आपण ईश्वराचीं दोघें लेकरें आहों, तेव्हां आपण भाऊ होणार. "

**३३९** येथपर्यंत भाषेचा मध्यम घटक जें 'वाक्य' त्याच्या व्याकरण-दृष्ट्या होणाऱ्या रचनेसंबंधीं महत्त्वाच्या तत्वांचा व वेगवेगळ्या अंगांचा विचार झाला. परंतु भाषेची सजावट ही नुसती व्याकरणाचे अंगानेंच होत नसून तिला दुसरें म्हणजे व्यवहाराचें एक अंग आहे. आणि तेंच फार महत्त्वाचे आहे. या अंगांत भाषा म्हणजे काय, तिचे भेद, तिचे अर्थदृष्ट्या अलंकार, तिची व्यापक रूपरेषा वगैरे अनेक विषयांचा समावेश होतो. 'मराठी भाषेची सजावट' शिकूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांला ह्या विषयाचें ज्ञानही होणें अवश्य असल्यामुळें आतां तिकडे वळूं.

# चोविसावा पाठ.



## मराठींतील संप्रदाय व म्हणी.

——:०:——

**अकलेचा खंदकः**— मूर्ख मनुष्य.

**अक्काबाईचा फेराः**— १ वाईट दशा येणें. २ दुर्बुद्धि आठवणें.

**अकांडतांडवः**— १ मोठ्या कामाची दंगल. २ आरडाओरड, बोभाटा.

**अंग चोरणेंः**— शक्ति असूनही काम टाळणें.

**अंग टाकणेंः**— १ कृश होणें. २ निजणें.

**अंग धरणेंः**— १ लठ्ठ होणें. २ जड होणें.

**अंगावर शेकणेंः**— तोहमत किंवा धोक्याचा प्रसंग येणें.

**अडणीवरला शंखः**— मोठ्या स्थानावर असलेला मूर्ख मनुष्य.

**अंडीं पिल्लीं बाहेर काढणेंः**—गुपित प्रसिद्धीस आणणें.

**अवाक्षरः**— एक अक्षर, एखादा सुद्धां शब्द.

**अस्मान ठेंगणेंः**— गर्वाची पराकाष्ठा.

**अथपासून इतिपर्यंतः**— पहिल्यापासून अखेरपर्यंत.

**अजगरका दाता रामः**— परमेश्वरावर विश्वासून राहणाराला तोच साह्य होतो.

**अठरा धान्यांचें कडबोळेंः**—वेगवेगळ्या जिनसांचें गलिच्छ मिश्रण.

**अनागोंदी जमाखर्चः**—बिनहिशेबी जमाखर्च.

**अंधेर नगरीः**—बेबंदशाहीचें राज्य.

**अरेरावः**— थोर मनुष्य, गर्विष्ठ मनुष्य.

**अर्धचंद्रः**— मानेला धरून हकालणें.

**अर्ध्या वचनांत असणेंः**— आज्ञा पाळावयास तत्पर असणें.

**अर्ध्या हळकुंडानें पिंवळा होणेंः**—थोड्या लाभानें गर्विष्ठ होणें.

**अलबत्या गलबत्याः**—कोणी तरी क्षुद्र मनुष्य.

**अलिजाही दरबार-कारखाना**:—मोठा पण अव्यवस्थित व्याप.

**अल्लाची गाय**:—अगदीं भोळा व निरुपद्रवी मनुष्य.

**अव्वाचे सव्वा**:—प्रमाण सोडून चढविलेला, कांहींच्या बाहीं.

**अव्यापारेषु व्यापार**:—भलत्या विषयाची उठाठेव.

**अष्टपैलु**:—अनेक विषयांत प्रवीण.

**अष्टाधिकार**:—अनेक अधिकार.

**असातसा, असाच, असाच आपला**:—सरासरी, सुमार प्रतीचा.

**अस्मानी सुलतानी**:—जुलूम जबरदस्ती.

**अळं टळं करणें**:—चुकवाचुकव करणें.

**अळवावरचें पाणी**:—क्षणभंगुर, परिणामीं न राहणारा पदार्थ.

**अळी मिळी गूपचिळी**:—चूप राहणें, गुप्तपणा राखणें.

**अक्षत देणें-भरणें**:—बोलावणें, निमंत्रण करणें.

**औट घटकांचें राज्य**:—थोडा वेळ टिकणारा अधिकार.

**आ करणें**:—तोंड उघडणें-वासणें.

**आकाश पाताळ एक करणें**:—प्रचंड ध्वनी किंवा गलबा करणें.

**आकाशाची कुऱ्हाड**:—ईश्वरनिर्मित व अकल्पित असें संकट, किंवा आघात.

**आखाडसासरा-सासू**:—उसना अधिकार गाजविणारा मनुष्य किंवा स्त्री.

**आग पाखडणें**:—कुभांड घेऊन बोलणें.

**आग लावणें**:—चाहड्या सांगून भांडण पेटविणें.

**आगळ बुध वाणिया पाछळ बुध बामणिया**:—वाण्यांना दूर दृष्टि असते, ब्राह्मणांना मागाहून सुचते.

**आगींत तेल ओतणें**:—अगोदर उत्पन्न झालेल्या भांडणांत भर घालणें.

**आगे लाथ पीछे बात**:—अडाणी माणसाला प्रथम लाथ मारून नंतर त्याचें म्हणणें ऐकून घेणें.

**आग्या वेताळ**:—तापट संतापी माणूस.

**आघाडी साधणें**:—प्रथम हजर राहण्याचा फायदा घेणें.

**आठ हात लाकूड व नऊ हात धलपी**:—अतिशयोक्तीचें भाषण.

**आडून गोळी मारणें**:—अप्रत्यक्ष उपाय करणें, चोरून हत्यार चालविणें.

**आंतबट्याचा व्यापारः**—तोट्याचा व्यवहार.

**आपल्या पोळीवर तूप ओढणें**:—स्वतःचा तेवढा फायदा साधणें.

**आभाळ कोसळणें**:—मोठा भयंकर प्रसंग येणें.

**आभाळ फाटणें**:—सर्व बाजूंनीं संकटें येणें.

**आयत्या पिठावर रेघा ओढणें**:—फुकट मिळालेल्या श्रीमंतीवर चैन करणें.

**आव घालणें**:—अवसान आणणें.

**आवळा देऊन कोहळा काढणें**:—थोड्या मोलाचा मोठा फायदा घेणें.

**आळशावर गंगा**:—न इच्छिलेला मोठा लाभ.

**इंगा फिरणें**:—गर्व उतरून जाण्याजोगीं संकटें येणें.

**इनमीन सव्वा तीन**:—अगदीं मोजकीं, थोडीं.

**इंद्राय तक्षकाय स्वाहा**:—एखादा मनुष्य व त्यांचा पाठीराखा या दोघां-च्याही बळी घेणें.

**इरेस पडणें**:—उमेद घेऊन जाणें, हटास पेटणें.

**इळा मोडून खिळा करणें**:—मोलवान् जिन्नस मोडून क्षुद्र जिन्नस करणें.

**इळ्या भोपळ्या इतकें सूत**:—शत्रुत्वाचें नातें.

**उकिरडा फुंकणें**:—गलिच्छ व्यसनांत रमणें.

**उखळ पांढरें होणें**:—श्रीमंती येणें.

**उखाळ्या पाखाळ्या काढणें**:—बरीं वाईट कृत्यें बोलून दाखविणें.

**उचलबांगडी करणें**:—जबरीनें उचलून नेणें.

**उच्छाद आणणें**:—फार उपद्रव देणें.

**उजेड पाडणें**:—महत्कृत्य करणें.

**उंटावरचा शाहणा**:—मूर्खपणाची मसलत देणारा.

**उंटावरून शेळया हांकणें**:—लांब राहून एखादें काम करूं पाहणें.

**उडत्या पाखराचीं पिसें मोजणारा**:—फार धूर्त मनुष्य.

**उदरीं शनि येणें**:—अनुकूल काळ येणें, लाभ होणें.

**उदे उदे किंवा उदो उदो करणें**:—स्तोम माजविणें, गुण गाणें.

**उंबर फोडून कें बरें काढणें**:—क्षुद्र वस्तूकरितां चांगल्या वस्तूचा नाश करणें.

**उंबराचें फूल**:—क्वचित् दृष्टीस पडणारा पदार्थ, किंवा मनुष्य.

**उलटी अंबारीः**—भिक्षेची झोळी.

**उष्ट्या हातानें कावळयाला न मारणें**:—चिक्कूपणाची कमाल असणें.

**ऊत येणें**:—उत्साहाचें भरतें येणें, मनोवृत्ति उचंबळणें.

**एका नावेंत असणें**:—सारख्या स्थितींत असणें.

**एका पायावर तयारः**—पुरता सज्ज, उत्कंठित.

**एका माळेचे मणीः**—सारख्या योग्यतेचे लोक.

**एरंडाचें गुऱ्हाळः**—निष्फळ, कंटाळवाणें भाषण.

**( दुसऱ्याच्या ) ओंजळीनें पाणी पिणें**:—परावलंबी असणें.

**ओढून चंद्रबळ आणणें**:—इष्ट गोष्टीविषयींही वरपांगी अनिच्छा दाखविणें.

**ओनामाः**—नवीन प्रारंभ.

**ओंफस होणें**:—मध्येंच नासून जाणें.

**ओली आगः**—फार पाऊस पडून पडलेला दुष्काळ.

**ओरक्या भुरः**—गोष्ट सांगून झाल्यावर ' पुढें काय ' म्हणून प्रश्न विचारल्यास ' सांगण्यासारखें कांहीं नाहीं ' अशा अर्थाचे शब्द.

**कच्चींबच्चींः**—लहान मुलें.

**कंठस्नान घालणें**:—ठार मारणें.

**कढी पातळ होणें**:—भीतीनें गाळण उडणें, आजारानें थकणें.

**कणीक तिंबणें**:—मार देणें.

**कत्तलची रात्रः**—दंगलीची, किंवा घाईची रात्र, पर्यायानें गर्दीची वेळ.

**कथा कायः**—काय विशेष महत्व आहे ?

**कपाळ उठणें**:—कपाळ दुखूं लागणें, पर्यायानें त्रासणें.

**कपाळ ठरणें**:—भवितव्य कायम होणें.

**कपाळ फुटणें**:—घात होणें, नवरा किंवा प्रिय आप्त मरणें.

**कपाळमोक्षः**—मृत्यु.

**कपाळाचें कातडें नेणें**:—सगळ्या जन्माचें मातेरें करणें.

**कपाळीं येणें**:—नशिबीं येणें.

**कंबर बांधणें**:—सज्ज होणें.

**करकर दांत खाणें-चावणें**:—रागाची पराकाष्ठा दाखविणें.

**करंगळी सुजली म्हणून डोंगराएवढी होईल काय ?**:— क्षुद्र वस्तूची वाढ मर्यादेबाहेर कशी होईल ?

**करणी करणें**:—१ लग्नांत जावयाला वस्त्रें भूषणें देणें. २ जारण मारणादिक प्रयोग करणें. ३ प्रयत्न करणें.

**करतलामलकवत्**:—पूर्ण ताब्यांत असल्याप्रमाणें.

**करनकरीचा वसा**:—दुसऱ्याच्या सांगण्या विरुद्ध वागणें.

**कर्तुमकर्तुं शक्ति**:—अमर्याद सत्ता.

**कर्मधर्म-संयोगानें**:—दैववशात्, सहज.

**कलम करणें**:—छाटून टाकणें.

**कळ लावणें**:—भांडण लावणें.

**कळसूत्री बाहुलें**:—दुसऱ्याच्या मर्जीनें चालणारा मनुष्य.

**कळी उमलणें**:—मुद्रा प्रसन्न होणें.

**कळीचा नारद**:—भांडणें लावणारा मनुष्य.

**काका दुसरा**:—शपथेचा एक प्रकार.

**काकुळतीस येणें**:—करुणा भाकणें.

**कांखा वर करणें**:—दिवाळें काढणें, गरीबी जाहीर करणें.

**कागदी घोडे नाचविणें**:—एखाद्या गोष्टीविषयीं पुष्कळ पत्रव्यवहार वाढविणें.

**कांगावा करणें**:—थोड्या तसदीची खूप ओरड करणें.

**काटयाचा नायटा होणें**:—क्षुद्र गोष्टीला हयगयीमुळें भयंकर स्वरूप येणें.

**काडीनें औषध लावणें**:—आपणांस तोशीस न घेतां दुसऱ्याचें काम करणें.

**काडी मोडून देणें**:—स्त्री-पुरुषांचा लग्नसंबंध तोडणें.

**कानउघाडणी करणें**:—कडक उपदेश करणें.

**कान किटणें**:—तेंच तेंच ऐकून कंटाळणें.

**कान देणें**:—लक्ष्य देणें.

**कान फुंकणें-भारणें**:—चहाड्यांनीं मन बिघडविणें.

**कानाचा हलका**:—चहाडीनें ज्याचें मन दूषित होतें असा.

**काना डोळा करणें**:—दुर्लक्ष्य करणें.
**कानांत तुळशीपत्र घालणें**:—साधुत्वाचें ढोंग करणें.
**कानाला खडा लावून घेणें**:—पुन्हा चूक न करण्याचा निर्धार करणें.
**कानावर हात ठेवणें**:—आरोप नाकबूल करणें.
**कानाशीं लागणें**:—चुगल्या करणें.
**कानीं कपाळीं ओरडणें**:—वारंवार सुचविणें.
**कापूस महाग करणें**:—कृश होणें.
**कापूस सवंग करणें**:—पुष्ट होणें.
**कामीं-कामास येणें**:—लढाईंत पडणें, उपयोगी पडणें.
**कास धरणें**:—आश्रय करणें.
**काळींचें उत्पन्न**:—जमिनीचा महसूल.
**काळें करणें**:—दूर जाणें.
**काळें पाणी**:—हद्दपारीची जागा.
**किंतु उपजणें-येणें**:—संशयाचा अंकुर उत्पन्न होणें.
**किल्ली फिरविणें**:—कल फिरविणें, मन बिघडविणें.
**कीस काढणें**:—अवास्तव चर्चा करणें.
**कुच रोटी कुच लंगोटी**:—बेतापुरत्या अन्न-वस्त्राची प्राप्ती.
**कुत्रा हाल खाईना**:—वाईट स्थिति आली.
**कुत्र्याचा पाय मांजराला लावणें**:—कशाला कांहीं तरी जोडून देणें.
**कुत्र्याचें मूत**:—चिरडखोर मनुष्य.
**कुरघोडी करणें**:—दुसऱ्यावर वर्चस्व स्थापित करणें.
**कुरमुरे-चुरमुरे खाणें**:—निराशेनें चरफडत बसणें.
**कूपमंडूक**:—घरांत बसून राहणारा माणूस.
**केंसानें गळा कापणें**:—स्नेह दाखवून घात करणें.
**कोणाचा पायपोस कोणाचे पायांत नाहीं**:—पुष्कळ मंडळींत अव्यवस्था आहे.
**कोणत्या झाडाचा पाला**:—काय किंमतीचा (क्षुद्र) मनुष्य.
**कोळशांतले माणिक**:—फार काळा मनुष्य.
**खडा टाकून पाहणें**:—हळूच गोष्ट काढून कामाची सिद्धि अजमावणें.

**खडे चारणें**:—पराभव करणें, लोळविणें.
**खडे फोडणें**:—दूषणें देणें.
**खसखस पिकणें**:—हंशा पिकणें.
**खाजवून खरूज काढणें**:—नसतें भांडण उकरून काढणें.
**खातें पोतें बरोबर होणें**:—येण्यादेण्यास बरोबर होणें.
**खापर फुटणें**:—अपयशाला धनी होणें.
**खालच्या घरचे वांसे मोजणें**:—उपकार करणाराशीं कृतघ्न होणें.
**खिरींत सराटा**:—पुष्कळशा चांगल्यांत एखादी वाईट गोष्ट.
**खुंटी पिरगळणें**:—एखाद्या कार्याविरुद्ध बंदोबस्त करून ठेवणें.
**खुशालचंद-चेंडू**:—निष्काळजीपणानें चैनींत राहणारा.
**खोगीर भरती**:—निरुपयोगी माणसांचा जमाव.
**खो घालणें**:—विघ्न करणें.
**गर्ची बाधा**:—गर्वाचा संपर्क.
**गटार यंत्र**:—कुटाळ लोकांचा अड्डा.
**गद्धे मल्हार**:—बेसूर गाणें.

**गनिमी कावा**:—प्रसंगानुसार पळणें किंवा छापे घालणें, असल्या कसबाची लढाई.

**गम खाणें**:—धीर धरणें, वाट पहाणें.
**गयावया करणें**:—तोंड वेंगाडून आर्जवें करणें.
**गोवऱ्या मसणांत जाणें**:—म्हातारा होणें.
**गळ घालणें**:—भीड घालणें.
**गळयांत धोंगडें येणें**:—बाजू उलटणें.
**गाजरपारखी**:—अडाणी परीक्षक.
**गाढवाचा नांगर फिरणें**:—जमीनदोस्त होणें.
**गादीला पाय लावणें**:—वंद्य पुरुषाशीं बरोबरी करणें.
**गाय होणें**:—लाचार होणें.
**गांवचा नसणें**:—संबंध नसल्याचें सोंग करणें.
**गांवीं नसणें**:—लक्ष्यांत नसणें.

**गाशा गुंडाळणें**:—निघून जाणें.
**गाळीव मूर्ति**:—अट्टल सोदा.
**गुण उधळणें**:—दुर्गुण प्रकट करणें.
**गुण्या गोविंदानें**:—शांतपणें, न भांडतां.
**गुलदस्तांत ठेवणें**:—राखून शिलकींत ठेवणें.
**गुलाबी थंडी**:—सौम्य थंडी.
**गुळ खोबरें देणें**:—लालूच दाखवून फसविणें.
**गोंडा घोळणें**:—खुशामत करणें.
**गोमा गणेश पितळी दरवाजा**:—
**गोमाजी कापशे**:—
**गोमाजी तिमाजी**:— } कोणी तरी मनुष्य. (ज्याच्या नांवाशीं कांहीं कर्तव्य नाहीं असा.)
**गोरागोमटा कपाळ करंटा**:—दिसायला चांगला पण कमनशीबी.
**गौडबंगाल**:—बुद्धीची करामत, हातचलाखी.
**गंगाजम्नी**:—परस्परांहून भिन्न वस्तूंचा मेळ.
**गंगेस घोडें न्हाणें**:—कृतकृत्य होणें.
**गंध नसणें**:—मुळींच माहिती नसणें.
**गुंगारा देणें**:—नजर चुकवून पळून जाणें.
**घटका घालणें**:—आणीबाणीची वेळ येणें.
**घटका भरणें**:—आयुष्य संपणें.
**घर करणें**:—पाय रुजविणें, स्थायिक होणें.
**घर बसणें**:—घराला विपत्ति येणें.
**घरीं आलेली**:—माहेरीं आलेली विधवा मुलगी.
**घागरगडचा सुभा**:—पाणी भरण्याचें काम.
**घालून पाडून बोलणें**:—आड पडद्यानें वर्मी बोलणें.
**घाशीरामी**:—जुलमी कारकीर्द,
**घृतकुल्या मधुकुल्या**:—तूपसाखरेचें चमचमीत जेवण.
**घेलाशेट**:—भानगड्या व्यापारी.
**घरकोंबडा**:—घरीं बसून राहणारा माणूस.
**घेवाण देवाण**:—अदलाबदल, देवघेव.

**घोडनवरा**ः--लग्न न होतां राहिलेला प्रौढ मुलगा.

**घोडें पुढ ढकलणें**ः—आपलें म्हणणें वरचेवर पुढें करणें.

**घोडं पेंड खाणें**ः--अडून राहणें.

**घोडें मारणें**ः--नुकसान करणें.

**घोरपड येणं**ः—संकट गुदरणें.

**चंग बांधणें**.—प्रतिज्ञा करणें.

**चंबूगबाळें आटोपणें**ः—जाण्याची तयारी करणें.

**चांडाळ चौकडी**ः—दुष्ट माणसांची जूट.

**चतुर साबाजी**ः—मूर्ख शिरोमणी.

**चतुर्भुज होणें**ः—कैद होणें, लग्न होणें.

**चरणारविंदीं मिलिंदायमान**ः—सेवेस सादर.

**चर्पटपंजरी**ः—कंटाळवाण्या बोलण्याची लांबड.

**चर्वित चर्वण**ः—तेंच तेंच बोलणें.

**चऱ्हाट वळणें**ः--कंटाळवाणी हकीगत सांगणें.

**चवदावें रत्न**ः--मार.

**चार खुट जहागीर**ः--भिक्षेची झोळी.

**चारी दिशा मोकळ्या होणें**ः--सर्व पाशांतून सुटणें.

**चालता काळ**ः—भरभराटीचे दिवस.

**चांदरात झडणें**ः—पैसे मिळत राहणें.

**चांदी आटणें**ः—त्रेधा होणें.

**चिटपांखरूं**ः—कोणीही प्राणी.

**चिमणीच्या दांतांनीं फोडणें**ः—फडक्यांत घालून दांतानीं फोडणें.

**चिमणीसारखें तोंड करणें**ः--एवढेंसें तोंड करणें.

**चिरी मिरी घेणें**ः—किरकोळ बक्षीस घेणें.

**चुकार तट्टु**ः--कामांत कुचरपणा करणारा.

**चुटक्यांचे मांडव** – पोकळ प्रतिष्ठेचें भाषण, मनोराज्य.

**चुडेदान देणें**ः—नवऱ्यास जीवदान देणें.

**चुलींतून निघून वैलांत शिरणें**ः--एका संकटांत वांचून दुसऱ्यांत पडणें.

**चुलीला अक्षत लागणें**:--घरांतील सर्व मंडळी बाहेर जेवणास जाणें.

**चोराच्या उलट्या बोंबा**:—स्वतः अपराध करून स्वतःच ओरड करणें.

**चोराला सोडून संन्याशाला सुळीं देणें**:—खऱ्या आपराध्याला सोडून निरपराध्याला शिक्षा करणें.

**चोहोंचा आंकडा घालणें**:—प्रशस्त मांडी घालून बसणें.

**चौकोनी चिरा**:—अष्टपैलु मनुष्य.

**चौदा चौकड्यांचें राज्य**:—चार युगांची एक याप्रमाणें चौदा चौकड्या टिकणारें राज्य.

**छक्केपंजे ओळखणें**:—युक्त्या ओळखणें.

**छत्तिसांचा आंकडा**:—विरुद्ध मतें असणें.

**जगत् शेटीचा नातू**:--गरीब मनुष्य.

**जड पारडें**:--संपत्तिवान् माणूस.

**जडभरत**:—मंद बुद्धीचा व आळशी माणूस.

**जन्माची गांठ**:—जन्मभर टिकणारा संबंध ( विवाह ).

**जमदग्नी**:--रागीट मनुष्य.

**जमीन आस्मानाचें अंतर**:--फारच अंतर.

**जरीपटका**:—पुढं आलेली निशाणी.

**जळत घर भाड्यानें घेणें**:—धोक्याचा व्यवहार अंगावर घेणें.

**जळत्या घराचा पळता वासा**:--बुडत्या व्यवहारांतून सांपडेल तेवढा फायदा.

**जंग जंग पछाडणें**:--प्रयत्नांची शिकस्त करणें.

**जागती ज्योत**:— खडखडीत दैवत.

**जाडें प्रकरण**:— विद्वान् मनुष्य.

**जातीवर जाणें**:— मूळ स्वभाव प्रकट करणें.

**जांवई शोध**:— भलतीच अडाणीपणाची दुरुस्ती.

**जिभेचा पट्टा**:— वाचाळपणा, बोलण्याची गर्दी.

**जिभेस हाड नसणें**:— वाटेल तसें अमर्याद बोलणें.

**जीवें खालीं ( भांड्यांत ) पडणें**:— काळजींतून सुटणें.

**जीव टांगणीस लागणें:**— काळजी लागणें.

**जीवाचा धडा करणें:**— निश्चय करणें.

**जीवांत जीव येणें:**—धीर येणें.

**जीभ चावणें:**—एखादी गोष्ट बोलून गेल्याचा पश्चात्ताप करणें.

**जीवश्च कंठश्च मैत्री:**—दाट सख्य.

**जुलमाचा रामराम:**—धाकामुळें केलेलें काम.

**जेवायला येऊन तोंड विसरणें:**—एखादी गोष्ट करावयास जातांना मुख्य साधन विसरणें.

**जोडे फाडणें:**—खेटे घालणें.

**झक मारणें:**—रिकामटेकडा उद्योग करणें.

**झांकलें माणीक:**—अप्रसिद्ध पण गुणी मनुष्य.

**झोटिंग बादशाही:**—बेबंद राज्यकारभार.

**टक्के शेर:**—पैसा शेर.

**टक्के टोणपे खाणें:**—संकटाचा अनुभव घेणें.

**टंगळमंगळ करणें:**—कां कूं करणें, अनमान करणें.

**ट, फ करणें:**—नुकतेंच शिकूं लागणें.

**टाकी चालविणें:**—क्रम चालविणें.

**टाके ढिले होणें:**—थकून जाणें.

**टाळूवर मिरे वाटणें:**—अंमल गाजविणें.

**टिवल्या बावल्या करणें:**—नटण्यांत किंवा गमण्यांत वेळ घालविणें.

**टुकटुक माकड:**—आपण खात असतां दुसऱ्यास बोटानें हिणावणें.

**टेंभा पाजळणें:**—डौल मिरविणें.

**टोळ भैरव:**—गावगुंड, उडाणटप्पू.

**ठाव घेणें:**—मनाचा अंदाज घेणें.

**डबघाईला येणें:**—मोडकळीस येणें.

**डल्ला मारणें:**—द्रव्यावर हात मारणें.

**डांगोरा पिटणें:**—जाहीर करणें.

**डावें उजवें कळणें:**—व्यवहार ज्ञान.

**डावें घालणें, डावलणें:**—बाजूस सारणें, वगळणें.

**डाळ शिजणें**:- दाद लागणें, अक्कल चालणें.
**डाव साधणें**:—जिंकणें, संधीचा फायदा घेणें.
**डोईचे वाटेनें**:—नम्रतेनें.
**डोक्यावर हात फिरविणें**:—फसविणें, लुबाडणें.
**डोक्यावर हात ठेवणें**:—आपल्याप्रमाणें वागण्यास शिकविणें.
**डोकीवरचें खांद्यावर घेणें**:—ओझें हलकें करणें.
**डोकें खाजविणें**:—आठवण करण्याचा यत्न करणें.
**डोकें मारणें**:—शिरच्छेद करणें.
**डोक्यावर केंस न ठेवणें**:—पूर्ण खरडपट्टी काढणें.
**डोक्यावर बसविणें**:—आपणास डोईजड करून ठेवणें.
**डोंगरचे आवळे व सागरचें मीठ**:—असंभवनीय गोष्टींचा मेळ.
**डोंगर पोखरून उंदीर काढणें**:—मोठ्या प्रयासाला क्षुद्र फळ येणें.
**डोळा असणें**:—एखाद्या वस्तूचा अभिलाष धरणें.
**डोळे उघडणें**:—सावध होणें.
**डोळे निवणें**:—समाधान होणें.
**डोळे पांढरे करणें**:—मरायला टेकणें, घाबरणें.
**डोळे फिरणें**:—गर्वानें ताठणें.
**डोळे येणें**:—डोळ्यांत खुपऱ्या होणें.
**डोळ्यांचें पारणें फिरणें**:—डोळ्याचें समाधान होणें.
**डोळ्यांत खुपणें-सलणें**:—अप्रिय असणें.
**डोळ्यांत गंगा यमुना येणें**:—डोळे पाण्यानें भरून येणें.
**डोळ्यांत तेल घालून पाहणें**:—दक्षतेनें पाहणें.
**डोळ्यांत माती ( धूळ ) फेंकणें**:—फसविणें
**डोळ्यांतलें काजळ चोरणें**:—समक्ष चोरी करणें.
**डोळ्यापुढें काजवे दिसणें**:—चक्कर येणें.
**डोळ्यावर कातडें ओढणें**:—दुसऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष करणें.
**डोळ्यावर धूर येणें**:—संपत्तीमुळें गर्व येणें.
**डोळ्याला डोळा लागणें**:—झोंप लागणें.
**तत्वमसीशीं गांठ पडणें**:—पैसा मिळणें.

**तंबी देणः**—शिक्षेचा धाक घालणें.

**तरतें कूळः**—पतवान् मनुष्य.

**तहान लाडू भूक लाडूः**—वाटेंत खाण्याकरितां दिलेले किरकोळ गोड खाऊचे पदार्थ.

**तळव्याची आग मस्तकाला जाणेंः**—फार संतापणें.

**तळपट होणेंः**—सत्यनाश होणें.

**तळी उचलणेंः**—बाजू घेणें.

**तळीराम गार करणेंः**—दुसऱ्याचें द्रव्य लाटून गबर होणें.

**ताज्या घोड्यावरल्या गोमाशाः**—सुखवस्तु माणसाभोंवतीं गोंडा घोळणारे लोक.

**ताटाखालचें मांजरः**—दुसऱ्याच्या हुकमतींत राहणारा माणूस.

**तापल्या तव्यावर भाजून घेणेंः**—एका कार्यांत दुसरें साधून घेणें.

**तांबडें फुटणेंः**—अरुणोदय होणें.

**तारांबळ होणें-उडणेंः**—गडबड किंवा धांदल होणें.

**तारे तोडणेंः**—कांहीं तरी बडबडणें.

**तिखट मीठ लावून सांगणेंः**—फुगवून सांगणें.

**तिमाजी नाईकः**—अत्यंत कृपण मनुष्य.

**तिसरा पायः**—फार हौस किंवा उत्सुकता.

**तिळपापड होणेंः**—फार राग येणें.

**तीर्थावर मुंडणः**—योग्य ठिकाणीं फजीती.

**तीळ खाऊन व्रत मोडणेंः**—शुष्क लाभासाठीं मोठी गोष्ट दवडणें.

**तुंबडी भरणेंः**—फायदा करून घेणें.

**तुळशींत भांगः**—चांगल्यांत वाईटाची उत्पत्ति.

**तेरड्याचे रंग तीन दिवसः**—थोडा वेळ टिकणारी नवलाई.

**तेरी मेरीः**—एकेरी शब्दांत चालणारें भांडण.

**तैल बुद्धिः**—वाटेल त्या विषयांत पसरणारी बुद्धि.

**तोंड आंबट करणेंः**—खिन्न होणें.

**तोंड करणेंः**—रागानें बोलत राहणें.

**तोंडघशीं पडणें**:--शब्द खोटा ठरणें.

**तोंडाचें पाणी पळणें**:--भीति वाटणें.

**तोंड दाबून बुक्यांचा मार**:—ज्याबद्दल तकरार करतां येत नाहीं असा त्रास.

**तोंडपाटीलकी**:—रिकामी बडबड.

**तोंडसुख घेणें**:—घडवून आणण्याचे सामर्थ्याचे अभावीं नुसतें बोलून घेणें.

**तोंडाची वाफ दवडणें**:—निष्फळ बोलणें.

**तोंडांत बोट घालणें**:--आश्चर्य करीत राहणें.

**तोंडास पानें पुसणें**:--दुसऱ्याचा योग्य वांटा आपणच गिळंकृत करणें.

**तोंडास पाणी सुटणें**:--लोभ उत्पन्न होणें.

**तोळा मासा प्रकृति**:—अगदीं थोड्या उपचारभेदाला सहन न करणारी नाजूक प्रकृति.

**त्रिस्थळी यात्रा**:—अगदींच भिन्न प्रकारचीं कामें करण्याचा प्रसंग.

**त्रेधा उडणें**:--गडबड-धांदल होणें.

**थंडा फराळ**:--उपाशी राहणें.

**थेर करणें**:--भलते ढंग करणें.

**दगडाखालीं हात सांपडणें**:--अडचणींत सांपडणें.

**दडी देणें**:--लपून बसणें.

**दरिद्र नाम संवत्सरे**:--अत्यंत गरीबी.

**दर्यामे खसखस**:—एका गोष्टींत दुसरीचें अतिशय थोडें प्रमाण.

**दशग्रंथी ब्राह्मण**:—संहिता, ब्राह्मण, अरण, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त, छंद व ज्योतिष इतक्यांचे अध्ययन केलेला म्हणजे फार विद्वान् ब्राह्मण.

**दहीं खाऊं कीं मही खाऊं**:—हें करूं कां तें करूं अशा अडचणींत सांपडणें.

**दाणे टाकून कोंबडीं झुंजविणें**:—आमिष दाखवून भांडणें लावणें.

**दांत पाडणें**:—फजिती करणें.

**दांत विचकणें**:—१ याचना करणें. २ हसणें.

**दांतांच्या कण्या करणें**:—वारंवार विनंति करून कंटाळणें.

**दांतीं तृण धरणें**:—अभिमान सोडून शरण जाणें.

**दादा बाबा करणें**:—आर्जव करणें.

**दिवसा दिवे लावणें**:—व्यसनांत पैसा उधळणें.

**दिल्लीचा सोदा**:—अट्टल भामटा.

**दिवे ओवाळणें**:—कुच किमतीचा समजणें.

**दिव्यानें रात्र उजाडणें**: रात्रभर पहारा करणें.

**दीड दमडीचा**:—क्षुद्र, हलका.

**दीड शहाणा**:—मूर्ख.

**दुःख वेशीस बांधणें**:—आपलें गाऱ्हाणें जाहीर करणें.

**दुःखावर डागण्या**:—आपणच दुःखाला कारण होऊन वर मर्मभेदक बोलणें.

**दुष्काळांत तेरावा महिना**:—संकटांत आणखी भर.

**देखनेमे ढब्बू चलनेमे गिग्राई**:—दिसायला चांगला पण निरुपयोगी.

**देवजी धसाडा**:—कुरूप व दांडगा माणूस.

**देव देव्हाऱ्यांत नसणें**:—योग्य वस्तु योग्य स्थळीं नसणें.

**देवमाणूस**:—भला मनुष्य.

**देवापुढचा देव**:—शंख.

**देवाज्ञा होणें**:—मरण.

**दौलत जादा होणें**:—सरकार-दरबारीं प्रतिष्ठा वाढणें.

**द्राविडी प्राणायाम**:—आड वळणांनीं लांबविलेला उपाय.

**द्राक्षापाकात्मक काव्य**:—सोपी व रसाळ कविता.

**द्राक्षें आंबट**:—न मिळणाऱ्या वस्तूला नांवें ठेवणें.

**धर्मावर सोमवार सोडणें**:—परभारें गरज भागविणें.

**धारवाडी कांटा**:—समतोल ताजवा.

**धोंडभट्टी करणें**:—स्नान न करतां भस्म लावणें.

**नक्राश्रु ढाळणें**:—खोटें दुःख दाखविणें.

**नक्षत्र पडणें**:—देहव्यापारावर नक्षत्राचा परिणाम झाल्याप्रमाणें वागणें. जसें:—पायावर न. प. म्हणजे सारखें फिरणें इ.

**नागेश्वराला नागवून सोमेश्वराला वात लावणें**:—एकाला लुबाडून दुसऱ्याला पोसणे.

**नारीकेलपाकात्मक काव्य**:—अवघड पण चांगलें काव्य.

**निमित्तास टेंकणें**:—एखाद्या कारणाची वाट पहात राहणें.

**निर्वाणीचा बाण**:—अखेरचें साधन.

**न्हातीधुती**:—प्रौढ झालली मुलगी.

**पंक्तिपढाण-बारगीर**:—भोजनापुरते सोबती.

**पंक्तिप्रपंच**:—पक्षपात.

**पठाडी गोम**:—मोठें व्यंग.

**पढतमूर्ख**:—शिकलेला पण व्यवहारशून्य मनुष्य.

**पडत्या फळाची आज्ञा**:—शब्दांत श्लेष काढून मिळालेली परवानगी.

**पथ्यावर पडणें**:—फायदेशीर होणें.

**पदरांत माप घालणें**:—खात्री करून देणें.

**पराचा कावळा करणें**:—फुगवून सांगणें.

**परसांतली भाजी**:—हातची गोष्ट.

**परदुःख शीतळ**:—दुसऱ्याच्या दुःखाबद्दल अपुरी कल्पना.

**पांग फेडणें-फिटणें**:—चिंता दूर करणें-होणें.

**पांचावर धारण बसणें**:—धास्ती पडणें.

**पांचांमुखीं परमेश्वर**:—चार लोक म्हणतील तें खरें.

**पाठीवर मारा, पोटावर नको**:—देहदंड करा पण अन्न तोडूं नका.

**पांढऱ्यावर काळें करणें**:—लिहिणें.

**पाणी पडणें**:—फुकट जाणें.

**पाणी मुरणें**:—कांहीं तरी व्यंग असणें.

**पाण्याचा कांटा मोडणें**:—पाणी कोमट होणें.

**पाताळयंत्री** :—खोल भानगडी करणारा.

**पाण्यांत पाहणें**:—मत्सर करणें.

**पाप्याचें पितर**:—रोडका, कृश.

# पंचविसावा पाठ.



## संप्रदाय. ( पुढें चालू )



**पायलीचे पंधराः**—सवंग पडलेले, क्षुद्र.
**पासंगास न पुरणेंः**—फारच क्षुद्र असणें.
**पिकलें पानः**—अगदींच म्हातारा मनुष्य.
**पितर उद्धारणेंः**—आईबापांवरून शिव्या देणें.
**पुडीस जाणेंः**—जेवावयास जाणें.
**पुंगी बंद करणेंः**— गडबड बंद पाडणें.

**पुराणांतलीं वांगीं पुराणांतः**—तत्व म्हणून प्रतिपादलेली गोष्ट कृतींत नसणें.

**पै दक्षिणा, लक्ष प्रदक्षिणाः**—काम पुष्कळ, देणें थोडें.
**पैठणी आदर-प्रेम-आग्रहः**—पोकळ किंवा दिखाऊ आदर इ०
**पैशा पासरीः**—सवंग पडलेलें.
**पोटांत कावळे कोकावणेंः**—फार भूक लागणें.
**पोटांत शिरणेंः**—विश्वास संपादन करणें.
**पोपटपंचीः**—अर्थ न कळतां पाठ म्हणणें.
**पोबारा करणेंः**—पळून जाणें.
**पोळी पिकणेंः**—लाट लागणें.
**प्रस्थान ठेवणेंः**—जाण्याची तयारी करणें.
**फट म्हणणेंः**—नांवें ठेवणें.
**बडे बापके बेटेः**—वडिलांच्या मोठेपणावर डौल मिरविणारा.
**बत्तीस लक्षणी बाब्याः**—अनेक प्रकारच्या खोडी असलेला मुलगा.
**बांगडी फुटणेंः**—नवरा मरणें.

**बागुलबोवाः**—पोकळ भीति.
**बाड झोकणेंः**—खोटें सांगणें.
**बादरायण संबंधः**—ओढून ताणून लावलेलें नातें.
**बापशेटीची पेंडः**—फुकट सांपडलेली वस्तु.
**बाबूके भाई दरवेशीः**—कंगाल, दरिद्री.
**बारावा बृहस्पतिः**—फार वांकडें अगर द्वेष.
**बाहेर वसा-ची बाधाः**—पिशाचाचा उपद्रव.
**बिन भाड्याचें घरः**—तुरुंग.
**बिबा घालणेंः**—बिघडविणें.
**बीचमे मेरा चांदभाईः**—मध्येंच आपलें घोडें पुढें ढकलणें.
**बुढ्ढी घोडी लाल लगामः**—रंगेल म्हातारा.
**बुद्धीशीं वैर करणेंः**—मनाच्या सांगण्याविरुद्ध वागणें.
**बेंबीचें उखळ करणेंः**—देह पुष्ट होणें.
**बेंबीच्या देंठापासूनः**—मनापासून.
**बेलभंडार उचलणेंः**—शपथ घेणें.
**बोकेसंन्यासीः**—ढोंगी साधू.
**बोबडी वळणेंः**—भिऊन गाळण होणें.
**बोलबाला होणेंः**—जयजयकार होणें.
**भवति न भवति**—वादविवाद, चर्चा.
**भांगेंत तुळस**—वाईट वडिलांची चांगली संतति.
**भिजत कांबळें-घोंगडें**—निकालांत न निघणारें काम.
**भीड भिकेची बहीण**—भिडस्तपणा घातकी आहे.
**भुकेबंगाल**—दरिद्री.
**भूसके लड्डु**—नकली पदार्थ, चोथा.
**भोपळ्या रोग**—लठ्ठ होणें.
**मंडूकप्लुति**—अर्धवट काम टाकून पुन्हा सुरुवात.
**मड्याच्या टाळूवरचें लोणी खाणारा**—अत्यंत नीच लोभी.
**मधून विस्तव न जाणें**—वितुष्ट किंवा वांकडें असणें.
**मनांत मांडेः**— }
**मनोराज्यः**— } मानींव सौख्याची कल्पना करणें.

**मसणांत गोंवऱ्या जाणें:—**
**मरणाच्या दारीं बसणें:—** } मरावयाजोगा म्हातारा होणें.

**मांजराचे पाय कुत्र्याला लावणें:—**कांहीं तरी लटपट करणें.

**मांडीवर घेणें:—**दत्तक घेणें.

**मात करणें:—**जिंकणें.

**मातीचे कुल्ले:—**ओढून ताणून लावलेला संबंध.

**मानसपुत्र:—**मर्जीतला माणूस.

**मान कापणें:—**घात करणें.

**मायेचा पूत**
**त्रीदाचा मर्द-दादला** } पराक्रमी, कर्तृत्ववान् मनुष्य.

**मारुतीचें शेंपूट:—**लांबत जाणारें काम.

**माशानें गिळलेलें माणीक:—**परत न सांपडण्याजोगी गमावलेली वस्तु.

**माशा मारीत बसणें:—**निरुद्योगी बसणें.

**मिरच्या लागणें:—**वर्मावर झोंबणें.

**मुलगी गळ्याशीं लागणें:—**उपवर झालेल्या मुलीच्या लग्नाची काळजी लागणें.

**मुष्टिमोदक:—**बुक्क्या.

**मूठ भरणें-दाबणें:—**लांच देणें.

**मूळ जाणें-येणें:—**मुलीला माहेरीं नेण्यासाठीं बोलावयास जाणें-येणें.

**मेलेलें अन्न:—**दुसऱ्याचे कृपेनें मिळालेलें अन्न.

**मेल्या म्हशीला दूध दहा शेर:—**मेल्या माणसाची स्तुति.

**यावत्तैलं तावदाख्यानम्:—**फुरसतीप्रमाणें विस्तार.

**रंजक पिणें:—**बंदूक किंवा तोफ न उडणें, बार फुकट जाणें.

**रजाचा गज**
**राईचा पर्वत** } **करणें:—**फुगवून सांगणें.

**राम नसणें:—**सत्व नसणें.

**राम म्हणणें:—**मरणें.

**रामबाण औषध:—**हटकूण गुण देणारा उपाय.

**रामपारा:—**सूर्योदयानंतरचा पहिला प्रहर.

**रामाय स्वस्ति रावणाय स्वस्तिः**—दोनी विरुद्ध पक्षांशीं सहानुभूति ठेवणें.

**लट्ठंभारतीः**—स्थूल मनुष्य.

**लब्धप्रतिष्ठितः**—पोकळ प्रतिष्ठा मिरविणारा.

**लवनभंजनः**—गोड भाषण.

**लहानतोंडीं मोठा घासः**—आपल्या अधिकाराबाहेरची गोष्ट.

**लंकेची पार्वतीः**—अलंकारहीन सवाष्ण.

**लाख रुपयांची / दस लाखांची गोष्टः**—मोलवान उपदेश.

**लाटच्या गंगाजीः**—लोकांचें द्रव्य उपटणारा.

**लाळ घोटणेंः**—आशा धरून असणें.

**लांडे कारभारः**—रिकामी उठाठेव.

**लोणकढी थापः**—अगदीं ताजी अशी खोटी गोष्ट किंवा सबब.

**वकीलपत्र घेणेंः**—एखाद्याच्या तर्फेनें बोलणें.

**वडाची साल पिंपळाला लावणेंः**—भलत्याचा संबंध भलत्याला लावणें.

**वड्याचें तेल वांग्यावर काढणेंः**—एकाचा राग दुसऱ्यावर काढणें.

**वांकडें पाऊल पडणेंः**—दुर्वर्तन घडणें.

**वाघाचा डोळाः**—रुपया.

**वाट लावणेंः**—निकालांत काढणें.

**वाटाण्याच्या अक्षताः**—साफ नाकारणें.

**वामकुक्षिः**—दुपारची डुलकी.

**वाऱ्याशीं भांडणेंः**—कारणाशिवाय भांडण काढणें.

**वाऱ्याची मोट बांधणेंः**—अशक्य कार्य पतकरणें.

**वाहिली ती गंगा, राहिलें तें तीर्थः**—पैसा खर्चच करायचा तर सत्कार्यीं करणें, झाल्या गोष्टी विसरून जाऊन पुनः गोडीनें वागणें.

**वाळीत टाकणें-घालणेंः**—बहिष्कार घालणें.

**विकटोपर्यंत अध्ययनः**—अगदींच बेताची विद्वत्ता.

**विळयाभोंपळ्याइतकें सख्य,-उजूः**—पूर्ण वांकडेपणा.

**विडा उचलणेंः**—प्रतिज्ञा करणें.

**वेड घेऊन पेडगांवास जाणें**:—मतलबाकरितां अज्ञान दाखविणें.

**शकुनिमामा**:—कपटी मनुष्य.

**शुंभ**:—बुद्धिमंद मनुष्य.

**शाळू सोबती**:—थोडा वेळ टिकणारे मित्र.

**शिंगें मोडून वांसरांत शिरणें**:—अज्ञानपणाचें मुद्दाम ढोंग करणें.

**शिराळशेटीचें राज्य**:—थोडा वेळ टिकणारें वैभव.

**शिळ्या कढीला ऊत आणणें**:—जुनी गोष्ट काढून भांडण करूं पाहणें.

**शुक्लकाष्ठ**:—मागें कायम लागलेलें लचांड.

**शेणामेणाचा**:—क्षुद्र, सहज नाश पावणारा.

**शेणाचे दिवे लावणें**:—दिवाळें निघणें.

**शेंदाड शिपाई**:—वल्गना करणारा भित्रा मनुष्य.

**स्मशानवैराग्य**:—थोडा वेळ टिकणारी उदासीनता.

**षट्कर्णी होणें**:—दोहींहून अधिक माणसांस कळणें.

**सकट घोडे बारा टक्के**:—सर्वांची सारखीच किंमत.

**सटवाईचीं अक्षरें**:—ब्रह्मलिखित.

**सतीचें वाण**:—प्रसंगीं मृत्यु आणणारें एखादें काम करण्याचा निश्चय.

**समुद्रांत जाऊन कोरडा**:—अनुकूल परिस्थितींतही अभागी असणारा. एखादें काम करून पुनः आपण त्यांत नाहीं असें भासविणें.

**सव्वा मणाची बेडी**:—बायको.

**सव्यापसव्य करणें**:—यातायात करणें.

**साखर पेरणें**:—गोड बोलून मोह घालणें.

**साडेतीन पोषाख**:—पागोटें, शालजोडी किंवा शेला आणि झग्यासाठीं किनखापाचें अर्धें ठाण.

**साडेतीन मुहूर्त**:—दसरा, दिवाळीचा पाडवा, चैत्रप्रतीपदा व अक्षय्य तृतीया ३.

**साप म्हणून भुई बडविणें** — } खोटा संशय घेऊन त्रास देणें.
**" " दोरखंड झोडपणें** — }

**साळकाया माळकाया**:—उपद्व्यापी बायका.

**सुतानें स्वर्गास जाणें**:—थोड्या सुगाव्यानें एखाद्या गोष्टीचा पत्ता पाडणें.

**सुळावरची पोळीः**--अवघड गोष्ट.

**सूप फडफडणें-वाजणें:**—एखादें मोठें काम संपून जाण.

**सूर्यवंशीः**—उशीरानें निजून उठणारा.

**सूर्याचीं पिलें दाखविणें:**—कान उपटणें.

**सूर्याच पोटीं शनैश्चरः**—चांगल्या बापाच्या पोटीं वाईट मुलगा.

**सोक्षमोक्षः**—निकाल, उलगडा.

**सोनारानें कान टोंचणें**—तिऱ्हाईतानें कानउघाडणी करणें.

**सोनें होणें:**—चांगल्या स्थितींत मरणें.

**स्वतां मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं:**—स्वतः खपल्याशिवाय लाभ नाहीं.

**स्वर्ग दोन बोटें उरणें:**—गर्वानें फुगणें.

**स्वाहा करणें**--घशांत टाकणें, गिळंकृत करणें.

**हजीर तो वजीरः**—वेळेवर हजर असणाराला फायदा होतो.

**हंडीबागः**—हाताखालचा चलाख चेला.

**हरीचें मढें:**—अवजड प्रकरण.

**हमरीतुमरीवर येणें:**—एकेरीवर येणें.

**हरताळ पाडणें:**—गांवांतले व्यवहार बंद ठेवणें.

**हरभऱ्याचे झाडावर चढणें:**—स्तुतीला भुलणें.

**हरामाचा मालः**—अन्यायानें मिळविलेला माल.

**हलक्या कानाचाः**—प्रत्येकाचें खरें मानणारा.

**हळकुंडासाठीं लग्न मोडणें:**--शुष्क बाबीकरितां महत्त्वाची गोष्ट अडविणें.

**हळद लागणें:**--महत्त्व येणें.

**हातचा मळः**—ताब्यांतली गोष्ट.

**हात टेकणें:**—दमणें, मत्यास येणें.

**हातांत नारळाची आई देणें:**—भिकेला लावणें.

**हातातोंडाशीं गांठ पडणें:**—जेमतेम उदरनिर्वाह चालणें.

**हातावर तुरी देणें:**—उघड फसवून जाणें.

**हातीं पायीं उतरणें:**—अवघड प्रसंगांतन सुटणें.

**हैदोस घालणें**:—धुमाकूळ उडविणें.

**हा सूर्य हा जयद्रथ**:—दोन गोष्टी समक्ष येणें.

**हिरसा तट्टू**:—खोडकर लोक.

**हुतुतू घालणें**:—दंगल करणें.

**होता कीं नव्हता करणें**:—चांगला मार देणें.

**होयबा**:—होस हो करणारा.

**होळीचे होळकर**:—लोकांच्या संकटांत मौज बघणारे लोक

---

## १ नात्यावरून झालेल्या म्हणी.

१ आई जेवूं घालीना, बाप भीक मागूं देईना; दोन्हीकडून कोंडमारा.

२ आजा मेला, नातू झाला. एका हानीबरोबर एक लाभ होणें.

३ कामापुरता मामा, ताकापुरत्या आजीबाई. काम साधून घेण्यापुरतें गोड बोलणें.

४ नावडतीचें मीठ आळणी; गैरमर्जीतल्या मनुष्याच्या प्रत्येक कृतीला नांवें ठेवणें.

५ बाप दाखीव, नाहीं तर श्राद्ध कर. पुरावा दे नाही तर चूक कबूल कर.

६ बाबा वाक्यं प्रमाणम्. वाडवडिलांचे शब्द प्रमाण मानून चालणें.

७ लेकी बोले, सुने लागे. एकास उद्देशून दुसऱ्याची कानउघाडणी.

## २ शरीरावयवांवरून झालेल्या.

८ आपलेच दांत, आपलेच ओठ. दोन विरोधी माणसें आपलींच असल्यानें शिक्षा करण्याची अडचण.

९ आपलें नाक कापून दुसऱ्यास अपशकून; स्वतःची हानी करून दुसऱ्यास विघ्न करणें.

१० एका हातानें टाळी वाजत नाहीं. एकच पक्षामुळें भांडण होत नाहीं.

११ काखेंत कळसा आणि गांवास वळसा; जवळ असलेली वस्तु अनेक ठिकाणीं हुडकून दमणें.

१२ कानामागून आला आणि तिखट झाला. वयानें लहान असून वडिलांना ज्ञान शिकविणें, किंवा गर्व दाखविणें.

१३ ज्याचें पोट दुखतें तो ओवा मागतो. दुःख ज्याला होतें तो त्यावर उपाय शोधतो.

१४ ज्याच्या हातीं ससा तो पारधी; ज्याला यश आलें तो कर्तबगार.

१५ झांकली मूठ सव्वा लाखांची. व्यंग गुप्त ठेवणें फायदेशीर असतें.

१६ डोळ्यांत केर आणि कानांत फुंकर; अपाय एक आणि उपाय दुसराच.

१७ तोंड करी बाता, ढुंगण खाई लाथा. स्वतः विपरीत अनुभव घेत असून वल्गना करीत राहणें.

१८ तोंड दाबून बुक्क्यांचा मार. तक्रार न करितां हाल सोसावे लागणें.

१९ दुसऱ्याच्या डोळयांतलें कुसळ दिसतें, पण स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळ दिसत नाहीं. दुसऱ्याचें क्षुद्र व्यंग दाखविणें पण स्वतःचा ढोबळ दोष न पाहणें.

२० पाय धू, म्हणे तोडे केवढ्याचे ? काम टाकून नसती उठाठेव.

२१ पायींची वहाण पायीं बरी. प्रत्येकानें योग्यतेनुरूप वागावें.

२२ बुडत्याचा पाय खोलांत; विनाशाच्या वेळीं जें करावें तें अंगाशींच येतें.

२३ भित्यापाठीं ब्रह्मराक्षस. भितरा मनुष्य भीतीमुळेंच संकटें ओढवून घेतो.

२४ शीरसलामत तों पगड्या पचास. देह शाबूत राहिला तर पैसा हवा तेवढा मिळवलि.

२५ शेंडी तुटो कीं पारंबी तुटो. कोणता तरी एक परिणाम होवो अशा निश्चयानें उद्योग करणें.

२६ हातचें सोडून पळाल्याच्या पाठीस लागूं नये. हातीं आलेला लहान लाभ कदाचित् मिळणाऱ्या मोठ्या लाभापेक्षां श्रेयस्कर आहे.

२७ हातच्या कांकणास आरसा कशाला ? जी गोष्ट प्रत्यक्ष सिद्ध आहे तिल अवांतर पुराव्यांची गरज नाहीं.

## ३ पशुपक्ष्यादिकांवरून झालेल्या

२८ अति शहाणा त्याचा बैल रिकामा. फार चिकित्सा करणाराला फायदा होत नाहीं.

२९ उंदराला मांजर साक्ष. ज्याच्यापासून आपला फायदा आहे त्याजबद्दल कोणीही साक्ष देतो.

३० कसाबाला गाय धारजिणी; कडक रीतीनें वागविणाराला मनुष्य वश होणें.

३१ कोंबडें झांकलें म्हणून तांबडें फुटायचें राहत नाहीं. कोणी विघ्न केलें म्हणून निर्विवाद होणारी गोष्ट अडत नाहीं.

३२ कोल्हा काकडीला राजी. क्षुद्र मनुष्य थोड्याच लाभावर संतुष्ट असतो.

३३ गाढवांचा गोंधळ, लाथांचा सुकाळ. हलकट माणसांच्या मजलशींत शिवीगाळ, मारामाऱ्या याच चालायच्या.

३४ गाढवाच्या किंवा बैलाच्या पाठीवर साखरेच्या गोण्या. एकादी गोष्ट सहजलभ्य असून तिचा उपयोग न होणें.

३५ गाढवापुढें वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता. अरसिक मनुष्याला मोलवान् गोष्टीची योग्यता कळत नाहीं.

३६ गोगल गाय आणि पोटांत पाय; कपटी मनुष्य.

३७ घोडा मैदान जवळच आहे. परीक्षेची वेळ येणें.

३८ डोंगर पोखरून उंदीर काढणें. मोठे श्रम करून थोडें फळ मिळविणें.

३९ दुभत्या गाईच्या लाथा गोड. ज्याच्यापासून लाभ आहे त्यानें केलेला अपमान गोड मानणें.

४० धर्माचे गाई आणि दांत कां गे नाहीं ? फुकट मिळालेल्या वस्तूंत खोड काढीत बसूं नये.

४१ बैल गेलान् झोपा केला. हानी झाल्यावर संरक्षणाची तजवीज.

४२ भरंवशाचे म्हशीस टोणगा. खात्रीचें साधन फुकट जाणें.

४३ लकडीवांचून मकडी वळत नाहीं. चोप दिल्याशिवाय खोडकर मनुष्य ताळ्यावर येत नाहीं.

४४ वरातीमागून घोडें. एखादी गोष्ट होऊन गेल्यावर तत्संबंधी साधनें जमविणें.

४५ वांसरांत लंगडी गाय शहाणी. मूर्खांच्या जमावांत अर्धवट शहाण्याचें देखील तेज पडतें.

४६ शेळी जाते जिवानिशीं, खाणारा म्हणतो वातड. एखाद्यानें झीज सोसून दुसऱ्यास केलेला उपचार त्यास पसंत न पडणें.

## ४ विरोध असंबद्धता इ० दाखविणाऱ्या.

४७ अन्नसत्रीं जेवणें मिरपूड मागणें. भिक्षेकऱ्यानें मिजास दाखविणें.

४८ आईजीच्या जिवावर बाईजी उदार. दुसऱ्याच्या पैशावर चैन करणें.

४९ आपला तो बाब्या, दुसऱ्याचें तें कारटें. आपल्या वाईट जिनसाची तारीफ करणें व दुसऱ्याच्या त्याच जिनसाला नांवें ठेवणें.

५० आपला हात जगन्नाथ. आपण घेण्याची संधि मिळाली असतां मुबलक उचलणें.

५१ उतावळा नवरा, गुडघ्याला बाशिंग. अतिशय आतुर होऊन आचरट-पणानें वागणें.

५२ एक धड ना भाराभर चिंध्या. एक विषय पुरता नसून पुष्कळसे अर्धवट असणें.

५३ काळ आला होता, पण वेळ आली नव्हती. जिवावरचा प्रसंग आला होता पण दैवयोगानें बचावला.

५४ कोठें इंद्राचा ऐरावत आणि कोठें शामभटाची तटाणी ! ऐश्वर्यसंपन्न मनुष्याचे पदार्थ आणि दरिद्र्याचे पदार्थ यांत तफावत असते.

५५ चार दिवस सासूचे, चार सुनेचे. प्रत्येकाला अधिकार गाजविण्याची वेळ केव्हां तरी येतेच.

५६ चोराच्या उलट्या बोंबा. आपणच आगळीक करून आपणच ओरड करणें.

५७ चोराच्या मनांत चांदणें. पाप करूं पाहणाराला उघडकीचें भय वाटतें.

५८ चोराच्या हातची लंगोटी. चिकट मनुष्याकडून मिळेल तेंच पुष्कळ.

५९ चोराला सोडून संन्याशाला सुळीं देणें. अपराध्याबद्दल निरपराध्याला शिक्षा.

६० चोरावर मोर. एका लुच्चाला दुसरा मोठा लुच्चा भेटणें.

६१ जेवीन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशीं. एक पूर्ण लाभ नाहीं तर सर्वथा हानि पतकरण्याचा दुराग्रह धरणें.

६२ ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी. एकमेकांचीं वर्मे ठाऊक असणाऱ्या माणसांची गाठ पडणें.

६३ ढवळ्या शेजारीं बांधला पवळा, वाण नाहीं गुण लागला. चांगल्याच्या संगतींत राहून त्याचा एखादा दुर्गुण तेवढा नेमका घेणें.

६४ ताकाला जाऊन भांडं-भिक्षेला जाऊन गाडगें लपविणें. याचना करितांना आड पडदा राखणें.

६५ तुम्ही आम्ही एक, कंठाळीला मेख. बोलण्यापुरती मैत्री दाखवून मतलबांत पक्षपात करणें.

६६ तेल गेलें, तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें. दुहेरी फायद्याच्या दोन्हीं गोष्टी घालवून श्रम तेवढे पदरांत पडणें.

६७ तोबऱ्याला पुढें, लगामाला मागें. लाभाला पुढें व श्रमाला मागें राहणें.

६८ नकटीच्या लग्नाला सत्राशें विघ्नें. व्यंगयुक्त कामाला अडचणी फार.

६९ न करि त्याचा वार शनिवार. काम करावयाची इच्छा नसली म्हणजे काहीं तरी निमित्त सांगणें.

७० नाचतां येईना, आंगण वांकडें. आपल्या अडाणीपणास झांकण्याकरितां एखाद्या गोष्टींत खोड काढणें.

७१ नांव मोठें लक्षण खोटें. कीर्ति मोठी पण गुण खरोखरी कांहींच नसणें.

७२ पालथ्या घागरीवर पाणी. लक्ष्य न देणाऱ्या माणसाला केलेला उपदेश.

७३ पी हळद, हो गोरी. कालावधीनें होणाऱ्या गोष्टीबद्दल उतावीळपणा.

७४ पै दक्षिणा, लक्ष प्रदक्षिणा. देणें थोडें व काम पुष्कळ सांगणें.

७५ फूल नाहीं फुलाची पाकळी. सामर्थ्याच्या अभावीं थोडा उपचार करणें

७५ बसतां लाथ उठतां बुक्की. नेहमीं मार देणें, कडक वागविणें.

७७ बळी तो कान पिळी. बळवान् माणूस आपलें म्हणणें खरें करितो.

७८ बाजारांत तुरी, भट भटिणीला मारी. पुढें करावयाच्या गोष्टीबद्दल आतांच भांडत बसणें.

७९ भटाला दिली ओसरी, भट पाय पसरी. थोडी सवलत दिल्यास अधिक फायदा घेऊं पाहणें.

८० रिकामा न्हावी, कुडाला तुंबड्या लावी. रिकामे चाळे करीत बसणें.

८१ लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण. उपदेश लोकांना करून आपण त्याप्रमाणें न वागणें.

८२ हलवायाच्या घरावर तुळशी पत्र. दुसऱ्याची मत्ता तिसऱ्याला देणें.

## ५ नीति, धर्म इ० संबंधीं म्हणी.

८३ अडला नारायण गाढवाचे पाय धरी. मोठ्या मनुष्याला देखलि प्रसंगीं मूर्खाची मनधरणी करावी लागणें.

८४ अति तेथें माती. कोणतीही गोष्ट प्रमाणाबाहेर गेली म्हणजे घातक होते.

८५ असंगाशीं संग, प्राणाशीं गांठ. वाईट मनुष्याची मैत्री घातक.

८६ आधीं बुद्धि जाते व मग भांडवल जातें. चूक झाल्यावर नुकसान होतें.

८७ ऐकावें जनाचें, करावें मनाचें. लोकांचा उपदेश ऐकून घ्यावा पण मन सांगेल तें करावें. cf. 'Give every man thy ear but few thy voice—' Shakspeare.

८८ कडू कारलें, तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी तें कडूच. वाईट खोडीच्या माणसाला किती शिकविलें तरी तो वाईटच राहतो.

८९ काडीचोर तो पाडीचोर. बारीक गुन्हा करणारा मोठा गुन्हा करील हें तर्कसिद्धच आहे.

९० कुचेष्टेवांचून प्रतिष्ठा नाहीं. कांहीं तरी मोठी भानगड केल्याशिवाय लौकिक होत नाहीं.

९१ कुऱ्हाडीचा दांडा, गोतास काळ. आपलाच जातभाई फितूर झाला म्हणजे फार घात करितो.

९२ कोळसा किती उगाळला तरी काळाच. वाईट गोष्टीची किती छाननी केली तरी त्यांतून वाईटच निघणार.

९३ खर्चणाराचें सरतें आणि कोठवळ्याचें पोट दुखतें. मालक उदार असतो, पण जवळचे अगलेबगले दुष्ट असतात.

९४ खाई त्याला खवखवे. अपराध करणाराला आपला अपराध जाणवत असतो.

९५ गरजवंता अक्कल नाहीं. याचना करण्याचा प्रसंग आला म्हणजे वाटेल तीं दुरुत्तरें ऐकून घ्यावीं लागतात.

९६ गरज सरो, वैद्य मरो. आपलें काम झाल्याबरोबर उपकारकर्त्याला विसरून जाणें.

९७ गाड्यावर नांव नावेवर गाडा. आज एकाकडून दुसऱ्याचा उपयोग झाला, तर उद्यां दुसऱ्याकडून त्याचा होईल, दिवस सारखे नसतात.

९८ गांव तेथें म्हारवडा. प्रत्येक गोष्टींत काहीं तरी व्यंग असायचेंच.

९९ घरोघरीं मातीच्याच चुली. प्रत्येक कुटुंबांत कांहीं तरी व्यंग असतेंच.

१०० जशी देणावळ तशी धुणावळ. देण्याप्रमाणें नोकरी होणार.

१०१ जळांत राहून माशाशीं वैर. ज्या परिस्थितींत रहावें त्या परिस्थितीच्या घटकांशीं वैर करूं नये.

१०२ जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे. कोणत्याही विषयांत प्रत्यक्ष पडल्याशिवाय त्यांतील खाचाखोंचा कळत नाहींत.

१०३ टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण नाहीं. श्रमावांचून मोठेपणा नाहीं.

१०४ तळें राखील तो पाणी चाखील. एखादी वस्तु ज्याच्या ताब्यांत असते तो तिचा थोडाफार उपयोग करून घेतोच.

१०५ थेंबें थेंबें तळें साचें. कणांकणांनींच मोठा संचय होतो.

१०६ दगडापरीस वीट मऊ. मोठ्या अडचणीपेक्षां लहान बरी.

१०७ दसकी लकडी एकका बोजा. प्रत्येकानें थोडा हात लावला तर सर्वांत मिळून मोठें कार्य होतें.

१०८ दिव्याखालीं अंधेर चांगल्या माणसाचे ठिकाणीं ठळक दोष असणें.

१०९ दुरून डोंगर साजरे. लांबून चांगली वाटणारी गोष्ट प्रत्यक्ष पाहिल्यास वाईट असल्याचें आढळून येतें.

११० धन्याला धत्तुरा अन् चाकराला मलिदा. योग्य मालकाला कांहींच न मिळतां भलत्याला फायदा मिळणें.

१११ नाक दाबलें कीं तोंड उघडतें. एखाद्या घुम्या मनुष्याची कोणीकडून तरी कुचंबणा केल्याशिवाय तो अनुकूल होत नाहीं.

११२ पडलेलें शेण माती घेऊन उठतें. खटपटीला थोडें तरी यश येतें.

११३ पुढच्यास ठेंच मागला शहाणा. दुसऱ्याच्या अनुभवावरून मनुष्य दक्ष होतो.

११४ भीक नको, पण कुत्रें आटप. होणाऱ्या लाभापेक्षां पडणारे श्रम असह्य होणें.

११५ मूर्ति तितक्या प्रकृति. प्रत्येकाचा देहस्वभाव भिन्न असतो.

११६ वळचणीचें पाणी आढ्याला जात नाहीं. हलक्यास थोर होतां येत नाहीं.

११७ व्याप तितका संताप. पसारा वाढवावा तशी काळजी वाढते.

११८ सत्तेपुढें शहाणपण नाहीं. अधिकारापुढें बुद्धीचें तेज पडत नाहीं.

११९ साखरेचा खाणार, त्याला देव देणार. भाग्यवंताला दैव अनुकूल होतें.

## ६ विविध म्हणी.

१२० आगींतून निघून फोफाट्यांत पडणें. लहान संकटांतून बचावून मोठ्या संकटांत पडणें.

१२१ उथळ पाण्याला खळखळ फार. थोड्या गुणाला गर्व फार असतो.

१२२ काप गेले, भोकें राहिलीं. वैभव गेलें आणि अवशेष राहिले.

१२३ कुंपणानें शेत खाल्लें. रक्षणकर्त्यांनेंच बुडविलें.

१२४ कोरड्याबरोबर ओलें जळतें. अपराध्याबरोबर निरपराध्याला शिक्षा होते.

१२५ गवयाचें पोर रडलें तरी सुरावर रडणार. आनुवंशिक संस्कार सहज गोष्टींत सुद्धां दिसून येतात.

१२६ गाजरांची पुंगी वाजली तर वाजली, नाहीं तर मोडून खाल्ली. चांगल्या साधनांचा उपयोग झाला तर झाला, नाहीं तर निदान हानी नाहीं.

१२७ गाड्याबरोबर नळ्याला यात्रा. महत्वाच्या गोष्टीबरोबर आनुषंगिक क्षुद्र गोष्टींचाही लाभ होणें.

१२८ तहान लागल्यावर विहीर खणणें. आयत्या वेळीं प्रयत्नाला लागणें.

१२९ ताटांत सांडलें काय आणि वाटींत सांडलें काय? परस्परांशीं निकट संबंध असलेल्या वस्तूंत कुणालाही लाभ झाला तरी तो दुसरीला झाल्यासारखाच आहे.

१३० तीथ आहे तर भट नाहीं, भट आहे तर तीथ नाहीं.<br>दांत आहेत तर चणे नाहींत, चणे आहेत तर दांत नाहींत. } परस्परावलंबी दोन गोष्टींपैकीं कोणती तरी एकच असणें.

१३१ दिलमें चंगा तो काटवटमे गंगा. मन निर्मळ असलें तर सर्व चांगलेंच आहे.

१३२ देश तसा वेष. परिस्थितीप्रमाणें वागणें.

१३३ दोहों घरचा पाहुणा उपाशीं. दोन अवधानें राखणारा फसतो.

१३४ पदरीं पडलें, पवित्र झालें. एकदां पतकरलेली गोष्ट कशीही असली तरी चांगलीच.

१३५ रात्र थोडी, सोंगें फार. कामें पुष्कळ असून वेळेची टंचाई असणें.

१३६ सगळेंच मुसळ केरांत. मुख्य महत्त्वाच्या गोष्टींकडे दुर्लक्ष होणें.

